अथाप्युदाहरन्ति ।

* अन्नादे भ्रूणहा मार्ष्टि अनेना अभिशंसति ।

स्तेन. प्रमुक्तो राजनि याचन्ननृतसंकरः ॥ इति ॥१५॥

आ. धर्मसूत्र ( १-१९-१३ ते १५ )

( २ ) यो हिंसार्थमभिक्रांत हति मन्युरेव मन्युं स्पृशति न तस्मिन् दोष इति पुराणे । १-२९-७.

( ३ ) अथ पुराणे श्लोकावुदाहरति ॥ ३ ॥

अष्टाशीतिसहस्राणि ये प्रजामीषिर ऋषय ।

दक्षिणेनार्यम्ण पथानं ते श्मशानानि भेजिरे ॥ ४ ॥

अष्टाशीतिसहस्राणि ये प्रजा नेषिर ऋषिय. ।

उत्तरेणार्यम्ण पथान तेऽमृतत्वं हि कल्पते ॥ ५ ॥

आ० ध० सूत्रें ( २-२३-३ ते ५ )

( ४ ) आभूतसंप्लवात्ते स्वर्गजित ॥ ५ ॥

पुन सर्गे बीजार्था भवंतीति भविष्यत्पुराणे ॥ ६ ॥

अथापि प्रजापतेर्वचनम् ॥ ७ ॥

आ० ध० सू० २-२४-५ व ६

यात पुराणातील म्हणून जे श्लोक उतरून घेतलेले आहेत त्या अर्थाचे हल्लींच्या पुराणातूनही श्लोक आढळतात, पण वरील श्लोक प्राचीनतर दिसतात. आपस्तंबधर्मसूत्रांत भविष्यत्पुराणाचा स्पष्ट उल्लेखही आहे, पण भविष्यत्पुराणातील वरील अर्थाचा उतारा हल्लींच्या भविष्यात मला तरी अद्यापि मिळाला नाही. यावरून आपस्तंबाच्या काळीं हल्लींचीं पुराणे नसून

* मनु ८-३१७ पहा.

तेव्हां व्यासाचीं आदिपुराणें प्रचलित असावींत असें वाटतें. वरील उताऱ्यांवरून प्राचीन आदिपुराणांची भाषा कळून येईल.

हल्लींच्या पुराणांतील बराचसा भाग जरी आदिपुराणावरून घेतलेला असला तरी, त्यातील बराच भाग अर्वाचीन आहे, निदान अर्वाचीन भाषेत आहे ह्यात शंकाच दिसत नाहीं.

## आदिपुराणें व्यासांच्याच वेळचीं होत !

आदिपुराणें व्यासाच्या वेळचीं असून त्यानंतर एकदोन पिढ्यात तीं सांगितलीं गेलीं यास प्रमाणें अशीं मिळतातः—

१ अर्जुन—यास स्वतः भगवंतानीं गीता सांगितली व ती व्यासांनीं भारतात गुंफिली !
२ अभिमन्यु
३ परिक्षित्—यास शुकाचार्यांनीं व्यासोक्त मूळ भागवत सांगितलं; तसेंच, याच्या काळीं पराशरानें मैत्रेयास मूळ विष्णुपुराण सांगितलें.
४ जनमेजय—यास वैशंपायन व जैमिनि यांनीं आपापलीं भारतें ऐकविलीं !
५ शतानीक—यास सुमंतूनें मूळचें भविष्यपुराण सांगितलें.
६ अधिसोमकृष्ण—हा राज्य करीत असताच सूतानें मूळ मत्स्यपुराण (५०–६६) व मूळ वायुपुराण (१–९२) ऋषींस सांगितलें !

या प्रमाणावरून 'आदिपुराणें' व्यासांनींच प्रचलित केलीं हें स्पष्ट दिसून येतें. .

असे जरी आहे तरी व्यासांची मळ पुराणे व्यासाच्या वेळेपासून तों इ० पू० १०० सुमारपर्यंत प्रचलित असून विक्रमाच्या वेळीं तीं अर्वाचीन भाषेंत पुनरुक्त झालीं हे स्पष्ट दिसते. तेव्हां, प्राचीन व्यासोक्त आदिपुराणांवरून पुनरुक्तस्वरूपात प्रचलित पुराणें चतुर्लक्षग्रंथरूपानें प्रवृत्त वेळीं गेलीं. *पुराणें द्वितीय संस्करणानीं* वृद्धि पावलीं, हे भविष्यपुराणात एके ठाईं स्पष्टच लिहिले आहे:—

सर्वाण्येव पुराणानि संज्ञेयानि नरर्षभ ।
द्वादशैव सहस्राणि प्रोक्तानीह मनीषिभिः ॥
पुनर्वृद्धिं गतानीह आख्यानैर्विविधैर्नृप ।
यथा स्कादं तथा चेदं भविष्यं कुरुनंदन ॥
स्कादं शतसहस्रं तु लोकाना ज्ञातमेव हि ।
भविष्यमेतदृषिणा लक्षार्धं संख्यया कृतम् ॥

भविष्य पु ब्रह्मपर्व, अ. १-१०४ ते १०६.

यात सर्व पुराणें पूर्वी १२ हजारांचीं होतीं; तीं पुढे उपाख्यानांनीं व आख्यानांनीं वृद्धि पावलीं; ही अत्यंत महत्त्वाची परंपरा दिलेली आहे. तेव्हा व्यासोक्त आदिपुराणें प्रत्येकीं बारा हजारांची असावींत असे वाटते. व्यासापासून तों विक्रमाच्या वेळेपर्यंत जी काहीं इतर पौराणिक सामग्री जमली असेल ती सर्व पुराणात अंतर्भूत करून सुमारे विक्रमाच्या वेळीं हीं पुराणे चार लक्षांचीं केलीं गेलीं असलीं पाहिजेत, व पुढें तर स्काद व भविष्य हीं अनुक्रमे एक व अर्धा लक्षापर्यंत वाढलीं ! साराश, विक्रमोत्तरकाळीं पुराणास सद्यःस्वरूप मिळाले !

## विक्रमोत्तरकालीन पुराणें !

अठरा पुराणें चार लक्ष, भारत एक लक्ष व रामायण २४ हजार या

तरी संस्कार झालेले आहेत. सारांश, व्यासापूर्वीचें पुराण, व्यासकृत आदिपुराणाची प्रवृत्ति, तीं आदिपुराण विक्रमाच्या काळापर्यंत स्वस्वरूपात बहुधा कायम असणें, तेव्हां त्या प्रत्येकाची बहुधा १२ हजार संख्या असणें, नंतर विक्रमकाळीं पुराणावर द्वितीय संस्कार होऊन तीं सूतांकडून पुनरुक्त होणें, त्याची संख्या तेव्हां चतुर्लक्ष होणें, त्यानंतर इ० स० ५००–६०० च्या सुमारास सद्यकालीन पुराणास भविष्य वर्णनाचे भाग जोडण्यात येणें, नंतर कांहीं कांहीं पुराणांत मतप्राबल्याच्या वेळीं कांहीं प्रक्षेप जोडण्यात येणें, इतके संस्कार पुराणास झालेले स्पष्ट दिसत आहेत.

तथापि, विल्सन वगैरे मंडळी समजतात तितकीं कांहीं आमचीं पुराणें अर्वाचीन नाहींत. त्यांत प्राचीन व अर्वाचीन मजकुराची भेळ असली तरी प्राचीन मजकूर कोणता व अर्वाचीन मजकूर कोणता हें चटकन कळून येतें. प्रत्येक पुराणाचें सद्य स्वरूप किती प्राचीन आहे हें अनेक उल्लेखांवरून त्या त्या पुराणाशेजारींच दाखविलेले आहे. हल्लींच्या स्वरूपांत हीं पुराणें निदान १८०० वर्षें तरी आहेत यांत शंकाच नाहीं.

श्रीशंकराचार्यांची आठव्या शतकांत पुराणाविषयीं काय समजूत होती ते पहा :—

ऋग्वेदादिविभागेन चतुर्धा वेदा व्यस्ता । आद्यो वेद एकविंशतिधा कृत । द्वितीय एकोत्तरशतधा कृत । सामवेद सहस्रधा कृत । अथर्ववेदो नवधा शाखाभेदेन कृत । अन्यानि पुराणानि व्यस्तानि अनेनेति व्यासः ।

यांत व्यासांनीं पुराणसंहिता केल्या असा स्पष्ट उल्लेख आहे. मागें शौनकाच्या वेळीं पुराण ' व्यासांचें ' असल्यासंबंधीं समजूत व उल्लेख दिलेलेच आहेत. असो.

आठव्या शतकापूर्वीच **पुराणार्णव** ग्रंथ तयार झालेला होता; त्यांतून श्रीमद्भागवताचे लक्षण चित्सुखाचार्यांनी उतरून घेतलेले आहे. त्यावरून त्या पुराणार्णवात सर्वही पुराणांची लक्षणे दिलेली असली पाहिजेत. हा ग्रंथ मिळेल तर बरें होईल.

*तसेच शके ११८५ मध्यें रत्नमालेच्या माधवटीकेंत उल्लिखित असा* **पुराणसमुच्चय** ग्रंथही महत्त्वाचा आहे. तोही मिळाला पाहिजे, यांतील उतारा मागें भक्तरंजनीनें घेतलेला मीं दिलेलाच आहे.

## पुराणें कोणतीं ?

मद्वयं भद्वयं चैव ब्रत्रयं वचतुष्टयम् ।
अनापलिंगकूस्कानि पुराणानि पृथक् पृथक् ॥
आलिपाग्नि पुराणानि कूस्कं गारुडमेव च ॥

पुराणाचीं नावे अशीः—

१ ब्राह्म, २ पाद्म, ३ वैष्णव, ४ शैव किंवा वायु, ५ भागवत, ६ भविष्य, ७ नारद, ८ मार्कंडेय, ९ अग्नि, १० ब्रह्मवैवर्त, ११ लिंग, १२ वाराह, १३ स्कंद, १४ वामन, १५ कूर्म, १६ मात्स्य, १७ गरुड, व १८ ब्रह्मांड.

यापैकीं शैव किती, वैष्णव किती व इतर देवताचीं किती, याचे वर्गीकरण असे आहेः—

पुराणैर्दशभिर्विप्राः प्रोक्तः शंभुस्तथैव च ।
चतुर्भिर्भगवान् विष्णुर्द्वाभ्यां ब्रह्मा प्रकीर्तित. ॥
अग्निरेकेन विप्रेंद्रास्तथैकेन दिवाकरः ॥

सर्व पुराणे मिळून ४ लक्ष, त्याचा तपशील असा.—

१८ ब्राह्म १० हजार, पाद्म ५५ हजार, विष्णु २३ हजार, वायु ऊर्फ शैव २४ हजार, भागवत १८ हजार, नारद २५ हजार, मार्कंडेय ९ हजार, अग्नि १५४००, भविष्य १४५००, ब्रह्मवैवर्त १८ हजार, लिंग ११ हजार, वराह २४ हजार, स्कंद ८११००, वामन १० हजार, कूर्म १७ हजार, मत्स्य १४ हजार, गारुड १९ हजार, व ब्रह्मांड १२ हजार–येणेप्रमाणें चार लक्ष ग्रंथ होतो.

बाराव्या शतकांतील अपरार्कानें याज्ञवल्क्यस्मृतीवरील आपल्या टीकेंत खालील पौराणिक ग्रंथांतून उतारे घेतलेले आहेतः—

पद्मपुराण, कूर्मपुराण, ब्रह्मपुराण, ब्रह्मांडपुराण, भविष्यपुराण, मत्स्यपुराण, मार्कंडेयपुराण, लिंगपुराण, वराहपुराण, वामनपुराण, वायुपुराण, विष्णुपुराण व स्कंदपुराण हीं महापुराणें; व आदिपुराण, आदित्यपुराण, कालिकापुराण, देवीपुराण, नंदिपुराण, नृसिंहपुराण, भविष्योत्तरपुराण, विष्णुधर्म, विष्णुधर्मोत्तर. विष्णुरहस्य, शिवधर्मोत्तर हे इतर पौराणिक ग्रंथ.

वायुपुराणात आदिपुराणाची संख्या १०६०० दिलेली आहे.

श्रीशंकराचार्यांनीं खालील ग्रंथांतील उतारे घेतलेले आहेतः—

विष्णुपुराण, विष्णुधर्म, विष्णुधर्मोत्तर, भविष्यपुराण, ब्रह्मपुराण, ब्रह्मवैवर्त, पद्मपुराण, लिंगपुराण, नृसिंहपुराण, कूर्मपुराण, ( ईश्वरगीता व व्यासगीता ), ब्रह्मांडपुराण ( कावषेयगीता ) इत्यादि.

प्रचलित पुराणापैकीं वायु, विष्णु, भागवत व मात्स्य हीं पुराणें कलियुगातील भविष्यकाळच्या राजवर्णनाशिवाय बाकीच्या सर्व भागात प्राचीन दिसतात असें विल्सनचें मत आहे.

"It is also to be remarked that the Vāyu, Vishnu, Bhagawat and Mātsya Puranas, in which the particulars

(about future kings) are foretold, have, in all other respects, the character of as great antiquity as any works of their class. "

तसेंच, भरतखंडाच्या कोणत्याही भागांत निदान ब्राह्म, विष्णु, वायु, मात्स्य, पाद्म, भागवत व कूर्म या पुराणाच्या प्रति तरी सगदीं सारख्या मिळतात असें त्याचे म्हणणे आहे. असो.

## पुराणांतील विषय.

याप्रमाणें पुराणाविषयीं सामान्य विचार केल्यानंतर पुराणात काय काय विषय येतात हें आपण पाहूं. 'पुराणे धर्मनिश्चयः' हें वचन आपण मागें पाहिलेंच आहे. तेव्हां धर्मनिश्चय ज्यानें ज्यानें होत असेल असा सर्व मजकूर यात येणार हें उघड आहे. सर्ग, प्रतिसर्ग, वंश, मन्वतरें, वंशानुचरित—यांशिवाय अनेक तीर्थमाहात्म्य, व्रतमाहात्म्य, दानमाहात्म्य, तिथिमाहात्म्य, श्राद्धादिकल्पमाहात्म्य, अनेकविद्यामाहात्म्य, विद्याप्रवर्तक-माहात्म्य, सारांश—यांत सर्व कांहीं धर्म, इतिहास, विद्या, पूर्वपरंपरा—अनेक विज्ञान—येईल; व यामुळेच पुराणपठणाची फलश्रुति याप्रमाणें दिलेली आहे.-

यो विद्याच्चतुरो वेदान्सांगोपनिषदो द्विजः ।
न चेत्पुराणं संविद्यान्नैव स स्याद्विचक्षणः ॥
इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत् ।
बिभेत्यल्पश्रुताद्वेदो मामयं प्रहरिष्यति ॥
ये स्वेतानि समस्तानि पुराणानि च जानते ।
भारतं च महाबाहो ते सर्वज्ञा मता नृणाम् ॥
यश्चतुर्वेदविद्भिः पुराणं वेत्ति नार्थतः ।

तं दृष्ट्वा भयमाप्नोति वेदो मां प्रतरिष्यति ॥
अस्ति शूद्रस्य शुश्रूषोः पुराणेनैव वेदनम् ।
वदंति केचिद्विद्वांसः स्त्रीणां चैव समानताम् ॥
कल्पे मूलेऽथवा वेदे धर्मशास्त्रे पुराणके ।
इतिहासेऽनुवृत्तिर्या स जपः प्रोच्यते बुधैः ॥
अष्टादशपुराणानां नामधेयानि यः पठेत् ।
त्रिसंध्यं जपते नित्यं सोऽश्वमेधफलं लभेत् ॥ अनेक पुराणांतून.

## मि० जॅक्सन यांचें पुराणांविषयींचें मत.

मि. जॅक्सन् यांनीं (B B R A. S The Centenary Memorial Volume मध्य, ) Epic and Puranic Notes नावाचा एक लेख लिहिला आहे. त्यांत पुराणांविषयीं त्यांनीं आपलीं मत दिलेलीं आहेत; तीं मतें मुद्दाम आमच्या मताशीं वाचकांना ताडून पहातां यावीं म्हणून येथें उतरून घेतलेलीं आहेत. कित्येक ठाईं आमचीं त्यांचीं मतें जमत नाहींत, पण आमच्या मताच्या प्रतिपादनार्थ आम्हीं पुरेशीं प्रमाणें दिलेलीं आहेत अशी आमची समजूत आहे.

original Purana was rewritten in verse while the original *chronology* gave place *to the* system of Kalpas and the history subsequent to the great war was thrown into prophetic form This second version was the common source of the extant Puranas The historical statements common to the विष्णु, मात्स्य, वायु and भागवत end with the troubled times that followed the fall of the Gupta Empire and the origin of a plurality of पुराण 's may therefore be referred to about the 6th century A D though ofcourse some of the existing works may have been recast or added to later than this. P P/ 72—73

मि. विल्सन याच्या मतापेक्षा मि. जॅक्सन यांचीं पुराणाच्या प्राचीनत्वाविषयींचीं मतें बरींच सुधारलेलीं आहेत हें यावरून लक्षांत येण्यासारखेंच आहे, याही मतात फार सुधारणा झाली पाहिजे हे आमच्या वरील विवेचनावरून कळून येईलच.



# प्रकरण २ रें.



## प्रत्येक पुराणाविषयीं माहिती.

### ब्रह्मपुराण, १ लें.

मत्स्यपुराणात याचें लक्षण असें दिलेलें आहे कीः—

ब्रह्मणाभिहितं पूर्वं यावन्मात्र मरीचये ।

ब्राह्मं त्रिदेशसाहस्रं पुराणं परिकीर्त्यते ॥ मत्स्यपु. ५३–१३.

प्रचलित ब्रह्मपुराणाच्या पहिल्या अध्यायात म्हटलें आहे कीः—

कथयामि यथापूर्वं दक्षाद्यैर्मुनिसत्तमैः ।

पृष्टः प्रोवाच भगवानब्जयोनि. पितामहः ॥ ९१–२३.

यावरून विल्सन साहेबास वाटलें कीं, मरीचीला ब्रह्मदेवानें सांगितलेलें ब्रह्मपुराण व प्रचलित ब्रह्मपुराण वेगळें! पण ( २६–३६ ) मध्यें कित्येक हस्तलिखित प्रतींत आहे पाठ आहेः—

मरीच्याद्यास्तदा देवं प्रणिपत्य पितामहम् ।

इममर्थमृपिवराः पप्रच्छुः पितरं द्विजाः ॥ २६–३६.

वास्तविक पहाता प्रचलित ब्रह्मपुराणात २७ वे अध्यायापासून अखेरपर्यंत ब्रह्मा वक्ता व मरीच्यादि मुनिगण श्रोते आहेत. ( निदान ९१ व्या

---

१ ' ब्राह्मं तु दशसाहस्रं ' असा विल्सनचा पाठ होता. अपपर्कांच्या वेळींहि हाच पाठ होता.

२ येथें पुण्याच्या ब्रह्मपुराणांत ' मृग्वाद्याः ' असा पाठ आहे.

*अध्यायापर्यंत तरी आहेत. ) यावरून मळचे ब्रह्मपुराण अ. २७–ते ९१* पर्यंत असावें असें केव्हां केव्हां वाटते. तथापि, नारदपुराणाच्या पूर्वभागांत ब्रह्मपुराणाचा जो विषयानुक्रम दिलेला आहे तो पाहिला असतां, त्यास माहीत असलेलें ब्रह्मपुराण व प्रचलित ब्रह्मपुराण हीं एकच आहेत असें कळून येईलः—

ब्राह्मं पुराणं तत्रादौ सर्वलोकहिताय च ।
व्यासेन वेदविदुषा समाख्यातं महात्मना ॥
तद्वै सर्वपुराणाग्र्यं धर्मकामार्थमोक्षदम् ।
नानाख्यानेतिहासाढ्यं दशसाहस्रमुच्यते ।
( तत्पूर्वभागे । ) देवानामसुराणां च यत्रोत्पत्तिः प्रकीर्तिता ॥
प्रजापतीनां च तथा दक्षादीनां मुनीश्वर ।
ततो लोकेश्वरस्यात्र सूर्यस्य परमात्मनः ॥
वंशानुकीर्तनं ब्रह्मन्महापातकनाशनम् ।
यत्रावतारः कथितः परमानंदरूपिणः ॥
श्रीमतो रामचंद्रस्य चतुर्व्यूहावतारिणः ।
ततश्च सोमवंशस्य कीर्तनं यत्र वर्णितम् ।
कृष्णस्य जगदीशस्य चरितं कल्मषापहम् ॥
द्वीपानां चैव सिंधूनां वर्षाणां वाऽप्यशेषतः ।
वर्णनं यत्र पातालस्वर्गाणां च प्रदृश्यते ॥
नरकानां समाख्यानं सूर्यस्तुतिकथानकम् ।
पार्वत्याश्च तथा जन्म विवाहश्च निगद्यते ॥
दक्षाख्यानं ततः प्रोक्तं एकाम्रक्षेत्रवर्णनम् ।

पूर्वभागोऽयमुदितः पुराणस्यास्य मानद ॥
( तदुत्तरभागे । ) अस्योत्तरविभागे तु पुरुषोत्तमवर्णनम् ।
योगानां च समाख्यानं सांख्याना चाऽपि वर्णनम् ॥
ब्रह्मवादसमुद्देशः पुराणस्य च शासनम् ।
एतद् ब्रह्मपुराणं तु भागद्वयसमर्चितम्[1] ॥
वर्णितं सर्वपापघ्नं सर्वसौख्यप्रदायकम् ॥

नारद पु०, ४-२ अ

या सूचीवरून प्रचलित ब्रह्मपुराण नारदपुराणाच्या वेळीं असेंच होतें हें कळून येतें. पाश्चात्य लोक म्हणतात कीं, प्रचलित ब्रह्मपुराणात पाच लक्षणे नाहींत; पण सूक्ष्मदृष्ट्या पहाता यात तीं सर्व लक्षणे असलेलीं दिसून येतील.

हें पुराण इ. स. च्या १३ व्या किंवा १४ व्या शतकात बनलें असें विल्सनचें मत आहे, पण तें बरोबर नाहीं, कारण ११ व्या शतकातील **दानसागरांत** व त्याच वेळच्या हलायुधकृत **ब्राह्मणसर्वस्वांत** व हेमाद्रीच्या ग्रंथांतून या पुराणातील उतारे आढळतात.

या पुराणाच्या १७६ व्या अध्यायात अनंत वासुदेवाचें माहात्म्य वर्णिलेलें आहे. उत्कल ( ओडिसा ) देशाच्या प्रसिद्ध भुवनेश्वर क्षेत्रात अनंत वासुदेवाचें मंदिर विद्यमान आहे. तेथील सामवेदिगणाचा पद्धतिकार अद्वितीय पंडित भवदेवभट्ट यानें आपल्या पूर्वीच असलेल्या अनंत वासुदेवाचें मंदिराचा ११ व्या शतकात जीर्णोद्धार केला. ब्रह्मपुराणात अनंत वासुदेवाची मूर्ति, तिची उत्पत्ति व तिचें माहात्म्य आहे, पण या मंदिराचा तेथें संबंध नाहीं. त्यात या मंदिराचा उल्लेख नाहीं. वर्तमान पुरुषोत्तम-

---

१ ' समन्वितम् ' असाही पाठ आहे.

प्रासादा ( मंदिरा ) चें माहात्म्य ' पुरुषोत्तम-माहात्म्य ' यांत आहे; तेथें ' गांगेय ' पद आहे. हल्लींचें पुरुषोत्तममंदिर गंगेश्वर चौड यानें बांधिलें. हा इ.स. १०७७ मध्यें कलिंग देशाचा अधिपति झाला. त्यानंतर ३०-३५ वर्षांनीं म्हणजे इ. स. ११०७ ते १२ पर्यंत त्यानें पुरुषोत्तम मंदिर बांधिलें ! हा चौड गंगेश्वर व बल्लाळसेन ( दानसागराचा कर्ता ) हे दोघेही समकालीन होते. दानसागरांत ब्रह्मपुराणांतील उतारे आहेत हें वर सांगितलेलेंच आहे, यावरून प्रचलित ब्रह्मपुराण वरील जगन्नाथमंदिराहून प्राचीनतर आहे हें सिद्ध होतें. सेन राजांपैकीं लक्ष्मण राजाच्या शिलालेखांत पुरुषोत्तम क्षेत्राचा उल्लेख आहे. सातव्या शतकांतील चिनी प्रवासी ह्युएन्सांग यानें ' चित्रोत्पल ' पुरीस येऊन तेथील पांच प्रासादाच्या उंच शिखरांचें अवलोकन केलेलें होतें. यावरून गंगेश्वरानें बांधिलेल्या प्रासादापूर्वी उत्कल देशांत पुरुषोत्तमप्रासाद होता. नवीन नवीन देवळें होतात; कित्येक जीर्णोद्धारही होतात. यामुळें, वरील प्रमाणानें जगन्नाथाच्या देवळानंतर हें पुराण झालें असें मानतां येत नाहीं.

प्रायः सर्व देशी व विदेशी पंडित म्हणतात कीं, प्रचलित विष्णुपुराण हल्लींच्या सर्व पुराणांत प्राचीन आहे. ब्रह्मपुराणांतील कृष्णचरित्र व विष्णुपुराणांतील कृष्णचरित्र यांची, व तशीच ब्रह्मपुराणांतील पुरुषोत्तम-माहात्म्य व नारदमहापुराणांतील पुरुषोत्तममाहात्म्य यांची—तुलना करून पहातां असें दिसून येईल कीं, ब्रह्मपुराणावरूनच विष्णुपुराण व नारदपुराणानीं आपापले भाग वाढवून तयार केलेले आहेत. (ब्रह्मपु० अ. १८-२१ ते २४ श्लोक यांची तुलना विष्णुपुराण, अंश ५-१३ अध्याय, श्लोक २३ ते २८ व ८२ यांशीं करून पहा. तसेंच, ब्रह्मपु० ५०-श्लोक ४८-५६ यांची तुलना नारदपुराण, पूर्वभाग, ५४ अध्याय, श्लोक ५८-६५ यांशीं करून पहा. ) यावरून कळून येईल कीं, विष्णु व नारद यांपेक्षां ब्रह्मपुराणच प्राचीन आहे.

एवढेंच नव्हे तर ब्रह्मपुराणातील अनेक प्रसंग महाभारताच्या अनुशासनपर्वात जशाचे तसेच उतरून घेतलेले आहेत. ब्रह्मपु० २२३ते२२५ अध्याय व अनुशासनपर्व १४३ ते १४५ अध्याय; तसेंच ब्रह्मपुराणाचा २२६ वा अध्याय व अनुशासनाचा १४६ वा अध्याय सारखे आहेत. यावरून, कित्येक असें अनुमान करितात कीं, महाभारतावरूनच ब्रह्मपुराणानें हे अध्याय घेतले; पण, अनुशासनात—

इदं चैवापरं देवि ब्रह्मण्यं समुदाहृतम् । १४३–१६, व
पितामहमुखोत्सृष्टं प्रमाणमिति मे मतिः १४३–१८.

या वाक्यावरून ब्रह्मपुराणावरूनच महाभारतानें हे श्लोक घेतले आहेत हें सिद्ध होतें.*

वास्तविक पहाता पुराणाचा उद्देश जो वेदोपबृंहण, तो या पुराणात आहे. यात तीर्थवर्णनप्रसंगात अनेक वैदिक उपाख्यानें आलेलीं आहेत. ऋक्संहिता, साख्यायनब्राह्मण, ऐतरेय ब्राह्मण, बृहद्देवता इत्यादि वैदिक ग्रंथातील उपाख्यानें या पुराणात आढळतात. यामुळें यात पुष्कळ आर्ष प्रयोग वगैरे आढळतात. व्याडीनें विकृतिवल्लींत उतरून घेतलेला श्लोक याच पुराणातला असण्याचा संभव आहे. ( पृ. १६ पहा. )

गौडपादाचार्यांनीं उत्तरगीताटीकेंत ' पुराणानि ब्राह्मादीनि ' असा याचा उल्लेख केलेला आहे. बाराव्या शतकातील अपरादित्यानें यातील उतारे घेतलेले आहेत. असो.

मत्स्यपुराणमतें हें १३ हजार श्लोकाचें आहे. दुसऱ्या पाठाप्रमाणें व इतर पुराणप्रमाणें हें १० हजाराचें आहे. दोनशे त्रेचाळीस अध्यायाचें हल्लीं जें ब्रह्मपुराण मिळत आहे त्यात १३ हजारावर काहीं अधिक श्लोक

* हरिवंशाचे व ब्रह्मपुराणाचेही काहीं भाग सारखे आढळतात.

आहेत. दुसरें एक आदिब्रह्मपुराण म्हणून मिळतें; त्यांत जरूर ८००० श्लोक व १२५ अध्याय आहेत; यावरून १० हजार लक्षणाचा हाच ग्रंथ असावा. पुण्यास छापलेल्या ब्रह्मपुराणांत १३,७८३ श्लोक आहेत. मत्स्य-पुराणांत सांगितल्यापेक्षां यांत ७८३ श्लोक अधिक आहेत; ते लेखकप्रमादानें किंवा माहात्म्यरूपानें वाढलेले दिसतात. आदिब्रह्मपुराण लखीमपूर व लखनौमध्यें छापलेलें आहे.

ब्रह्मपुराण ( १३००० वर श्लोकांचें व २४३ अध्यायांचें ) व आदि-ब्रह्मपुराण ( १२५ अध्यायांचें ) यांत बरेंच साम्य आहे. आदिब्रह्मपुराणांत प्रचलित ब्रह्मपुराणांतील बहुतेक कथा मिळतात. यांवरून हें आदि-ब्रह्मपुराण कदाचित् त्यावर संस्कार होण्यापूर्वीचें असावें. हल्लींच्या पुराणांतून अनेक ठाई आदिपुराणांचा उल्लेख येतो; यावरून मूळ पुराणें पूर्वी असलीं पाहिजेत हें अनुमान पूर्वी काढिलेलेंच आहे; व तीं एकच नसून अनेक होतीं. आदिब्रह्मपुराण हें व्यासांच्या आदि-पुराणांपैकीं एक असावें, असें वाटतें. विल्सन यास सांपडलेल्या ब्रह्म-पुराणांत ७ ते ८ हजार श्लोक होते; तेव्हां त्यास हेंच आदिब्रह्मपुराण मिळालें असावें. त्यास ब्रह्मोत्तरपुराण म्हणून आणखी सुमारें ३ हजार श्लोक असलेला भाग मिळाला होता. याप्रमाणें सुमारें १० हजारांवर ब्रह्म व ब्रह्मोत्तर मिळून त्याची श्लोकसंख्या झाली होती. वरील ब्रह्मो-त्तरपुराण हें स्कंदपुराणांतील ब्रह्मोत्तरखंडाहून भिन्न होय. ब्रह्मोत्तर-पुराण स्वतंत्र ग्रंथ असावा, असा विल्सनचा तर्क आहे.

पुराणांच्या यादीमध्यें ब्रह्मपुराणासच अग्रस्थान दिलेलें असल्यामुळें, यास ' आदिपुराण ' असेंही म्हणण्याची चाल आहे; तसेंच यांत सूर्याचें माहात्म्य असल्यामुळें यास सौरपुराणही म्हणतात; पण ' आदि-पुराण ' व ' सौरपुराण ' नांवांचीं दुसरीं उपपुराणेंही आहेत; त्यांशीं या महापुराणाचा घोटाळा मात्र करूं नये.

दुसरी एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट या पुराणाबद्दल लक्षात ठेवावयाची ती अशी कीं, भारताच्या ( बंगाली प्रतीच्या ) शांतिपर्वातील अध्याय ३०० पासून ३०९ पर्यंतचे ४७६ श्लोक आनंदाश्रमांत छापलेल्या ब्रह्मपुराणांतील अध्याय २३८ ते २४५ पर्यंतच्या ४७६ श्लोकांशीं अक्षरशः जुळतात. हा वसिष्ठकरालजनकसंवाद दोन्ही ठिकाणीं अगदीं सारखा आहे. यावरून, भारताच्या सद्यःस्वरूपाच्या काळीं ब्रह्मपुराणात हे अध्याय होते व त्यांतूनच हे अध्याय भारतकाराने घेतले असावेत हे कळून येईल. *

## पद्मपुराण, २ रें.

प्रचलित पद्मपुराण सृष्टि आदि पाच खंडांत विभक्त आहे. मत्स्यपुराणांत ( ५३।१४ ) याचे लक्षण असे दिलेले आहे:—

> एतदेव यदा पद्म हाभूद्धैरण्मयं जगत् ।
> तद्वृत्तांताश्रयं तद्वत्पाद्ममित्युच्यते बुधैः ॥
> पाद्मं तत्पंचपंचाशत्सहस्राणीति पठ्यते ।

हल्लींच्या पाताल व उत्तरखंडांतील कित्येक भागावर ते पुराणक्रमाला धरून नाहींत असे आक्षेप आहेत. याकरिता याचे लक्षण नीट तपासून पाहूं. सृष्टिखंडाच्या ३६ व्या अध्यायांत, मत्स्यांत जसे लक्षण सांगितलें आहे त्याचप्रमाणें माहिती आहे:—

> पद्मरूपमभूदेतत्कथं पद्ममयं जगत् ।
> कथं च वैष्णवी सृष्टिः पद्ममध्येऽभवत्पुरा ॥

---

* तसेंच, ब्रह्म व विष्णुपुराण यांतील कृष्णचरिताचे श्लोक अगदीं सारखे आहेत.

कथं पाद्मे महाकल्पेऽभवत्पद्ममयं जगत् ।
जलार्णवगतस्येह नाभौ जातं जलोद्भवम् ॥२-३॥

या पुराणांतील सृष्टिखंडांत याविषयीं अशी माहिती आहे कीः—

पाद्मं तत्पंचपंचाशत्सहस्राणीह पठ्यते ।
पंचभिः पर्वभिः प्रोक्तं संक्षेपाद्व्यासकारणात् ॥
पौष्करं प्रथमं पर्व यत्रोत्पन्नः स्वयं विराट् ।
द्वितीयं तीर्थपर्व स्यात् सर्वग्रहगणाश्रयम् ॥
तृतीयपर्वग्रहणे राजान्ता भूरिदक्षिणाः ।
वंशानुचरितं चैव चतुर्थं परिकीर्तितम् ।
पंचमे मोक्षतत्त्वं च सर्वज्ञत्वं निगद्यते । सृष्टिखंड,१-५४-२६.

यावरून एके काळीं यात पांच पर्वें व ५५ हजार श्लोक होते हें कळून येईल. पर्वांचीं नावें (१) पौष्करपर्व, (२) तीर्थपर्व, (३) राजपर्व ? (४) वंशानुचरितपर्व, (५) मोक्षपर्व. सृष्टिखंडांत याप्रमाणे पर्वविभाग सांगितलेला असूनही, दक्षिणेस प्रचलित असलेल्या पद्मपुराणाच्या उत्तरखंडांत खंडात्मक विभाग सांगितलेले आहेतः—

प्रथमं सृष्टिखंडं च द्वितीयं भूमिखंडकम् ।
पातालं च तृतीयं स्यात् चतुर्थं पुष्करं तथा ॥
उत्तरं पंचमं प्रोक्तं खंडान्यनुक्रमेण वै ।
एतत्पाद्मपुराणं तु व्यासेन च महात्मना ।
कृतं लोकहितार्थाय ब्राह्मणश्रेयसे तथा ॥अ० १, ६६-६८.

सृष्टिखंड, भूमिखंड, पातालखंड, पुष्करखंड व उत्तरखंड, असे पांच खंड यात सांगितलेले आहेत. प्रचलित पद्मपुराणांत पुष्कर-

खंडाचा ( ४ थ्या ) संपूर्ण अभाव असून, कांहीं अध्यायांत मात्र पुष्कर-माहात्म्य वर्णिलेलें आहे.

*गौडदेशांतील उत्तरखंडांत मात्र खालील वर्णन आहे:—*

एतदादिपुराणं वः कथितं बहुविस्तरम् ।
पद्माख्यं सर्वपापघ्नं पंचपर्वात्मकं द्विजाः ॥
प्रथमं सृष्टिखंडं तु द्वितीयं भूमिखंडकम् ।
तृतीयं स्वर्गखंडं च तुर्यं पातालखंडकम् ॥
पंचमं तूत्तरं खंडं प्रत्येकं मोक्षदायकम् ॥
परिशिष्टं क्रियायोगसारं वक्ष्यामि वः पुनः ।

यावरून, यात सृष्टिखंड, भूमिखंड, स्वर्गखंड, पाताळखंड, उत्तरखंड ( व परिशिष्टरूपी क्रियायोगसार ) असे विभाग केलेले आहेत हे कळून येईल. नारदपुराणांत गौड पाद्मोत्तराप्रमाणेंच पांच खंड घेतलेले आहेत; द्वितीय खंडाच्या ( भूमिखंडाच्या ) १२५ व्या अध्यायांतही ( ४८–५० ) सृष्टि-खंड, भूमिखंड, स्वर्गखंड, पातालखंड व उत्तरखंड, असेच पांच खंड दिलेले आहेत; क्रियाखंडाचें नांव नाहीं; स्वर्गखंडाच्या आरंभीं मात्र ६ खंडांचे नांव ऐकूं येऊं लागले आहे, पहा:—

सहस्रं पंचपंचाशत् षड्भिः खंडैः समन्वितम् ।
तत्राद्यादिखंडं स्यात् भूमिखंडं ततः परम् ॥
ब्रह्मखंडं ततः पश्चात् ततः पातालखंडकम् ।
क्रियाखंडं ततः ख्यातं उत्तरं खंडमंतिमम् ॥

स्वर्गखंड, १–२२ ते २४.

यांत आदिखंड, भूमिखंड, ब्रह्मखंड, पाताळखंड, क्रियाखंड, व उत्तर-खंड असे सहा खंड झालेले आहेत, तुलनेकरितां चारी एकदम देतों:

| दाक्षि. उत्तरखड | भूमिखंड. | स्वर्गखड. | गौड उत्तरखड |
|---|---|---|---|
| सृष्टिखड | सृष्टिखड | आदिखड | सृष्टिखंड |
| भूमिखड | भूमिखड | भूमिखड | भूमिखड |
| पाताल्खंड | स्वर्गखड | ब्रह्मखड | स्वर्गखंड |
| पुष्करखंड | पातालखड | पातालखड | पातालखड |
| उत्तरखड | उत्तरखड | क्रियाखड | उत्तरखड |
| . | | उत्तरखड | क्रियायोगसार |

हे ब्रह्मखड कांहीं मूळच्या पांच खडांत नव्हते, हे भूमिखडांतील, गौड पाद्मोत्तरखडातील व नारदपुराणांतील खडविभागावरून करून येईल, मग हे ब्रह्मखड आलें कोठून ? याविषयीं थोडासा विचार करूं.

ब्रह्मखडांत एकदर २६ अध्याय व १०६८ श्लोक आहेत, यांत वैष्णव मताचे विषय आहेत. यास 'स्वर्गोत्तरखड' हीं म्हटलेलें आहे. 'स्वर्गा त्तरमिम सम्यक् श्रुत्वा स्वर्गोत्तर व्रजेत्' यांच्या २६–४२ श्लोकांत यास ब्रह्मखड म्हटलेलें नाहीं. शेवटीं 'स्वर्गोत्तरापरनामक ब्रह्मखड सपूर्णम्' असें म्हटलेलें आहे हा मूळच्या पद्मपुराणाचा भाग नसून नंतर वैष्णवमतप्रचाराच्या वेळीं कोणीं तरी यास जोडिला असावा स्वर्गोत्तर या नावावरूनच, हीं स्वर्गखडाचा पुरवणी करून जोडिली आहे हे उघड होतें, शिवाय, चौथ्या पाताळखडाच्या प्रारभीं जीं वाक्यें आहेत, त्यावरून एके काळीं याचें अस्तित्व बिल्कुल नव्हतें हे सिद्ध होतें पहा —पाताळ खडारभीं म्हणतात कीं —

श्रुत सर्व महाभाग स्वर्गखड मनोहरम् । ४–१–२

यात 'स्वर्गोत्तर मनोहरं 'अगर' ब्रह्मखड मनोहर ' असें बिल्कुल म्हटलेलें नाहीं. यावरूनच हे ब्रह्मखड प्रक्षिप्त आहे हे करून येईल.

आतां नारदपुराणानें या पुराणाची विषयानुक्रमणी कशी दिली आहे हें पाहूं:-

शृणु पुत्र प्रवक्ष्यामि पुराणं पद्मसंज्ञकम् ।
महत्पुण्यप्रदं नृणां शृण्वतां पठतां मुदा ॥
यथा पंचेंद्रियः सर्वः शरीरीति निगद्यते ।
तथेदं पंचभिः खंडैरुदितं पापनाशनम् ॥

( सृष्टिखंडे ) .

पुलस्त्येन तु भीष्माय सृष्ट्यादिक्रमतो द्विज ।
नानाख्यानेतिहासाद्यैर्यत्रोक्तो धर्मविस्तरः ॥
पुष्करस्य तु माहात्म्यं विस्तरेण प्रकीर्तितम् ।
ब्रह्मयज्ञविधानं च वेदपाठादिलक्षणम् ॥
दानानां कीर्तनं यत्र व्रतानां च पृथक् पृथक् ।
विवाहः शैलजायाश्च तारकाख्यानकं महत् ॥
माहात्म्यं च गवादीनां कीर्तितं सर्वपुण्यदम् ।
कालकेयादिदैत्यानां वधो यत्र पृथक् पृथक् ॥
ग्रहाणामर्चनं दानं यत्र प्रोक्तं द्विजोत्तम ।
तत्सृष्टिखंडमुद्दिष्टं व्यासेन सुमहात्मना ॥

( भूमिखंडे. )

पितृमात्रादिपूज्यत्वे शिवशर्मकथा पुरा ।
सुव्रतस्य कथा पश्चात् वृत्रस्य च वधस्तथा ॥
पृथोर्वैन्यस्य चाख्यानं धर्माख्यानं ततः परम् ।

पितृशुश्रूषणाख्यानं नहुषस्य कथा ततः ॥
ययातिचरितं चैव गुरुतीर्थनिरूपणम् ।
राज्ञा जैमिनिसंवादो बह्वाश्चर्यकथा तथा ॥
कथा ह्यशोकसौंदर्या हुंडदैत्यवधान्विता ।
कामोदाख्यानकं तत्र विहुंडवधसंयुतम् ॥
कुंडलस्य च संवादश्च्यवनेन महात्मना ।
सिद्धाख्यानं ततः प्रोक्तं खंडस्यास्य फलोदयम् ॥
सूतशौनकसंवादं भूमिखंडमिदं स्मृतम् ।

( स्वर्गखंडे. )

ब्रह्मांडोत्पत्तिरुदिता यत्रर्षिभिश्च सौतिना ।
सभूमिलोकसंस्थानं तीर्थाख्यानं ततः परम् ॥
नर्मदोत्पत्तिकथनं तत्तीर्थानां कथाः पृथक् ।
कुरुक्षेत्रादितीर्थानां कथाः पुण्याः प्रकीर्तिताः ॥
कालिंदीपुण्यकथनं काशीमाहात्म्यवर्णनम् ।
गयायाश्चैव माहात्म्यं प्रयागस्य च पुण्यकम् ॥
वर्णाश्रमानुरोधेन कर्मयोगनिरूपणम् ।
व्यासजैमिनिसंवादः पुण्यकर्मकथाचितः ॥
समुद्रमथनाख्यानं व्रताख्यानं ततः परम् ।
ऊर्जपंचाहमाहात्म्यं स्तोत्रं सर्वापराधनुत् ॥
एतत्स्वर्गाभिधं विप्र ! सर्वपातकनाशकम् ॥

( पातालखंडे. )

रामाश्वमेधे प्रथमं रामराज्याभिषेचनम् ।

अगस्त्याद्यागमश्चैव पौलस्त्याय च कीर्तनम् ॥
अश्वमेधोपदेशश्च हयचर्या ततः परम् ।
नानाराजकथाः पुण्या जगन्नाथानुवर्णनम् ॥
वृन्दावनस्य माहात्म्यं सर्वपापप्रणाशनम् ।
नित्यलीलानुकथनं यत्र कृष्णावतारिणः ॥
माघस्नानमाहात्म्ये स्नानदानार्चने फलम् ।
धरावराहसंवादो यमब्राह्मणयोः कथा ॥
संवादो राजदूतानां कृष्णस्तोत्रनिरूपणम् ।
शिवशंभुसमायोगो दधीच्याख्यानकं ततः ॥
भस्ममाहात्म्यमतुलं शिवमाहात्म्यमुत्तमम् ।
देवरातसुताख्यानं पुराणज्ञप्रशंसनम् ॥
गौतमाख्यानकं चैव शिवगीता ततः स्मृता ।
कल्पांतरी रामकथा भरद्वाजाश्रमस्थितौ ॥
पातालखंडमेतद्धि शृण्वता ज्ञानिनां सदा ।
सर्वपापप्रशमनं सर्वाभीष्टफलप्रदम् ॥

( उत्तरखंडे. )

पर्वताख्यानकं पूर्वं गौर्यै प्रोक्तं शिवेन वै ।
जालंधरकथा पश्चात् श्रीशैलाद्यनुकीर्तनम् ॥
सगरस्य कथा पुण्या ततः परमुदीरिता ।
गंगाप्रयागकाशीनां गयायाश्चापि पुण्यकम् ॥
अन्नादिदानमाहात्म्यं तन्महाद्वादशीव्रतम् ।

चतुर्विंशैकादशीनां माहात्म्यं पृथगीरितम् ॥
विष्णुधर्मसमाख्यानं *विष्णुनामसहस्रकम् ।
कार्तिकव्रतमाहात्म्यं माघस्नानफलं ततः ॥
जंबुद्वीपस्य तीर्थानां माहात्म्यं पापनाशनम् ।
साभ्रमत्याश्च माहात्म्यं नृसिंहोत्पत्तिवर्णनम् ॥
देवशर्मादिकाख्यानं गीतामाहात्म्यवर्णने ।
भक्ताख्यानं च माहात्म्यं श्रीमद्भागवतस्य ह ॥
इंद्रप्रस्थस्य माहात्म्यं बहुतीर्थकथाचितम् ।
मंत्ररत्नाभिधानं च त्रिपाद्भूत्यनुवर्णनम् ॥
अवतारकथाः पुण्या मत्स्यादीनामतः परम् ।
रामनामशतं दिव्यं तन्माहात्म्यं च वाडव ॥
परीक्षणं च भृगुणा श्रीविष्णोर्वैभवस्य च ।
इत्येतदुत्तरं खंडं पंचमं सर्वपुण्यदम् ॥

यावरून पहातां असें आढळेल कीं मत्स्यपुराणातील लक्षण व नारदपुराणांतील अनुक्रमणी याप्रमाणें प्रचलित पद्मपुराणात सर्व विषय आहेत; *परंतु पूर्वीचा मूळ खंडविभाग हल्लीं बदलून गेलेला आहे.* प्रचलित पुराणावर यावरून तीनचार संस्कार झालेले आहेत असें सहज कळून येईल.

( १ ) पहिल्या संस्करणांत पद्मपुराणांत प्रथम दाखविलेलीं पुष्कर आदि

---

* श्रीशंकराचार्यांनीं विष्णुसहस्रनामभाष्यांत व सनत्सुजातीयभाष्यांत पाद्मपुराणातील उतारे घेतलेले आहेत, इतकेंच नव्हे तर या पुराणांतील वासुदेवसहस्रनामावरही त्यांची टीका आहे. ( भागवतपुराणाचें निरीक्षण पहा. )

पांच पर्वें होतीं. तेव्हां खंडात्मक विभाग नव्हते. सृष्टिखंडांत ( वर दिलेल्या उताऱ्यांत ) या पंचपर्वात्मक पाद्माचाच उल्लेख आहे.

( २ ) प्रथम संस्करणांत पौष्करपर्व पहिलें धरिलें *असूनही* दुसऱ्या संस्करणांत पौष्कर दुसऱ्या खंडात घालण्यात आलें व सृष्टिखंडानें पहिले स्थान पटकावलें ! दाक्षिणात्य पाद्मोत्तरखंडावरून ही व्यवस्था कळून येते !

( ३ ) तिसऱ्या संस्करणात पौष्करखंडाचा अजी लोपच झाला; किंवा सृष्टिखंडाच्या पौष्करमाहात्म्यातच त्याचा अंतर्भाव करण्यात आला व स्वर्गखंडानें पौष्कराची जागा बळकावली ! पद्मपुराण ( गौडीय ) व नारदपुराण *यावरून या तिसऱ्या संस्करणाची माहिती मिळते.*

( ४ ) यानंतरही चौथें संस्करण या पुराणास मिळालें असावें. दाक्षिणात्यांनीं ब्रह्मखंड ऊर्फ स्वर्गोत्तरखंड म्हणून स्वर्गखंडानंतर मध्येंच एक *उंटाचें पिलूं घालून दिलें, शिवाय, त्याचा वेगळाही अनुक्रम असा आहेः—* आदिखंड, भूमिखंड, ब्रह्मखंड, पातालखंड, सृष्टिखंड व उत्तरखंड.

आणण्यासाठीं त्यांनीं या पुराणांतून श्लोकावलि घुसडून दिलेली आहे! पाखंड्यांचे लक्षण, मायावादनिंदा, 'तामस' पुराणवर्णन, ऊर्ध्वपुंड्रादिधारण, द्वैतवादाची ख्याति इत्यादि विषय तिसऱ्या संस्करणाच्या वेळीं असते तर ते नारदपुराणाच्या सूचींत आले असते! चौथ्या संस्करणांत या सर्व आधुनिक कथा घुसडल्या गेल्या आहेत! उत्तरखंड, (२६३—६६ ते ८९ पहा;) तामसशास्त्रें, (उत्तर, अ. २३५ श्लो. २–१३ पहा;) तामसपुराणें तेथेंच श्लोक १८–२६ पहा). याप्रमाणें २३५ व्या अध्यायांत, *मत्स्य,कूर्म,लिंग, शिव व स्कंद* या पुराणांस व तसेंच,*गौतम,बृहस्पति, संवर्त*, यम, सांख्य, व उशना या स्मृतींस तामस व नरकप्रद ठरविलेले आहे! तसेंच, पाखंड्याची व्याख्या अशी ठरविली आहे!

*शंखचक्रोर्ध्वपुंड्रादिचिन्हैः प्रियतमैर्हरेः ।*
*रहिता ये द्विजा देवि ! ते वै पाखंडिनः स्मृताः ॥*

उत्तरखंड, २३५–५.

याप्रकारे यात संप्रदायद्वेषमूलक मजकूर आहे; हा मजकूर व्यासांचा असणें शक्यच नाहीं! हा मतवाद्याचाच आहे. संप्रदायाचा द्वेष एकेवेळीं इतका वाढला होता, कीं त्यामुळें पुराणांत देखील, नवीन मजकूर घुसडून मतवाले आपल्या मनाची (परमताच्या द्वेषाची) हौस पुरी करून घेत असत, असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें.

स्वर्गोत्तर *ऊर्फ ब्रह्मखंड*, उत्तरखंडाचा कांहीं भाग व *क्रियायोगसार* हे भाग मूळच्या पद्मपुराणांत असल्याप्रमाणें दिसत नाहींत.

या पुराणाची अध्यायसंख्या व श्लोकसंख्या येणेंप्रमाणें आहे:—

| | अ. | श्लोक. |
|---|---|---|
| १ सृष्टिखंड... | ८२— | ११०५२. |
| २ भूमिखंड... | १२५— | ६५४०. |

३ स्वर्गखंड... ६२—३११९. हें खंड'आदिखंडा'शीं *बरेंच मिळतें.
४ पातालखंड... ११७—९४८०.
५ उत्तरखंड... २२५— २८२. यात दोन प्रतींत वेगळाली अध्यायसंख्या आहे. वेंकटेश्वरप्रतींत २२५ अ. व अष्टादश पुराणदर्पणकार पं. ज्वालाप्रसादजींस एका पोथींत २८२ अध्याय मिळाले.
[ स्वर्गोत्तर ऊर्फ *ब्रह्मखंड...२६ अ.—१०६८ श्लोक.* ]
[ क्रियायोगसार ...२६. ]

या पुराणाच्या वरील इतिहासावरून एवढें कळून येईल कीं, मतवाद्यांनीं पुराणात गडबड केली तरी ते मूळ भाग काढून न टाकितां नवीन भाग तेवढे जोडून देतात जसें, *या पुराणात, स्वर्गखंडास स्वर्गोत्तर* ऊर्फ ब्रह्मखंड, उत्तरखंडाचे कांहीं अध्याय व संपूर्ण क्रियायोगसार हीं मतप्रावल्याचे काळीं जोडलेलीं दिसतात. नारदपुराणाच्या सूचींत हे भाग नाहींत.

स्वर्गखंडाच्या प्रारंभीं मात्र ब्रह्मखंड ऊर्फ स्वर्गोत्तरखंड व क्रियाखंड यांचा उल्लेख आहे, यावरून स्वर्गखंडाच्या पहिल्या अध्यायात ही अनुक्रमणिका नंतर जोडलेली आहे हें कळून येईल. ब्रह्मखंड ऊर्फ स्वर्गोत्तरखंड, उत्तरखंडाचे कांहीं अध्याय व क्रियायोगसार हे भाग जोडल्यानंतर वरील अनुक्रमणी स्वर्गखंडाच्या पहिल्या अध्यायास जोडली असावी.

---

* स्वर्गखंडाच्या शेवटीं असें म्हटलेलें आहे —
**तथादिमं स्वर्गमिदं सर्वपापप्रफलप्रदम् ।**
**स्वर्गखंडं समाकर्ण्य ... ... ...** ॥ स्वर्ग ३-६२-१०
यावरून स्वर्गखंडामच आदिखंड किंवा आदिस्वर्गखंड म्हणत असत हें कळून येईल.

भूमिखंडाच्या अखेरीस जरा गमतीचा मजकूर आढळतो तोही येथें देऊन ठेवितों:—

येन श्रुतमिदं पुण्यं पुराणं पद्मसंज्ञकम् ।
सर्वं हि साधितं तेन चतुर्वर्गस्य साधनम् ॥ १९ ॥
पुराणसंहिता पूर्णा श्रोतव्या धर्मतत्परैः ।
सपादं लक्षमेकं तु ब्रह्माख्यं पुष्करं शृणु ॥ ३९ ॥
कृते युगे तु निष्पापाः शृण्वंति मनुजा द्विज ! ।
लक्ष्यास्यार्धं ततः कृत्स्नं पुराणं पद्मसंज्ञकम् ॥ ४० ॥
श्लोकानां तु सहस्राभ्यां द्वाभ्यामेव तथाधिकम् ॥ ४१ ॥
त्रेतायुगे तथा प्राप्ते यदा श्रोष्यंति मानवाः ॥
द्वाविंशतिसहस्राणि संहिता पद्मसंज्ञिता ॥ ४२ ॥
द्वापरे कथिता विप्र ब्रह्मणा परमात्मना ।
द्वादशैव सहस्राणां पद्माख्या सा तु संहिता ॥ ४३ ॥
कलौ युगे पठिष्यंति मानवा विष्णुतत्पराः ।
द्वादशैव सहस्राणि नाशं यास्यंति सत्तम ॥ ४४ ॥
कलौ युगे तु संप्राप्ते प्रथमं हि भविष्यति ॥

या श्लोकांचा काय अर्थ करावा हेंच मला समजत नाहीं ! पूर्वी पद्मपुराण १¼ लक्ष कृतयुगांत होतें, तें त्रेतायुगांत ५२००० झालें ! द्वापारयुगांत २२००० झालें ! व कलींत १२००० राहील ! ! ! पुनः कलींत तें पूर्वींप्रमाणें वाढेल ! सारांश, या श्लोकांवरूनही या पुराणावर चार संस्करणें झाल्याचें कळून येईल.

पातालखंडांत जी रामाची कथा आलेली आहे ती कालिदासाच्या

रघुवंशांतील कथेशीं जुळत आहे असें कित्येकाचें मत आहे ! यांतील रामाश्वमेधाचें प्रकरण मात्र नवीन आहे असें विल्सनचें मत आहे. पद्मपुराणांत मोठाल्या लांबलचक कथा अशा आहेत, कीं त्या कित्येक भारतातील कथाशीं जुळतात. भारत, वनपर्व—यातील तीर्थवर्णनाचा बराच भाग पद्मपुराणातील तशाच भागाशीं जुळतो, असें दुसऱ्या एक युरोपियन शोधकाचें मत आहे. पद्मपुराणातील रामकथा रामायणाप्रमाणें नसून रघुवंशातील कालिदासाच्या कथेप्रमाणें आहे, असें कित्येकाचें मत वर दिलेलेंच आहे ! काहीं ठिकाणीं पद्मपुराण व कालिदास याची शब्दरचना-देखील सारखी आहे असें म्हणतात ! तसेंच, शकुंतलेची कथा महाभारता-प्रमाणें या पुराणात नसून, कालिदासाच्या शाकुंतल नाटकातील गोष्टी-प्रमाणें आहे, असें म्हणतात ! या गोष्टींचा शोध करून पहाणें मला झालें नाहीं. पुढच्या शोधकासाठीं माहिती देऊन ठेविली आहे. एवढें मात्र खरें कीं, अशी तुलना केल्यानें कित्येक वेळा नवा प्रकाश पडून ग्रंथाच्या त्या त्या भागाचे काळ ठरूं शकतात. कालिदासाच्या रघुवंश व शाकुंतल यातील कथाशीं जर पद्मपुराणातील कथाचें साम्य असेल तर दोन गोष्टी संभवतात. ( १ ) कालिदासापेक्षा पद्मपुराणातील कथाचें हें स्वरूप प्राचीनतर असून कालिदासानें या गोष्टी या पुराणातून घेतल्या ! ( २ ) किंवा कालिदासानंतर पद्मपुराणात या गोष्टी घालण्यात आल्या ! या दोहोंपैकीं कोणता विचार पत्करावा हें शोध करून पाहिल्यावांचून कळावयाचें नाहीं.

पद्मपुराणातील पातालखंडात रामाश्वमेधपर्व म्हणून एक पर्व आहे; त्याच्या ६५ व्या अध्यायात वाल्मीकीनें रामायण कसें व केव्हां रचिलें हें सांगत असतां, ओघात वाल्मीकिरामायणाचें कांडशः सार दिलेलें आहे. त्यांत बालकांडातच अयोध्याकांडाचा समावेश असून बालकांडा-नंतर लगेच आरण्यकांड आलेलें आहे, पहा:—

तत्र बाले मुनिकृतपुत्रेष्ट्या चतुरः सुतान् ।
प्राप पंक्तिरथः साक्षात् हरिं ब्रह्म सनातनम् ॥ ६४ ॥
स कौशिकमखं गत्वा सीतां उह्याथ भार्गवम् ।
आगत्य पुरमुत्कृष्टं यौवराजप्रगल्भकः ॥ ६५ ॥
मातृवाक्याद्वनं प्रागाद्गंगामुत्तीर्य पर्वतम् ।
चित्रकूटं महिलया लक्ष्मणेन समन्वितः ॥ ६६ ॥
भरतस्तु वने श्रुत्वा जगाम भ्रातरं नयी ।
तमप्राप्य स्वयं नंदीग्रामे वासमचीकरत् ॥
बालमेतत्; शृणुष्वान्यदारण्यकमथाखिलम् ।

पद्म, पाताळ, रामाश्व, अ. ६६.

यांत भरताची व रामाची भेट न होतां तो परत नंदीग्रामास जाईपर्यंतचा मजकूर बालकांडातच आहे. शिवाय, पद्मपुराणामध्यें बाल, आरण्य, किष्किंधा, सुंदर, युद्ध व उत्तर अशीं सहाच कांडें रामायणांत असल्याचा उल्लेख आहे. यावरून ते वेळीं अयोध्याकांड स्वतंत्र नव्हतेंच हें कळून येतें. पण सातव्या शतकाच्या अखेरीस असलेल्या भवभूतीनें उत्तररामचरित्रांत म्हटलें आहे कीं:—

" बालकांडस्यांतिमेऽध्यायेऽयं श्लोकः ।
प्रकृत्यैव प्रिया सीता रामस्यासीन्महात्मनः ।
प्रियभावः स तु तया स्वगुणैरेव वर्धितः ॥ "

हा श्लोक सध्यां बालकांडाच्या शेवटच्या सर्गांत ( अध्यायांत नाहीं ) आहे. यावरून भवभूतीच्या काळीं आतांप्रमाणेंच अयोध्याकांड होतें हें कळून येईल. पद्मपुराणाची ही रामायणसूची यावरून भवभूतीहून बरीच

प्राचीनतर असली पाहिजे, हें कळून येते. त्यावेळीं बालकांडातच अयोध्याकांडाचा समावेश होत असे ! यावरून हें रामाश्वमेधपर्व, व तें ज्यात आहे तें पातालखंड व तें ज्यात आहे तें पद्मपुराण भवभूतीपेक्षा कांहीं भागात तरी अतिप्राचीन आहे हें अरूर कळून येतें, यावरून असा संभव आहे कीं, भवभूतीहून बऱ्याच प्राचीन अशा कालिदासाहूनही ह्या पुराणाचे बरेच भाग प्राचीनतर असावेत, यावरून कालिदासानेंच त्या त्या कथा या पुराणावरून घेतलेल्या असण्याचा संभव आहे

शिवाय, वनपर्वांतील तीर्थवर्णनात्मक कांहीं भाग ( महाभारतातला ) जर पद्मपुराणाशीं जुळतो, तर हे पुराण व यातील कांहीं मूळचे भाग *महाभारताला सच स्वरूप मिळाल तेव्हा झाले म्हणण्यास काय हरकत आहे?*

भारतरामायणाव्यतिरिक्त इतर परंपराही या पुराणात आढळतात. उदाहरणार्थ, जानवानाचें अन्यथारामायण ( पाताळखंड अ ११६ ) पहा, रामाश्वमेधपर्व पहा, तसेंच, लोमशरामायण पहा यावरून, कदाचित् शाकुंतलेची कथा व रामकथा यातही जुया परंपरावरूनच फरक असतील, तेच या पुराणानें कायम ठेऊन पुढील विन्यास दिलेले असतील, व त्यावरूनच कालिदासानें रघुवंश व शाकुंतल रचिलें असेल ! हेंच अधिक शक्य आहे.

---

### विष्णुपुराण, ३ रें.

मत्स्यपुराणात याचें लक्षण असें दिलेले आहे कीं,

वाराहकल्पवृत्तात अधिकृत्य पराशर ।
यत्प्राह धर्मानखिलांस्तदुक्त वैष्णव विदु ॥
त्रयोविंशतिसाहस्र तत्प्रमाण विदुर्बुधा ॥

" वराहकल्पाच्या वृत्तांतास आरंभ करून पराशरानें ज्यांत संपूर्ण धर्म सांगितलेले आहेत ते विष्णुपुराण असून यांत एकंदर श्लोकसंख्या २३००० आहे. "

नारदपुराणांत याची सूची याप्रमाणे दिलेली आहे:—

शृणु वत्स ! प्रवक्ष्यामि पुराणं वैष्णवं महत् ।
त्रयोविंशतिसाहस्रं सर्वपातकनाशनम् ॥
यत्रादिभागे निर्दिष्टाः षडंशाः शक्तिजेन ह ।
मैत्रेयायाऽऽदिमे तत्र पुराणस्यावतारिका: ॥

प्रथमांशे । आदिकारणसर्गश्च देवादीनां च संभवः ।
समुद्रमथनाख्यानं दक्षादीनां ततोऽन्वयाः ॥
ध्रुवस्य चरितं चैव पृथोश्चरितमेव च ।
प्राचेतसं तथाख्यानं प्रल्हादस्य कथानकम् ।
पृथग् राज्याधिकाराख्याः प्रथमोंऽश इतीरितः ।

द्वितीयांशे । प्रियव्रताचयाख्यानं द्वीपवर्षनिरूपणम् ।
पातालनरकाख्यानं सप्तस्वर्गनिरूपणम् ॥
सूर्यादिचारकथनं पृथग्लक्षणसंयुतम् ।
चरितं भरतस्याथ मुक्तिमार्गनिदर्शनम् ॥
निदाघऋभुसंवादो द्वितीयोंऽश उदाहृतः ।

तृतीयांशे । मन्वंतरसमाख्यानं वेदव्यासावतारकम् ॥
नरकोद्धारकं कर्म गदितं च ततः परम् ॥
सगरसौर्वसंवादे सर्वधर्मनिरूपणम् ।
श्राद्धकल्पं तथोदिष्टं वर्णाश्रमनिबंधने ॥ . . .

सदाचारश्च कथितो मायामोहकथा ततः ।
तृतीयोंशोऽयमुदितः सर्वपापप्रणाशनः ।
चतुर्थांशे । सूर्यवंशकथा पुण्या सोमवंशानुकीर्तनम् ॥
चतुर्थांशे मुनिश्रेष्ठ ! नानाराजकथोचितम्* ॥
पंचमांशे । कृष्णावतारसंप्रश्नो गोकुलीयकथा ततः ।
पूतनादिवधो बाल्ये कौमारेऽघादिहिंसनम् ॥
कैशोरे कंसहननं माथुरं चरितं तथा ।
ततस्तु यौवने प्रोक्ता लीला द्वारावतीभवा ॥
सर्वदैत्यवधो यत्र विवाहाश्च पृथग्विधाः ।
यत्र स्थित्वा जगन्नाथः कृष्णो योगेश्वरेश्वरः ॥
भूभारहरणं चक्रे परस्वहननादिभिः ।
अष्टावक्रीयमाख्यानं पंचमोंऽश इतीरितः ॥
षष्ठांशे । कलिजं चरितं प्रोक्तं चातुर्विध्यं लयस्य च ।
ब्रह्मज्ञानसमुद्देशः खांडिक्यस्य निरूपितः ।
केशिध्वजेन चेत्येष षष्ठोंऽशः परिकीर्तितः ॥
उत्तरभागे । अतः परस्तु सूतेन शौनकादिभिरादरात् ।
पृष्टेन चोदिताः शश्वद्विष्णुधर्मोत्तराह्वयाः ॥
नानाधर्मकथाः पुण्या व्रतानि नियमा यमाः ।
धर्मशास्त्रं चार्थशास्त्रं वेदांतं ज्योतिषं तथा ।
वंशाख्यानप्रकरणात् स्तोत्राणि मनवस्तथा ॥

---

* यांत भविष्यत्काळच्या राजांचें वर्णन आहे असें म्हटलेलें आढळत नाहीं, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

नानाविद्याश्रयाः प्रोक्ताः सर्वलोकोपकारकाः ।
एतद्विष्णुपुराणं वै सर्वशास्त्रार्थसंग्रहम् ॥

या सूचीवरून कळून येतें कीं विष्णुपुराणाचे आदिभाग व उत्तरभाग असे दोन भाग असून, आदिभागांत ६ अंश आहेत व उत्तरभागास विष्णुधर्मोत्तर म्हणतात. विष्णुपुराणाचा पूर्वभाग व विष्णुधर्मोत्तर मिळून संपूर्ण विष्णुपुराण २३००० चें होतें.

हल्लीं आपणांत प्रचलित असलेलें विष्णुपुराण म्हणजे केवळ त्याचा पूर्वभाग आहे; तो जवळ जवळ ७००० चा आहे. विल्सन साहेबांनीं विष्णुपुराणाच्या सात प्रति हिंदुस्थानाच्या भिन्न भिन्न भागांतून मिळविलेल्या होत्या; पण त्या सर्वांत इतकेच श्लोक होते; व पूर्वार्धं ६ अंशांचा संपूर्णही दिसतो. मग, हा फरक कसा पडला, असा विल्सन यांचा प्रश्न होता. * पण त्यास उत्तर एवढेंच कीं विष्णुपुराणाच्या पूर्वार्धांतच फक्त २३००० श्लोक कसे मिळावेत ? हल्लीं विष्णुपुराण व विष्णुधर्मोत्तर हे भिन्न भिन्न ग्रंथ मानले जातात; पण नारदपुराणाच्या सूचीच्या वेळीं ते तसे मानले जात नव्हते हें स्पष्ट होतें ! विष्णुपुराण व विष्णुधर्मोत्तर हे दोन्ही ग्रंथ श्रीशंकराचार्यांस माहीत होते; या दोहांतूनही त्यांनीं विष्णुसहस्रनामभाष्य व सनत्सुजातीयभाष्य यांत उतारे दिलेले आहेत; पण हे दोन्ही वेगळाले ग्रंथ होते अशी त्यांची समजूत होती, हें स्पष्ट आहे. शिवाय, थोडीबहुत याबद्दल शंका असेल तर खालील प्रमाणावरून ती अगदीं नाहींशी होईल. विष्णुसहस्रनामभाष्यांत आचार्यांनीं एके ठाई असें म्हटलेलें आहे कीं:—

विष्णुपुराणांते श्रीपराशरेणोपसंहृतम् ।
" यस्मिन्नयस्तमतिः " इत्यादि ।

---

* How is the discrepancy to be explained ?

हा श्लोक हल्लीं ६ व्या अंशाच्या आठव्या अध्यायांत ५५ वा आहे; म्हणजे तो अखेरीसच आहे. आमच्याप्रमाणेंच श्रीशंकराचार्यांचीही साहाव्या अंशालाच विष्णुपुराण संपतें अशी समजूत होती; व ते विष्णुधर्मोत्तरांतून स्वतंत्रपणें उतारे घेत असल्यामुळें असें समजावें लागतें कीं श्रीशंकराचार्यांचे वेळीं, विष्णुपुराण व विष्णुधर्मोत्तर ( पूर्वभाग व उत्तरभाग ) हे एकाच ग्रंथाचे भाग आहेत अशी कल्पनाही नव्हती; ते स्वतंत्र ग्रंथ आहेत अशी *कल्पना होती; पण याहीपूर्वीं नारदपुराणानें जे वेळीं पुराणाचे निरीक्षण* केलें असेल ते वेळीं ते दोन्ही एकाच पुराणाचे भाग असें मानीत असले पाहिजेत हें उघड होतें. यावरून हेंही पण ठरून जातें कीं **नारदपुराणाचें पुराणनिरीक्षण श्रीशंकराचार्यांहून प्राचीनतर आहे**; एरव्हीं ही संगति लागतच नाहीं ! असो.

*याप्रमाणें हल्लीं जें विष्णुपुराण म्हणून उपलब्ध आहे तें फक्त विष्णु-*पुराणाचा पूर्वभाग आहे. त्याची संख्या ७००० आहे. विष्णुधर्मोत्तर हल्लीं जेवढें मिळतें तेवढें त्यास मिळविलें म्हणजे जवळ जवळ १६००० श्लोक होतात; यावरून असें म्हणावें लागतें कीं, विष्णुधर्मोत्तराकडे लोकांचें विशेष लक्ष नसल्यामुळें त्याचा जवळ जवळ ७००० श्लोकांचा भाग लुप्त झाला ! विष्णुधर्मोत्तरग्रंथ पुरा मिळत नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. सूर्यसिद्धांताचा टीकाकार म्हणतो कीं ब्रह्मगुप्तानें आपली ज्योतिषपद्धति विष्णुधर्मोत्तरपुराणावरून घेतली अशी परंपरा आहे; व वरील नारदपुराणसूचीवरून विष्णुधर्मोत्तरांत ज्योतिषाचा अंश होता हें कळून येतें. काश्मिरांत प्रचलित असलेल्या विष्णुधर्मोत्तरांत ज्योतिषशास्त्र वगैरे आहे असें अष्टादशपुराणदर्पणकाराचें मत आहे.

नारदीय सूचीच्या वेळीं चौथ्या अंशांत भविष्यकालीन राजांची माहिती होती का नाहीं हें स्पष्टपणें कळत नाहीं; तथापि, तिसऱ्या अंशांतील

' मायामोहकथे ' चा या सूचीत उल्लेख असल्यामुळे भविष्यकालीन राजेही त्या वेळीं या पुराणांत बहुधा असावेत. असे ते असतील तर ही नारदीपुराणसूची इ. स. ५००–६०० च्या दरम्यान बनलेली असावी असें मानणें जरूर पडेल; नाहीं पक्षीं, ही सूची आणखीही १००–१२५ वर्षे प्राचीनतर ठरेल. कारण एरव्हीं, श्रीशंकराचार्यांच्या वेळीं विष्णुपुराण व विष्णुधर्मोत्तर हे वेगळे ग्रंथ आहेत अशी समजूत कशी पडावी ?

हेमाद्रि व स्मृतिरत्नावलिकार यांनीं बृहद्विष्णुपुराणांतील म्हणून कांहीं श्लोक उतरून घेतलेले आहेत. हें पुराण हल्लीं उपलब्ध नसल्यामुळें, त्याविषयीं कांहीं विशेष लिहितां येत नाहीं. काठेवाडांत काहींच्या येथें अजून भरपूर २३००० श्लोकांचें विष्णुपुराण मिळतें अशी बातमी आहे.

या पुराणावरही अनेक टीका आहेत; पैकीं श्रीधरस्वामींची प्रचलित व उपलब्ध टीकांत प्राचीनतम आहे. त्याही पूर्वीची चित्सुख याचीही यावर टीका होती ! ( भागवतपुराण पहा. )

---

## वायु ऊर्फ शैवपुराण, ४ थें.

कोणी म्हणतात, शैव व वायुपुराण एकच आहे; कोणी म्हणतात कीं हे भिन्न आहेत. बाळंभट्टाचें मत असें आहे कीं जें शैव तेंच वायुपुराण होय. कांहीं पुराणांनीं ' शैवा ' चा उल्लेख केलेला आहे व काहींनीं ' वायू ' चा केलेला आहे. विष्णु, पाद्म, मार्कंडेय, कौर्म, वाराह, लिंग, ब्रह्मवैवर्त, भागवत व स्कांद यांत यास ' शैव ' पुराण म्हटलेलें आहे. मत्स्य, नारद व देवीभागवत यांत यास ' वायु ' पुराण म्हटलेलें आहे. वायुपुराणाच्या रेवामाहात्म्यांत लिहिलें आहे कीं:—

पुराणं यन्मयोक्तं हि चतुर्थं वायुसंज्ञितम् ।
चतुर्विंशतिसाहस्रं शिवमाहात्म्यसंयुतम् ।

अपरार्धे तु रेवाया माहात्म्यमतुलं मुने ॥
पुराणेपूत्तमं प्राहुः पुराणं वायुनोदितम् ।
यस्य श्रवणमात्रेण शिवलोकमवाप्नुयात् ॥
यथा शिवस्तथा शैवं पुराणं वायुनोदितम् ।
शिवभक्तिसमायोगान्नामद्वयविभूषितम् ॥

वायूनें हे सांगितलें म्हणून यास ' वायुपुराण ' व शिवाचें यांत माहात्म्य आहे म्हणून ह्यास ' शैव ' पुराण—अशा संज्ञा मिळाल्या, हें यावरून उघड होतें. यांत पूर्वार्धात शिवमाहात्म्य असून उत्तरार्धांत रेवामाहात्म्य आहे व एकंदर संख्या २४ हजारांची आहे हें कळून येतें. रेवामाहात्म्याच्या प्रारंभींही यास नामद्वय असल्याचा याप्रमाणे उल्लेख आहे:—

चतुर्थं वायुना प्रोक्तं वायवीयमिति स्मृतम् ।
शिवभक्तिसमायोगात् शैवं तच्चापराख्यया ॥
चतुर्विंशतिसंख्यातं सहस्राणि तु शौनक ।
चतुर्भिः पर्वभिः प्रोक्तं .... ... .... ॥

यावरून शैव व वायुपुराण एकच असून त्याचीं चार पर्वें आहेत हेंही आणखी कळून येतें.

*नारदपुराणांत वायुपुराणाची विषयसूची या प्रकारें दिलेली आहे:—*

शृणु विप्र ! प्रवक्ष्यामि पुराणं वायवीयकम् ।
यस्मिन् श्रुते लभेद्धाम रुद्रस्य परमात्मनः ॥
चतुर्विंशति साहस्रं तत्पुराणं प्रकीर्तितम् ।
श्वेतकल्पप्रसंगेन धर्मान्यत्राह मारुतः ॥
तद्वायवीयमुदितं भागद्वयसमाचितम् ।

पूर्वभागे । स्वर्गादिलक्षणं यत्र प्रोक्तं विप्र सविस्तरात् ।
मन्वंतरेषु वंशाश्च राज्ञां येऽन्यत्र कीर्तिताः ॥
गयासुरस्य हननं विस्तराद्यत्र कीर्तितम् ।
मासानां चैव माहात्म्यं माघस्योक्तं फलाधिकम् ॥
दानधर्मा राजधर्मा विस्तरेणोदितास्तथा ।
भूमिपातालककुब्व्योमचारिणां यत्र निर्णयः ॥
व्रतादीनां च पूर्वोऽयं विभाग. समुदाहृतः ॥

तदुत्तरभागे। उत्तरे तस्य भागे तु नर्मदातीर्थवर्णनम् ।
शिवस्य संहिताख्या वै विस्तरेण मुनीश्वर ॥
यो देवः सर्वदेवाना दुर्विज्ञेयः सनातनः ।
स तु सर्वात्मना यस्यास्तीरे तिष्ठति संततम् ॥
इदं ब्रह्मा हरिरिदं साक्षाच्चेद परो हरः ।
इदं ब्रह्म निराकारं कैवल्यं नर्मदाजलं ॥
ध्रुवं लोकहितार्थाय शिवेन स्वशरीरत· ।
शक्तिः कापि सरिद्रूपा रेवेयमवतारिता ॥
ये वसंत्युत्तरे कूले रुद्रस्यानुचरा हि ते ।
वसंति याम्यतीरे ये लोकं ते यान्ति वैष्णवम् ॥
ओंकारेश्वरमारभ्य यावत्पश्चिमसागरम् ।
संगमाः पंच च त्रिशच्चर्दोर्णा पापनाशनाः ॥
दशैकमुत्तरे तीरे त्रयोविंशति दक्षिणे ।
पंचत्रिंशत्तम. प्रोक्तो रेवासागरसंगमः ॥

संगमे साहितान्येवं रेवातीरद्वयेऽपि च ।
चतुःशतानि तीर्थानि प्रसिद्धानि च संति हि ॥
षष्टि तीर्थसहस्त्राणि षष्टि कोट्यो मुनीश्वराः ! ।
संति चान्यानि रेवायास्तीरयुग्मे पदे पदे ॥
संहितेयं महापुण्या शिवस्य परमात्मनः ।
नर्मदाचरितं यत्र वायुना परिकीर्तितम् ॥

नारदीयपुराणात ज्या प्रकारची वायुपुराणाची अनुक्रमणिका आहे तीवरून देखील पूर्वार्धात शिवमाहात्म्य व उत्तरार्धात रेवामाहात्म्य अशीच यांत व्यवस्था दिसून येते. नारदपुराणमतें गयामाहात्म्य पूर्वभागांतच आहे; पण दुर्भाग्य आमचें कीं 'गयामाहात्म्य' व 'रेवामाहात्म्य' हीं स्वतंत्रपणेच मिळत असून, चार पर्वांनीं युक्त संपूर्ण वायुपुराण (या दोन्ही माहात्म्यानें युक्त असें) हल्लीं मिळत नाहीं. कलकत्त्याच्या एशियाटिक सोसाइटीने एक वायुपुराण नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलेलें आहे;* परंतु, त्यांत चार पर्वें किंवा पूर्वभागात गयामाहात्म्यही नाहीं. संपादकांनीं आपल्या इच्छेनें याच्या शेवटीं गयामाहात्म्य जोडून दिलेलें आहे; याशिवाय, यांत शिवसंहिता किंवा रेवामाहात्म्य या उत्तरार्धातील विषयाचें नांवही नाहीं ! मुंबई व कलकत्ता येथें शिवपुराण छापलेलें आहे; त्यातही क्रमानें पूर्वोत्तर भाग व चार पर्वें दिसून येत नाहींत. या शिवपुराणातील वायुसंहितेंत लिहिलें आहे कीः—

तत्र शैवं तुरीयं यच्छार्वं सर्वार्थसाधकम् ।
ग्रंथलक्षप्रमाणं तद्व्यस्तं द्वादशसंहितम् ॥
निर्मितं तच्छिवेनैव तत्र धर्मः प्रतिष्ठितः ।

* याविषयीं विशेष विचार ब्रह्मांडपुराणनिरीक्षणांत करावयाचा आहे.

तदुक्तेनैव धर्मेण शैवास्त्रैवर्णिका नराः ॥
एकजन्मनि मुच्यंते प्रसादात्परमेष्ठिनः ॥
तस्माद्विमुक्तिमन्विच्छाच्छिवमेव समाश्रयेत् ।
तमाश्रित्यैव देवानां अपि मुक्तिर्न चान्यथा ॥
यदिदं शैवमाख्यातं पुराणं वेदसंमितम् ॥
तस्य भेदान्समासेन ब्रुवतो मे निबोधत ।
विद्येश्वरं तथा रौद्रं वैनायकमनुत्तमम् ॥
औमं मातृपुराणं च रुद्रैकादशकं तथा ।
कैलासं शतरुद्रं च कोटिरुद्राख्यमेव च ॥
सहस्रकोटिरुद्राख्यं वायवीयं ततः परम् ॥
धर्मसंज्ञं पुराणं चेत्येवं द्वादश संहिताः ।
विद्येशं दशसाहस्रं उदितं ग्रंथसंख्यया ॥
रौद्रं विनायकं चौमं मातृकाख्यं ततः परम् ।
प्रत्येकमष्टसाहस्रं त्रयोदशसहस्रकम् ॥
रुद्रैकादशकाख्यं यत् कैलासं षट्सहस्रकम् ।
शतरुद्रं दशप्रोक्तं कोटिरुद्रं तथैव च ॥
सहस्रकोटिरुद्राख्यं दशसाहस्रकं तथा ।
तदेतद्वायुना प्रोक्तं चतुःसाहस्रमीरितम् ॥
तथा पंचसहस्रं तु यदेतद्धर्मनामकम् ।
तदेवं लक्षमुद्दिष्टं शैवं शाखाविभेदतः ॥

शिवपुराण, वायुसंहिता, अ. १ ला.

हें एक वेगळेंच प्रकरण आहे ! यांच्या १२ संहिता मिळून एक ल

ग्रंथ आहे !! याच्या संहिता:—विद्येश्वर १० हजार, रौद्र ८ हजार, विनायक ८ हजार, औम ८ हजार, मातृ ८ हजार, रुद्रैकादश १३ हजार, कैलास ६ हजार, शतरुद्र, कोटिरुद्र व सहस्रकोटिरुद्रसंहिता प्रत्येकी दहा दहा हजार, वायुसंहिता ४ हजार, व धर्मसंहिता ५ हजार—येणेंप्रमाणें एक लक्ष ग्रंथ आहे.

महापुराणापैकीं चौथें जें शैव ऊर्फ वायुपुराण त्याची संख्या कोठेंही २४००० वर सांगितलेली नाहीं; तेव्हां त्या शैवपुराणाचा व एकलक्षात्मक शैवपुराणाचा कांहीं संबंध नाहीं हें उघड होतें. हें असलेंच तर एकादें उपपुराण असेल ! मुंबईंत जें शिवपुराण म्हणून छापलेलें आहे त्यांत खालील संहिता आहेत:—

| | | |
|---|---|---|
| १ | विद्येश्वरसंहिता | २००० श्लोक. |
| २ | रुद्रसंहिता | १०५३०' ,, |
| ३ | शतरुद्रसंहिता | २१५० ,, |
| ४ | कोटिरुद्रसंहिता | २२४० ,, |
| ५ | औमसंहिता | १८४० ,, |
| ६ | कैलाससंहिता | १२४० ,, |
| ७ | वायुसंहिता | ४००० ,, |
| | | २४००० |

याप्रमाणें हा २४००० श्लोकसंख्येचा ग्रंथ मिळून सात संहितांचा ग्रंथ छापलेला आहे !! हा पुन्हा वरील बारा संहितांच्या एक लक्षात्मक ग्रंथाशीं जुळतच नाहीं ! निदान याची ग्रंथसंख्या तरी २४००० आहे. नारदपुराणाच्या वायुपुराण म्हणून दिलेल्या वर्णनाशीं हें जमत नाहींच ! असो. यावरून, एवढें सिद्ध होतें कीं वायुपुराणास जरी शैवपुराण म्हणून दुसरें नाव असलें तरी ' शैवपुराण ' नांवाचा दुसराही एक स्वतंत्र ग्रंथ आहे.

" It may, perhaps, be regarded as one of the oldest and most authentic specimens, extant, of a primitive Purâna " डॉ. भांडारकरही या पुराणाबद्दल, निदान त्यांतील भविष्याच्या भागाबद्दल, आपल्या दक्षिणच्या इतिहासांत म्हणतात कीं:—" सर्वांत वायुपुराण हें कालज्येष्ठ म्हणजे परम प्राचीन व त्याच्याहून कनिष्ठ मत्स्यपुराण होय असें आम्हांस वाटतें. विष्णुपुराण हे मत्स्याहून कनिष्ठ व सर्वांत कालकनिष्ठ किंवा उत्तरकालीन म्हटलें म्हणजे भागवत. " (मराठी भाषांतर पृ.६६.)

हल्लींचा वायुपुराणाचा पूर्वार्ध चार पादांत विभक्त आहे, ते पाद असे. १ प्रक्रियापाद, २ उपोद्घातपाद, ३ अनुषंगपाद, ४ उपसंहारपाद. या पादाचा आरंभ होण्यापूर्वी अनुक्रमणिका दिलेली आहे. या दोन्ही गोष्टी गमतीच्या व महत्त्वाच्या असून त्या फक्त याच पुराणात आढळतातः—

प्रक्रिया प्रथमः पादः कथावस्तुपरिग्रहः ।
अनुषंग उपोद्घात उपसंहार एव च ॥
एवमेतचतुष्पादं पुराणं लोकसंमितम् ।
उवाच भगवान्साक्षाद्वायुर्लोकहिते रतः ॥

आनंदाश्रमाचें वायुपुराण पाच हस्तलिखित प्रतीवरून तयार केलेलें आहे. यांतील १०४ था अध्याय फक्त एका क प्रतींत तेवढा आहे. ही क प्रत म्हणजे कलकत्त्याची छापील प्रत होय. मुंबईकडच्या प्रतींत हा अध्याय नाहीं. या अध्यायात पुराणें व त्याची संख्या सांगितलेली आहे.

मत्स्यपुराणानें वायुपुराणाचें लक्षण याप्रमाणें सांगितलेलें आहे:—

श्वेतकल्पप्रसंगेन धर्मान्वायुरिहाब्रवीत् ।
यत्र तद्वायवीयं स्याद्रुद्रमाहात्म्यसंयुतम् ॥
चतुर्विंशत्सहस्राणि पुराणं तदिहोच्यते ॥ मत्स्य, ५३-१८.

प्रचलित शिवपुराणांतील ज्ञानसंहितेच्या ९–२४ अध्यायांचा सारांश घेऊनच कालिदासानें कुमारसंभवाची रचना केलेली आहे, असें कळून येईल. ज्या पुराणाचें सद्यःस्वरूप बरेंच प्राचीनतर आहे, अशा पुराणांमध्यें वायुपुराण हें एक आहे, हें वर सांगितलेलेंच आहे. बाणानें वायुपुराणाचा दोन ठिकाणीं उल्लेख केलेला आहे:—

( १ ) गमकैर्मधुरैराक्षिपन्मनांसि श्रोतॄणां गीत्या **पवमानप्रोक्तं पुराणं** पपाठ ।

( *हर्षचरित, निर्णयसागरी प्रत, पृ. ८५।८६.* )

( २ ) यत्र च महाभारते शकुनिवधः **पुराणे वायुप्रलपितम्** ।

( कादंबरी, Peterson Edition, P. 41.)

या दोन्ही ठिकाणीं वायुप्रोक्त पुराणाचा म्ह. वायुपुराणाचाच उल्लेख आहे, याबद्दल पंडितांमध्यें मतभेद नाहीं. बाणाचा उदय इ. स. ६०० च्यानंतर थोड्याच काळानें झाला. बाणापूर्वी हें पुराण निदान १५०।२०० वर्षे तरी प्रचलित असलें पाहिजे. म्हणजे हें पुराण इ. स. ४०० च्या सुमारास सद्यःस्वरूप पावलें असावें. हेंच अनुमान दुसऱ्याही एका गोष्टीवरून निघतें. वायुपुराणाच्या भविष्यभागांत, गुप्त राजे प्रयाग, साकेत व गंगाकांठचा मगधदेश यांवर राज्य करितील असें सांगितलें आहे:—

अनुगंगं प्रयागं च साकेतं मगधांस्तथा ।
एताञ्जनपदान्सर्वान् भोक्ष्यंते गुप्तवंशजाः ॥

या गुप्तांच्या वर्णनाविषयीं रा. दे. रा. भांडारकर हे लिहितात कीं:— "This is doubtless a description of the Guptas before they became paramount sovereigns. From the Allāhābād and Eran inscriptions, we conclude that the dominions of समुद्रगुप्त had spread as far as the United and the Central

Provinces in the west and the h respectively The description in the Vayu Purana can thus hardly refer to this wide extent of his dominions We must, therefore, suppose, that the वायुपुराण was put together shortly before the time of समुद्रगुप्त ( P 156 )

A reference to the Vāyu Purana, is no doubt, also to be found in verse 16, chapter 191, वनपर्व, महाभारत, but, as the episode, wherein the reference is contained, is supposed to be an interpolation,* we can at the most say, that there was a Purana of that name, not before the beginning, but before the end of the महाभारत The reference is therefore of no use to us in fixing the date of the Vayu Purana and *the commencement of the fourth century therefore remains the earliest period to which we can assign the compilation of that Purana* ( P 157 )

J B B R A S Vol XXII No LXI, (61)

गुप्ताच्या राज्याचा विस्तार समुद्रगुप्ताच्या वेळेस फारच झालेला होता. तो होण्यापूर्वीचें हें वर्णन असावें. समुद्रगुप्ताची कारकीर्द इ. स. ४०० च्या सुमारास झाली. त्यापूर्वी ५०।७५ वर्षांच्या स्थितीचें हें वर्णन आहे. साधारण ३०० च्या सुमारास वायुपुराणास साप्रतचें स्वरूप आलें असावे, असे रा. दे. भांडारकर यांचे मत आहे.

## वायुपुराणाचा भविष्याचा भाग.

*आनंदाश्रमग्रंथावलींत छापलेलें वायुपुराण ( ग्रंथांक ४९ )* पांच हस्त लिखित प्रतींवरून तयार केलेलें आहे. वायुपुराणाचा भविष्याचा भाग ९९ व्या अध्यायाच्या श्लोक २६० ते ४६४ पर्यंत आहे. एका हस्तलिखित

*The Great Epic of India by Hopkins P 48 My attention to this was drawn by Mr Hari Narayan Apte

प्रतींत या अध्यायात फक्त २५९ च श्लोक आहेत, म्हणजे यात भविष्याचा भागच नाहीं. मूळचें वायुपुराण अधिसीम (सोम) कृष्णे राजाच्या वेळीं सामितलें गेलें आहे:—

अधिसीमकृष्णो धर्मात्मा साम्प्रतोऽय महायशाः ।

वायुपुराण, अ० ९९—श्लोक २५८.

एका हस्तलिखित प्रतींत भविष्याचे श्लोकच नाहींत ही गोष्ट महत्वाची आहे; कारण यायोगें एके काळीं व एका परंपरेंत हे श्लोक नव्हते हें सिद्ध होतें; व भविष्याचे भाग जे पुराणांतून आढळतात ते मूळच्या व्यासकृत पुराणांतले नसून ते दुसऱ्याच्या हातचे आहेत हें सिद्ध होतें. भविष्याचे भाग मूळ कोणत्या पुराणानें लिहिले हा प्रश्न अतिशय महत्त्वाचा आहे, वायु, मत्स्य व ब्रह्मांड पुराणांतून भविष्यकालीन राजे व त्यांचे राज्यकाल दिलेले आहेत, *विष्णु व भागवत यांतून फक्त सख्याच्या* बेरजा तेवढ्या दिलेल्या आहेत. प्रत्येक वंशाच्या कालसंख्येच्या बेरजा देणाऱ्या पुराणापेक्षा त्या त्या वंशातील राजाची तपशीलवार हकीकत देणारीं पुराणेंच भविष्याच्या भागांत प्राचीनतर असलीं पाहिजेत हें उघड होतें. असा तपशील ज्या ज्या पुराणांनीं दिलेला आहे, तीं पुराणें म्हटलीं म्हणजे वायु, *मत्स्य व ब्रह्मांड हीं तीनच होत. यांत पूर्वापरतेचा* अनुक्रम पुन कसा लावावा हा एक प्रश्न आहे. याचा विचार केला असता वायुपुराणाच्या भविष्यभागासच सर्वांत प्राचीनत्व द्यावें लागेल. कारण, त्यानेंच अधिक तपशील दिलेला आहे. जसें, परिक्षितापासून क्षेमकापर्यंत चंद्रवंशात २५ राजे भविष्यत्काळीं होतील असें म्हटलें आहे.—

पंचविंशनृपा ह्येते भविष्याः पूर्व (पुरु) वंशजाः ॥ श्लोक, २७७.

---

१ या राजाचें नांव अधिसीमकृष्ण अगर अधिसोमकृष्ण अशा दोन्ही रीतींनीं लिहिलेलें पुराणांतून आढळून येतें.

येथे ' पूर्ववंशजा ' च्या ठिकाणीं ' पुरुवंशजा ' हा पाठच असावासें दिसतें. या २५ राजास किती काळ लोटला हें दिलेलें नाहीं. तसेंच, शिशुनागवंशाचा तपशील देत असतां, उदयी अगर उदायी राजाविषयीं असें लिहिलें आहे कीं, त्यानें आपल्या राज्याच्या ४ थ्या वर्षी गंगेच्या दक्षिण काठीं कुसुमपूर ( पाटलीपुत्र नगर ) निर्माण केलें. ह्याच भागांत ही माहिती मत्स्यपुराणांत आढळत नाहीं. यावरून असें सिद्ध होतें कीं वायुपुराणांतील भविष्यभाग देणारास उदायीनं आपल्या राज्याच्या कितव्या वर्षी कुसुमपूर स्थापिलें हे माहीत होतें. या तपशिलाचें महत्त्व मत्स्यपुराणाचा भविष्यभाग लिहिणारास पुढें वाटलें नाहीं त्यानें फक्त राज्यकालाचे तेवढ उतारे दिले. यावरून अधिक तपशीलवार माहिती असलेलेंच सर्वांत प्राचीनतर भविष्य होय असं मानावं लागतें. उदयीनें कुसुमपूर स्थापल्याविषयीं वायुपुराणांत याप्रकारें उल्लेख आहे

उद-(दा)यीं भविता यस्मात् त्रयस्त्रिंशत्समा नृप. ॥
स वै पुरवरं राजा पृथिव्यां कुसुमाव्हयम् ॥ ३१९ ॥
गंगाया दक्षिणे कूले चतुर्थेऽब्दे करिष्यति ॥ अ० ९९ वा

या तपशिलामुळें वायुपुराणाचा भविष्यभाग लिहिणाऱ्यानेंच प्रथम भविष्यभाग पुराणांतून घालण्याचा परिपाठ पाडला असें म्हणावें लागतं, व हें एकदा कबूल केलें म्हणजे भविष्यभागाचा पूर्वापरभाव पुराणामध्यें वायु, मत्स्य, ब्रह्मांड, विष्णु व भागवत या प्रकारें लागतो

महाभारताच्या सद्य स्वरूपांत मत्स्य व वायु या दोन्ही पुराणांचा स्पष्ट उल्लेख आहे. तो असा —

इत्येतन्मात्स्यकं नाम पुराणं परिकीर्तितम् ॥

महाभारत, ३-१८७-५८.

एतत्ते सर्वमाख्यातमतीतानागतं तथा ॥
वायुप्रोक्तमनुस्मृत्य पुराणं ऋषिसंस्तुतम् ॥

महाभारत, ३-१९१-१६.

हा उल्लेख वनपर्वांत आहे. यात वायुपुराणाचा उल्लेख जो वर दिलेला आहे, त्यात वायुपुराणानें प्राचीन (अतीत) गोष्टींबरोबरच, भविष्यत्कालीन गोष्टीही (अनागत) सांगितल्याचा उल्लेख आहे. हा उल्लेख फारच महत्वाचा आहे. महाभारताच्या सद्य स्वरूपप्रत्यंास (मग हें सद्य स्वरूप केव्हाही त्यास प्राप्त झालेलें असो) वायुपुराणात अनागत म्हणजे भविष्यकालीन गोष्टींचा उल्लेख असल्याचें माहीत होतें, म्हणजे, बऱ्याच प्राचीनकाळापासून वायुपुराणातून भविष्याचा भाग आढळतो, हें यावरून सिद्ध होतें. रा. ब. चिंतामणराव वैद्य यानीं सर्व गोष्टींचा विचार करून महाभारताला सद्य स्वरूप केव्हा प्राप्त झालेलें असावें, याबद्दल असे उद्गार काढिलेले आहेत:—

'If we take all the evidence heretofore detailed into consideration we may conclude generally that the Maha-Bharata assumed its present form between three to one hundred B C'

*The Mahabharata a Criticism* P 21

याच विषयीं A Macdonnel साहेबानीं आपल्या A History of Sanskrit Literature मध्यें असें लिहिलेलें आहे कीं —

What evidence have we as to when the महाभारत attained to the form in which we possess it? There is an inscription in a land grant dating from 462 A D or at the latest 532 A D which proves in-controvertibly that the epic about 500 A D was practically of exactly the same length as it is stated to have in the survey of contents (अनुक्रमणिका) given in Book I and as it actually has it now, for it con-

ऐकल्या होत्या, कांहीं नुसत्या झालेल्या त्यास कळल्या होत्या. यावरून भविष्याच्या कांहीं गोष्टी घडलेल्या पाहूनच व पूर्वीच्या घडलेल्या ऐकून भविष्यभागाच्या कर्त्यानें वायुपुराणात लिहिल्या हें स्पष्ट होत. वायुपुराणाच भविष्य आंध्रभृत्यांपर्यंतच होतें असें मानण्यास जरी कांहीं आधार नाहीं तरी तें तसच असावे, असं वाटतें. मग पुढं तें भविष्य जास्त वाढवून त्यास हल्लींच्या स्वरूपास आणलें असावें, व ते कैलकिल यवनानंतर लौकरच म्हणजे सुमारें ६०० च्या सुमारास आणिलें असावें हल्लींच्या स्वरूपकर्त्यांचे वेळीं भारतीय युद्धापासून त्याच्या वेळेपर्यंत जवळ जवळ ३६००।३७०० वर्षे झालीं अशी समजूत असावी, व त्या समजूतीशीं जुळेल अशी सर्व कालगणना त्यानीं रचविली असावी ! या विषयीं दुसरीकडे विशेष खुलासा करू !

---

## श्रीमद्भागवतपुराण, ५ वें.

आता या पुराणाविषयीं विचार करू. श्रीविद्यारण्यानीं यातून जीवन्मुक्तिप्रकरणात उतारे घेतलेले आहेत. ( १४ वें शतक ) श्रीमध्वाचार्यांनीं ब्रह्मसूत्रभाष्यात यातून उतारे घेतलेले आहेत, इतकेंच नव्हे, तर ' भागवततात्पर्यनिर्णय ' नावाच्या त्याच्या ग्रंथावरून पहाता त्यास आपल्या पूर्वीच्या भागवतावरील आठ टीका माहीत होत्या असें दिसतें, त्यात हनुमत्, चित्सुख, शंकराचार्य याच्याही टीकाचीं नावें आहेत. श्रीधरी टीकाही मध्वाचार्यांहून प्राचीनतर असावी. हेमाद्रीनें व्रतखंड व दानखंड यात भागवताचे उतारे घेतलेले आहेत त्याच काळच्या ज्ञानेश्वरींत भागवताचा आदरपूर्वक उल्लेख आहे. हेमाद्रीचा मित्र बोपदेव यानें तर भागवतावर ३ ग्रंथ लिहिले, ( १ ) मुक्ताफल, ( २ ) हरिलीला,* व

---

* ही हल्लीं छापून प्रसिद्ध झालेली आहे.

( ३ ) परमहंसप्रिया. हरिलीला ग्रंथ भागवताची अनुक्रमणीरूप असून त्यावर हेमाद्रीची टीका आहे; त्या टीकेंत भागवतावरील श्रीधरी-*टीकेचा उल्लेख आहे. हेमाद्रि व बोपदेव हे दोघेही भागवतास प्राचीन* आर्ष ग्रंथ मानीत आहेत, इतकेंच नव्हे, तर श्रीधरी टीकाही त्यांहून प्राचीनतर आहे. बोपदेवाचा जन्म शके ११८२ मध्यें झाला. तेव्हां श्रीधरी टीका निदान शके ११०० इतकी तरी जुनी असली पाहिजे, हें उघड होतें.

आनंदस्य हरेर्लीलां वक्ता भागवतागमः ।
स्कंधैर्द्वादशभिः शाखाः प्रतन्वन् द्विजसेविताः ॥ २ ॥
वेदः पुराणं काव्यं च प्रभुर्मित्रं प्रियेव[1] च ।
बोधयंतीति ह प्राहुस्त्रिवद्भागवतं पुनः ॥ १० ॥
इति भागवतेऽध्याया एकत्रिंशच्छतत्रयम् ।
एकादिनियमेनैतानभ्यसेच्छक्तितोऽन्वहम् ॥१०॥
**वक्ता श्रोतर्यथ श्रोता वक्तर्यन्यत्र चिंतक. ॥११॥**
इति भागवतस्यानुक्रमणी रमणी कृता ।
विदुषा बोपदेवेन विद्वत्केशवसूनुना ॥
हरिलीलेति नामेयं हरिभक्तैर्विलोक्यताम् ॥
अस्या विलोकनादेव हरौ भक्तिर्विवर्धते ॥ हरिलीला

यावरून हरिलीला ही भागवताची अनुक्रमणी असून तेव्हां भागवताचें स्वरूप आताप्रमाणेंच होतें हें कळून येईल, विशेषेंकरून भागवतातील १२ व्या स्कंधातील भविष्य तेव्हांही होतेंच. या हरिलीलेवरच्या टीकेंत वारंवार हेमाद्रीनें श्रीधराचार्यांच्या टीकेचा उल्लेख केलेला आहे. एकच *उदाहरण येथे देतो:—*

---

१. येथें ' प्रियावचः ' असाही पाठ आहे.

श्रीधराचार्यांनीं ' शृण्वंति गायंति गृणंति साधवः ' ( १–५–११ व १२–१२–५१ ) यावर अशी टीका केलेली आहेः—

' साधवो महांतो वक्तरि सति शृण्वंति । श्रोतरि सति गृणंति । अन्यदा स्वयमेव गायंति कीर्तयंति । ' व ' वक्तरि सति शृण्वति । श्रोतरि सति गायंति । नोचेत्स्वयमेव गृणंति । '

हेमाद्रीने वर उतरून घेतलेल्या ' एकादिनियमेनैतान् ' या श्लोकावर टीका करितेवेळीं म्हटलें आहे कीं,—

' एकादीति । किं च अन्यस्मिन् श्रोतर्युपस्थिते वक्ता भवेत् । स्वाधिके च वक्तर्युपस्थिते अभिमानं त्यक्त्वा स्वयं श्रोता भवेत् । उभयाभावे स्वयमेव शास्त्रार्थं चिंतयेत् । इत्येषाऽभ्यासप्रक्रिया । एतच्च " शृण्वति गायंति गृणंति साधव. " इत्यत्र स्पष्टीकृतमाचार्येण । '

याशिवाय, आणखी अनेक ठाई श्रीधराचार्यांच्या टीकेचे हेमाद्रीने उतारे घेतलेले आहेत. यावरून बोपदेवानें भागवत केलें नाहीं, इतकेंच नव्हे तर श्रीधरीटीकाही ( शके ११०० ) त्याहून प्राचीन आहे. तात्पर्यनिर्णयकारांनीं यासाठींच म्हटलें आहे कीं.—

बोपदेवकृतत्वे च बोपदेवपुराभवैः ।
कथं टीका. कृता सस्युर्हनुमच्चित्सुखादिभि. ॥

" बोपदेवानें भागवत केलें असतें तर बोपदेवाहूनही प्राचीन अशा हनुमत् व चित्सुख यानीं त्यावर कशा टीका केल्या असत्या ? "

शके १०९० मध्यें रचिलेल्या गौडपति लक्ष्मणसेन याच्या अद्भुतसागर ग्रंथात भागवत व विष्णुधर्मोत्तर यातील उतारे आहेत.

चित्सुखाचार्य हे शंकराचार्यपरंपरेंतील द्वारकामठातील दुसरे पुरुष असल्यामुळें त्याचा काळ इ० स० ८५० धरितां येईल. यांनीं भागवतावर टीका लिहिली होती, तिचा मध्वाचार्य उल्लेख करितात; तसेंच, यांनीं विष्णुपुराणावरही एक टीका लिहिली होती; पद्यः—

श्रीमच्चित्सुखयोगिमुख्यरचितव्याख्यां निरीक्ष्य स्फुटम् ।
तन्मार्गेण सुबोधसंग्रहवतीं आत्मप्रकाशाभिधाम् ॥
श्रीमद्विष्णुपुराणसारविवृतिं कर्ता यतिः श्रीधर- ।
स्वामी सद्गुरुपादपद्ममधुपः साधुः स्वधीशुद्धये ॥

यावरून दुसराही एक उलगडा असा होतो कीं, चित्सुखानंतर श्रीधरस्वामी होऊन गेले. श्रीधरस्वामींनींही भागवत, विष्णुपुराण व भगवद्गीता यावर टीका केलेल्या आहेत. सारांश, इ० स० ८५०–११८२ च्या दरम्यान श्रीधरस्वामी झाले. सुमारें ११०० हा त्याचा काळ धरिता येईल. चित्सुखांची टीका आज उपलब्ध नाहीं हें आमचें दुर्दैव होय !

श्रीशंकराचार्यांची भागवतावर टीका होती; इचाही उल्लेख मध्वाचार्यांनीं केलेला आहे;पण हीही आज मिळत नाहीं. (इ०स०७८८–८२०)

हनुमान्–ज्यानें भगवद्गीतेवर टीका लिहिली, विष्णुपुराणावर टीका लिहिली, हनुमन्नाटक लिहिलें, तो शंकराचार्य व चित्सुख याहून प्राचीनतर दिसतो. हनुमन्नाटक भोजाच्या वेळेस होतें, यावरून भोजापूर्वी हनुमान् होऊन गेला हें ठरतें. हा चित्सुखाहूनही प्राचीनतर असावा. यानें हनुमन्नाटकांत कालिदासाचा ‘ ग्रीवाभंगाभिरामं मुहुरनुपतति ’ हा श्लोक उतरून घेतलेला असल्यामुळें याचा काळ सामान्यतः इ० स० ६००–७०० हा धरिता येईल. तेव्हा यानें भागवतावर टीका लिहिली होती. हनुमती ( ६००–७०० ), शांकरी ( ८०० ), चित्सुखी ( ८५० ) व

श्रीधरी ( ११०० ) यांशिवाय दुसऱ्या कोणत्या प्राचीन टीका भागवतावर होत्या हे कळत नाहीं. आज सर्वांत प्राचीन अशी उपलब्ध टीका म्हटली म्हणजे श्रीधरस्वामींचीच होय !

कै० गोपाळाचार्य कन्हाडकर हे आपल्या **भागवतभूषण** नामक ग्रंथांत खालील माहिती देतातः—

( १ ) पद्मपुराणांतील वासुदेवसहस्रनामावर श्रीशंकराचार्यांचें भाष्य आहे; त्यांत पहिल्या शतकांतील पांचव्या नांवावर टीका करिते वेळीं खालील भागवताचा उतारा त्यांनीं घेतलेला आहेः—

" ' स आश्रयः परं ब्रह्म परमात्मा परात्परः ' इति भागवते । "

*पहिल्या शतकांतील ५५व्या नांवावर लिहिते वेळीं असें म्हटलें आहे:—*

" ' पश्यंत्यदो रूपमदभ्रचक्षुषा । सहस्रपादोरुभुजाननाद्भुतम् ' इत्यादि भागवते । "

(२) शंकराचार्यांनीं केलेल्या **चतुर्दशमतविवेकांत** असें म्हटलेले आहे.

' परमहंसधर्मो भागवते पुराणे कृष्णेनोद्धवायोपदिष्टः । '

( ३ )श्रीशंकराचार्यांचे परमगुरु गौडपादाचार्य यांनीं पंचीकरणाच्या व्याख्येंत असें म्हटलेलें आहे:—

' जगृहे पौरुषं रूपं ' इति भागवतमुपन्यस्तं ।

( ४ ) शौनकाच्या ऋग्विधानांत खालील श्लोक आहेत:—

अस्य यामा ऋचं जप्त्वा त्रिवारं विष्णुमंदिरे ।
फलं भागवतं तस्य लभते नात्र संशयः ॥
जप्त्वा आभरतीं-मंत्रं त्रिवारं च दिने दिने ।

*भारताख्यानमखिलं पारायणफलं लभेत् ॥
रामायणफलं भद्रे भद्रया च जपेद्दचम् ।
पारायणफलं सर्वं शतकोटिमविस्तरम् ॥

कै० गोपाळाचार्यांचीं प्रमाणें तपाधून पहाण्यास मला मिळालीं नाहींत, तथापि मलाही कांहीं नवीं प्रमाणें मिळालीं आहेत; तीं येथे देतों:—

( १ ) उत्तरगीतेवर गौडपादाचार्यांची व्याख्या आहे, तींत, ' हन्यान्मुष्टिभिराकाश ' या ( २–४९ ) श्लोकावर व्याख्या करिते वेळीं त्यांनीं लिहिलेलें आहे कीं:—

यो वेदशास्त्राण्यधीत्य श्रुत्वाऽपि नाहं ब्रह्मेति जानाति तस्य सर्वाणि शास्त्राणि प्रयासफलान्येव । .... .... यथा वा तुप खंडये-दवहन्यात्, अवहननेन श्रम एव फलं, न तु तंडुललाभः । तद्व-न्मुक्तिर्न जायते इत्यर्थ । तदुक्तं भागवते ।
" श्रेयः स्रुतिं भक्तिमुदस्यते विभो । क्लिश्यंति ये केवलमात्मलब्धये ॥
तेषामसौ क्लेशल एव शिष्यते । नान्ययथा स्थूलतुषावघातिनाम् ॥ "

यावरून इ. स. ७०० च्या सुमारास भागवतपुराण विद्वन्मान्य होतें हें कळून येतें.

( २ ) जैमिनीयाश्वमेधपर्वांत भागवताचा येणेंप्रमाणें उल्लेख आहे:—

भारतं हरिवंशं च पुत्रदं धनदं भवेत् ।
श्रीमद्भागवतं पुण्यं भुक्तिमुक्तिफलप्रदम् ॥
जै० अ० अ० ५८–६५

---

* शौनकाच्या चरणव्यूहाच्या शेवटीं असा श्लोक आहे —
लक्षं तु चतुरो वेदा लक्षं भारतमेव च ।
लक्षं व्याकरणं प्रोक्तं चतुर्लक्षं तु ज्योतिषम् ॥

हा उल्लेख बराच प्राचीन आहे. जै. अ. पर्वाचें अगदीं अर्वाचीन स्वरूप धरिलें तरी तें इ. पू. १०० इतकें तरी जुनें धरावेंच लागतें.

( ३ ) तसेंच यादवांचे गुरु गर्गाचार्य यांनी केलेल्या गर्गसंहितेंतही भागवताचा व १८ पुराणांचा खूप महिमा गाइला आहे.

(४)चाणक्याच्या नीतींत (इ.पू.३५०) एक श्लोक असा आढळतो:-

प्रातर्द्यूतप्रसंगेन मध्यान्हे स्त्रीप्रसंगतः ।
रात्रौ चोरप्रसंगेन कालो गच्छति धीमताम् ॥

यांत भारत, रामायण व भागवत यांचा अनुक्रमें उल्लेख आहे असें सज्जन मानतात.

सारांश, गर्ग–जैमिनि–शौनक–चाणक्य–या इ. पू. च्या व्यक्तींस व हनुमत्, चित्सुख, गौडपादाचार्य, शंकराचार्य, श्रीधरस्वामी, हेमाद्रि, बोपदेव या इ. स. नंतरच्या व्यक्तींस भागवत माहीत होतें. बोपदेवाचे व श्रीधरस्वामीचे वेळीं तर ( इ. स. ११०० ) भागवत थेट आतांप्रमाणेंच होतें. त्याला सद्यःस्वरूप केव्हां मिळालें असेल हें दुसरीकडे आपण पाहिलेलें आहे. कोलब्रूक, विल्सन व आर्यसमाजिस्ट समजतात त्याप्रमाणें हा ग्रंथ बोपदेवकृत नाहीं; त्याहून कित्येक शतकें प्राचीनतर आहे.

## भागवताचें महत्त्व.

भागवताचें महत्त्व पद्मपुराणाच्या शब्दांनींच सांगणें इष्ट वाटतें:—

सदा सेव्या सदा सेव्या श्रीमद्भागवती कथा ।
यस्याः श्रवणमात्रेण हरिश्चित्तं समाश्रयेत् ।
पुराणेषु च सर्वेषु श्रीमद्भागवतं परम् ॥
यत्र प्रतिपदं विष्णुर्गीयते बहुधर्षिभिः ॥

अर्थोऽयं ब्रह्मसूत्राणां भारतार्थविनिर्णयः ।
गायत्रीभाष्यरूपोऽसौ वेदार्थपरिबृंहितः ॥

श्रीमद्भागवत आम्हा सनातनधर्मीयास अत्यंत प्रिय वाटते, कारण—
( १ ) याच्या श्रवणमात्रानें हरि चित्तात साठवतो, ( २ ) सर्व पुराणात हें श्रेष्ठ आहे, कारण, यात प्रतिपदीं ऋषींनीं हरीची स्तुति केली आहे; ( ३ ) हे ब्रह्मसूत्राचा अर्थ, भारताच्या अर्थाचा खासा निर्णय व गायत्रीचें भाष्यरूप आहे. ( ४ ) वेदार्थाचें परिबृंहण ( विस्तार ) करणारें आहे.

वरील कारणामुळें भागवतावर जनाची परम श्रद्धा असता, काहीं पूर्वीच्या मतवाद्यानीं व काहीं अर्वाचीन पाश्चात्य लेखकानीं व एतद्देशीय आर्यसमाजिस्टानीं त्यावरची श्रद्धा उडविण्याचे यत्न केलेले आहेत. ते असे—

( १ ) पूर्वीच्या मतवाद्याचें मत असे कीं, वैष्णव भागवत हे महापुराण नसून, फक्त एक वैष्णवतत्र आहे, देवीभागवतच महापुराण होय !

( २ ) अर्वाचीन लेखकाचा आक्षेप असा आहे कीं, भागवत व्यासकृत नसून वोपदेवानें रचिलें ! या दुसऱ्या मताबद्दल प्रथमच वर विचार केलेला आहे. आता पूर्वीच्या मतवाद्याच्या मताचा विचार करूं.

श्रीधरस्वामींच्या टीकेंत एके ठाईं ' अतो भागवतं नामाऽन्यदिति नाशङ्कनीयम् । ' असें म्हटलेलें आहे. यावर कै० गोपाळाचार्य म्हणतात कीं, कालिकापुराण, सौरपुराण, देवीपुराण, देवीभागवतपुराण, विष्णु भागवतपुराण—या सर्व भागवत नावाच्या पुराणामध्यें महापुराण विष्णुभागवतच होय, कालिकादिपुराण नव्हत, असें सागण्याचा श्रीधरस्वामींचा भावार्थ आहे ! श्रीधरस्वामींच्या वेळीं ' भागवत ' या नावाखालीं २–४ पुराणें तरी नादत होतीं असें स्पष्ट दिसतें, व त्यापैकीं काहीं आपणास महापुराणही म्हणवून घेत होतीं ! निदान देवीभागवत तरी आप_

णास ' महापुराण ' समजत होतें; व महापुराणांचे यादींतील पांचवें पुराण आपणच आहों, असे पहिल्या स्कंधाच्या दुसऱ्या अध्यायांत त्यानें म्हटलेलें आहे. देवीभागवतानें आपली ग्रंथसंख्या स्कंध १२–अ. ३१८ व श्लोक १८००० अशी दिलेली आहे. देवीभागवताची व विष्णुभागवताची सर्व लक्षणें जुळतात, पण **वैष्णवभागवताची अध्यायसंख्या ३३१–३२ असून देवीभागवताची ३१८ आहे;** हा मोठा फरक आहे! बाकीची चिन्हें सर्व जुळतील अशीच योजना केलेली आहे; पण दुसऱ्या एका प्रमाणावरून त्याचीनें देवीभागवत महापुराण नव्हे हें सिद्ध होतें, तें असें कीं, देवीभागवतानें आपणास महापुराणांत घालून, **दुसरें एक भागवत** उपपुराणांत घातलेलें आहे! पहा—

**माहेश्वरं भागवतं वासिष्ठं च सविस्तरम् ।**

देवी भा. पहिला स्कंध, अ. ३,

येथें टीकाकार म्हणतो, हें भागवत म्हणजे ' वैष्णव भागवत 'च होय! **वै.** भागवतांत उपपुराणांचा व दुसऱ्या भागवताचा बिलकूल उल्लेख नसून, देवीभागवतांत मात्र दुसऱ्या भागवताचा–व तोही उपपुराणांत उल्लेख आढळतो. यावरून **वै.** भागवत प्राचीन व मूळचें महापुराण होय हें अनायासेंच ठरून, **देवीभागवताचें** धाष्टर्य मात्र जगापुढें येतें! पण, देवीभागवतानें स्वतःच्या हातानें स्वतःस पकडून घेतलें आहे!

देवीभागवतटीकाकार नीळकंठ याची दे. भा. ची प्रस्तावना पुराणाचा अभ्यास करणाऱ्यांनीं वाचण्यासारखी आहे. त्या टीकाकारानें दे. भा. ची जरी तरफदारी केलेली आहे तरी **देवीभागवताच्या स्वतःच्या** पुराव्यावरून व श्रीधरस्वामींच्या वरील वचनावरून श्रीमद्भागवत- **( वैष्णव ) च मूळचें महापुराण ठरतें !** यानं ओघाओघानें देवीभागवत श्रीधरस्वामींहून ( इ० स० ११०० ) प्राचीन दिसते, हेंही कबूल आलें! देवीभागवताच्या काळाबद्दल ओघानें येथेंच विवेचन करितों.

## देवीभागवताचा काळ !

टीकाकार नीळकंठ म्हणतो कीं, कूर्म, गरुड व पद्मपुराणामध्ये महापुराणात एक भागवत असून शिवाय उपपुराणातही एक भागवत आहे. हेमाद्रीनें **दानप्रस्तावांत** कूर्मपुराणातून १८ महापुराणाविषयीं उतारे घेतल्यानंतर उपपुराणाविषयीं त्याच पुराणातून पुढे असा उतारा घेतलेला आहेः—

> अन्यान्युपपुराणानि मुनिभि. कथितानि तु ।
> आद्य सनत्कुमारोक्तं नारसिंहमतः परम् ॥
> पराशरोक्तं प्रवरं तथा भागवताद्वयम् ।

या उताऱ्यावरून हेमाद्रीच्या वेळीं दोन भागवतें प्रचलित होतीं इतकेंच नव्हे, तर त्याच्यापूर्वीही श्रीधराच्या वेळीं ( इ० स० ११०० ) दोन भागवत होतीं हें कळून येतें. गरुडपुराण, तत्त्वरहस्य, अंश २, धर्मकाड अ १ मध्यें व तसेंच पद्मपुराण, शकुनपरीक्षा, व भागवतमाहात्म्य १९ या अध्याय यात ' दुर्गा भागवत ', " दौर्गभागवत ", 'देवी भागवत' या नावानीं देवीभागवताचे उल्लेख आलेले आहेत.

> पुराणं भागवतं दौर्गं नंदिप्रोक्त तथैव च ।
> पाशुपत्यं रेणुकं च भैरवं च तथैव च ॥ गारुडे.
> वाराहं ब्रह्मवैवर्त शकुनेपु प्रशस्यते ।
> शैवं भागवत दौर्गं भविष्योत्तरमेव च ॥ पद्म, शकुनप.
> शैवमादिपुराणं च देवीभागवत तथा ।
> पद्म, भागवतमाहात्म्य अ. १९

नीळकंठ म्हणतो कीं,शैव पुराणांत देवीभागवतास महापुराण मानिलें आहेः-

भगवत्याश्च दुर्गायाश्चरितं यत्र विद्यते ।
तत्तु भागवतं प्रोक्तं; न तु देवीपुराणकम् ॥

शैवपुराण, उत्तरखंड, मध्यमेश्वरमाहात्म्य.

हे वर्णन महापुराणाची गणना करिते वेळीं आलेलें आहे. शैवपुराणांत ब्राह्म, पाद्म, विष्णु, शैव, **देवीभागवत**, नारद, मार्कंडेय, अग्नि, भविष्य, ब्रह्मवैवर्त, लिंग, वाराह, स्कांद, वामन, कूर्म, मात्स्य, गारुड व ब्रह्मांड हीं महापुराणें मानिलीं आहेत; यांत विष्णुभागवत महापुराण धरिलें नाहीं.

हेमाद्रीनें **कालिकापुराणांतून** खालील उतारा दिलेला आहे:— 'यदिदं कालिकाख्यं तन्मूलं भागवतं स्मृतम् ।' याचा नीळकंठानें तिसराच अर्थ घेतलेला आहे. तो असा:— 'कालिकाख्य पुराणाचें मूळ देवीभागवत आहे'; असा अर्थ पुराणकाराचा असावा असें वाटत नाहीं. त्यानें विष्णुभागवत व देवीभागवत या दोघासही पलीकडे सारून स्वतःस 'मूळ भागवत' ही पदवी घेतलेली आहे. हेमाद्रि ज्याअर्थी कालिकापुराणातून वरील वाक्य उतरून घेत आहे त्याअर्थी 'भागवत' म्हणून पुढें आलेलीं त्याच्या वेळीं निदान ३।४ पुराणें तरी असावींत असें वाटतें. (१) विष्णुभागवत, (२) देवीभागवत, (३) कालिकापुराण व (४) देवीपुराण. देवीभागवत व देवीपुराण हींहीं पण भिन्न होत हें शैवपुराणातील वरील वाक्यानें स्पष्ट होतें; असो. नीळकंठाचीं एकंदर प्रमाणें पहातां त्यानें देवीभागवत महापुराण ठरेल असें वाटत नाहीं; कारण देवीभागवतानें स्वतःस पकडून दिलेलें आहे. वैष्णव भागवतास देवीभागवताचें नावही माहीत नाहीं; पण देवीभागवत वै. भागवतास उपपुराणात लेखतें; यावरूनच वै. भागवत प्राचीनतर होय, हें सिद्ध होतें. देवीभागवत महापुराण कीं वैष्णवभागवत महापुराण यावद्दल संस्कृतमध्यें इतकें वाङ्मय आहे:—

( १ ) रामाश्रमांची **दुर्जनमुखचपेटिका**; हींत वैष्णवभागवतच महा-पुराण म्हणून ठरविलेलें आहे.

( २ ) काशीनाथभट्टाची **दुर्जनमुखमहाचपेटिका**; हींत देवीभागवतच महापुराण म्हणून ठरविलेलें आहे.

( ३ ) **दुर्जनमुखपद्मपादुका** कोणीं लिहिली आहे तें नांव नाहीं; हींत पहिल्या ग्रंथाच्या प्रमाणांस उत्तरें दिलीं आहेत.

( ४ ) **भागवतस्वरूपविषयशंकानिरासत्रयोदश**; यांत पुरुषो-त्तमानें वै. भागवताची तरफदारी केलेली आहे.

( ५ ) **मिताक्षरेवर** टीका करितेवेळीं बाळंभट्टानीं वैष्णवभागवत महापुराण नव्हे असा आक्षेप घेतलेला आहे.

( ६ ) **नीळकंठानें** देवीभागवताच्या प्रस्तावनेंत देवीभागवताची तरफदारी केलेली आहे.

( ७ ) **गोपाळाचार्य** यानीं **भागवतभूषणांत** वैष्णवभागवतच महापुराण ठरविलेलें आहे. गोपाळाचार्यांचा हा निबंध फारच सुंदर व वाचनीय आहे.

( ८ ) याशिवाय, **सिद्धांतदर्पण** नावाचा ग्रंथ असून त्यांत वै. भागवताची तरफदारी आहे. असो.

ह्या एकंदर वादाचा समारोप असा करितां येईलः—

| विष्णुभागवत. | देवीभागवत. |
|---|---|
| यावर हनुमत्, चित्सुख व शंकर यांच्या व्याख्या होत्या. श्रीधर-स्वामींनीं यासच भागवत म्हटलें आहे. गौडपादाचार्य यांतून उतारे घेतात. अनेक प्राचीन उल्लेख या ( पुढें चालू. ) | याचें अस्तित्व इ०स० ११०० च्या सुमारच्या श्रीधरस्वामींस व पुढें हेमाद्रींस वगैरे माहीत होतें. यापूर्वी हें पुराण अस्तित्वांत होतें असें वाटत नाहीं. नीळकंठापूर्वी यावर ( पुढें चालू. ) |

विष्णुभागवतासच उल्लेखून आहेत. इत्यादि कारणांमुळें विष्णुभागवतच महापुराण होय असें समजण्यास हरकत नाहीं. हें पुराण अत्यंत महत्त्वाचें व प्राचीन आहे. तसें देवीभागवत नाहीं! गर्ग व शौनक यांनीं याचाच उल्लेख केलेला आहे.

टीकाही नव्हत्या. नीळकंठच म्हणतो, 'व्याख्यानरहितस्य च' व्याख्यान नाहीं म्हणून आपण व्याख्यान लिहितों. हे इतकें श्रेष्ठ असतें तर पूर्वी यांवर व्याख्या कां नाहीं झाल्या! देवीभागवत स्वतःस महापुराण ठरवून उपपुराणांत एक भागवत सांगतें; तेथें नीळकंठ वै. भागवतच घेतो. यावरूनच देवीभागवतकारास वै. भागवत माहीत होतें हें सिद्ध होतें. देवीभागवताचें खरें पहातां उपपुराणांतही नांव नाहीं !!!

वरील एकंदर प्रमाणपरंपरेवरून असें दिसून येईल कीं, वैष्णव लोक विष्णुभागवत व शाक्त लोक देवीभागवत महापुराण मानतात. आमचें मत वैष्णवभागवतच मूळचें महापुराण असें आहे. याविषयीं आणखी कांहीं विचार करूं:—

विष्णुभा. व देवीभा. या दोहोंची तुलना केली तर असें दिसून येईल कीं, दोहोंची रचना अध्यायसंख्येशिवाय बाकी सर्व लक्षणवर्णनांत जुळेल अशी केलेली आहे. यामुळें हा वाद मिटणें कठिण पडलें होतें. मत्स्यपुराणाच्या मतें भागवताचें लक्षण असें आहे:—

> यत्राधिकृत्य गायत्रीं वर्ण्यते धर्मविस्तरः ।
> वृत्रासुरवधोपेतं तद्भागवतमुच्यते ॥
> सारस्वतस्य कल्पस्य मध्ये ये स्युर्नरामराः ।
> तद्वृत्तांतोद्भवं लोके तद्भागवतमुच्यते ।
> अष्टादशसहस्राणि पुराणं तत्प्रकीर्तितम् ।

पद्मपुराणानें तर भागवतमाहात्म्यच लिहिलेलें आहे. नारदपुराणांत जी भागवताची विषयानुक्रमणिका दिलेली आहे, ती पाहिली तर ती वैष्णव-भागवताचीच दिली आहे असें दिसून येतें, इतकेंच नव्हे तर तेव्हां भागवत सध्याच्याप्रमाणेंच होतें असें कळेल. यावरून मत्स्य, नारद व पाद्म हीं पुराणें विष्णुभा. च महापुराण मानतात हें कळून येईल; पण "शिव-पुराण, देवीयामल वगैरे ग्रंथांत देवीभागवतच महापुराण धरिलेलें आहे, मत्स्यपुराणोक्त 'सारस्वतकल्प' श्रीमद्भागवतांत नाहीं, पाद्मकल्पाचा प्रसंग आहे; तसेंच,

> हयग्रीवब्रह्मविद्या यत्र वृत्रवधस्तथा ।
> गायत्र्या च समारंभस्तद्वै भागवतं विदुः ॥

असें जे चित्सुखाचार्यांच्या 'भागवत–कथा–संग्रहांत' लक्षण दिलें आहे, त्यांतील वृत्रासुरवधाची कथा दोन्ही पुराणांत असली तरी हयग्रीवाला ब्रह्मविद्यालाभ झाल्याची कथा विष्णुभागवतांत नाहीं, त्याचा विस्तार देवीभागवतांतच आहे, यामुळें दे. भा. च महापुराण होय," असें दुसऱ्या पक्षाचें मत आहे. यास उत्तर असें आहे कीं, श्रीधरस्वामींनीं ('द्वात्रिंशत्त्रिशतं च यस्य विलसत्') भागवतांत ३३२ अध्याय आहेत असें म्हटलें आहे व त्याचप्रमाणें, काशीनाथानें दुर्जनमुखमहाचपेटिकेंत चित्सुखानें उतरून घेतलेला पुराणार्णवाचा खालील श्लोक दिलेला आहे.

> स्कंधा द्वादश एवात्र कृष्णेन विहिताः शुभाः ।
> द्वात्रिंशत्त्रिशतं पूर्णमध्यायाः परिकीर्तिताः ॥

हा उल्लेख अत्यंत महत्त्वाचा आहे. यानें चित्सुखापूर्वीच्या पुराणार्णवांतही श्रीमद्भागवतच महापुराण धरिलेलें आहे हें कळून येतें. शिवाय, यावरून हेंही सिद्ध होतें कीं चित्सुखापूर्वीच भागवतांत ३३२ अध्याय होते;

म्हणजे इ० स० ८०० च्या पूर्वीच त्यांत हल्लींइतके–३३२ अध्याय होते. चित्सुखापूर्वीच्या पुराणार्णवाच्या वेळींही भागवत हल्लींसारखें होतें असे मानण्यास हरकत दिसत नाहीं! चित्सुखाचार्यांचा 'भागवतकथासंग्रह,' हनुमानाची भागवतावरील टीका, व पुराणार्णव आज उपलब्ध होतील तर आणखीही नवा प्रकाश पडेल! बहुधा या तिघांच्याही वेळीं देवीभागवत नसावें! ते ८०० ते ११०० च्या दरम्यान निघालें असावें.

## श्रीमद्भागवताचें महत्त्व.

सर्ववेदांतसारं हि श्रीभागवतमिष्यते ।

तद्रसामृततृप्तस्य नान्यत्र स्याद्रतिः क्वचित् ॥

भागवत, १२–१३–१५.

श्रीमद्भागवत वेदांतदृष्ट्या अतिशय महत्त्वाचें असल्यामुळे व त्यामुळें मनुष्यास परमेश्वराच्या ठाईं रति उत्पन्न होत असल्यामुळें यांतून गौडपाद, शंकर, मध्व इत्यादि आचार्यांनीं उतारे घेतलेले आहेत; शिवाय, हनुमत्, चित्सुख, शंकर, मध्व इत्यादिकांपासून तों तहत आजमितीपर्यंत शेंकडोंजणांनीं त्यावर टीका लिहून आपणांस पुनीत करून घेतलेलें आहे; तसेंच याचीं अनेक भाषांत भाषांतरें झालेलीं आहेत!! यादतकें लोकप्रिय पुराण दुसरें कोणतेंही नाहीं.

## वैष्णवधर्माची त्रयी!

श्रीमद्भगवद्गीता, विष्णुपुराण व भागवत ही वैष्णवधर्माची त्रयी आहे. श्रीधरस्वामींची या तिन्हींवरही टीका आहे. हनुमानाची गीता व भागवतावर आहे; विष्णुपुराणावर असल्याची माहिती नाहीं. चित्सुखाची गीतेवर टीका असल्याबद्दल माहिती नाहीं. भागवत व विष्णु-

पुराण यावर त्याची टीका आहे. असो. याप्रमाणें श्रीमद्भगवद्गीता, विष्णुपुराण व भागवत ही वैष्णवधर्माची त्रयी होय *

---

## नारदपुराण, ६ वें

नारदपुराणात या पुराणाची सूची येणेप्रमाणें दिलली आहे —

शृणु विप्र ! प्रवक्ष्यामि पुराण नारदीयकम् ।
पचविंशतिसाहस्र बृहत्कल्पकथाश्रयम् ॥
सूतशौनकसवाद सृष्टिसक्षेपवर्णनम् ।
नानाधर्मकथा पुण्या प्रवृत्ते समुदाहृता ॥
प्राग्भावे प्रथमे पादे सनकेन महात्मना ।
द्वितीये मोक्षधर्माख्ये मोक्षोपायनिरूपणम् ॥
वेदागाना च कथन शुकोत्पत्तिश्च विस्तरात् ।
सनदनेन गदिता नारदाय महात्मने ॥
महातत्रे समुद्दिष्ट पशुपाशविमोक्षणम् ।
मत्राणा शोधन दीक्षा मत्रोद्धारश्च पूजनम् ॥
प्रयोगा कवच नाम सहस्र स्तोत्रमेव च ।
गणेशसूर्यविष्णूना नारदाय तृतीयके ॥
पुराणलक्षण चैव प्रमाण दानमेव च ।
पृथक्पृथक्समुद्दिष्ट दान फलपुर सरम् ॥

---

* बहुतेक पुराणांना भागवत पाचवें पुराण धरिलें असून, पद्मपुराणानें मात्र तें सर्व पुराणांचें सार असल्यामुळें, त्यास शेवटचें पुराण मानिलें आहे

चैत्रादिसर्वमासेषु तिथीनां च पृथक् पृथक् ।
प्रोक्तं प्रतिपदादीनां व्रतं सर्वौघनाशनम् ॥
सनातनेन मुनिना नारदाय चतुर्थके ।
पूर्वभागोऽयमुदितो बृहदाख्यानसंज्ञितः
अस्योत्तरविभागे तु प्रश्न एकादशीव्रते ।
वसिष्ठेनाथ संवादो मांधातुः परिकीर्तितः ॥
रुक्मांगदकथा पुण्या मोहिन्युत्पत्तिकर्म च ।
वसुशापश्च मोहिन्यै पश्चादुद्धरणक्रिया ॥
गंगाकथा पुण्यतमा गयायात्रानुकीर्तनम् ।
काश्या माहात्म्यमतुलं पुरुषोत्तमवर्णनम् ॥
यात्राविधानं क्षेत्रस्य बह्वाख्यानसमन्वितम् ।
प्रयागस्याथ माहात्म्यं कुरुक्षेत्रस्य तत्परम् ॥
हरिद्वारस्य चाख्यानं कामोदाख्यानकं तथा ।
बदरीतीर्थमाहात्म्यं कामाख्यायास्तथैव च ॥
प्रभासस्य च माहात्म्यं पुराणाख्यानकं तथा ।
गौतमाख्यानकं पश्चात् वेदपादस्तु वस्तुतः ॥
गोकर्णक्षेत्रमाहात्म्यं लक्ष्मणाख्यानकं तथा ।
सेतुमाहात्म्यकथनं नर्मदातीर्थवर्णनम् ॥
अवन्त्याश्चैव माहात्म्यं मथुरायास्ततः परम् ।
वृंदावनस्य महिमा वसोर्ब्रह्मांतिके गतिः ।
मोहिनीचरितं पश्चात् एवं वै नारदीयकम् ॥

यावरून, याच्या पूर्वभागात चार पाद, व उत्तरभाग असे विभाग असल्याचें कळून येईल. हल्लीं उपलब्ध असून मुंबईस छापलेल्या नारदपुराणात प्रायः हे सर्व विषय आहेत. प्रचलित नारदपुराणाची संख्या प्रायः २३००० आहे.

विल्सन साहेबास फक्त ३००० श्लोक मिळाले होते, संपूर्ण नारदपुराण त्यास पहाण्यास मिळालें नव्हतें. त्यास मिळालेल्या भागातील विषयाची सूची पहाता असें कळून येतें कीं, नारदपुराणाच्या उत्तर भागातील फक्त पहिले ३७ अध्याय त्यास मिळाले होते, म्हणून त्यास नारदपुराणात संपूर्ण पुराणलक्षण दिसलें नाहीं.

मत्स्यपुराणात या पुराणाचें येणेंप्रमाणें लक्षण दिलेलें आहे —

यत्राह नारदो धर्मान् बृहत्कल्पाश्रयानिह ।
पञ्चविंशत्सहस्राणि नारदीयं तदुच्यते ॥

हल्लीं छापलेलें नारदपुराणच मत्स्याचें नारदपुराण होय, असें लक्षणावरून कळून येतें.

हा ११ व्या शतकात उत्पन्न झालेला एक भक्तिग्रंथ असावा असें विल्सनचें मत आहे, पण ११ व्या शतकात आल्‌बिरुणीनें याचा उल्लेख केलेला असून, बाराव्या शतकात दानसागरात यातील उतारे गौड देशाच्या राजा बल्लाळसेनानें घेतले आहेत. याचा उत्तरभाग जरी वैष्णव सांप्रदायाचा दिसला तरी पूर्वभाग बराच जुना दिसतो, कदाचित् याचा मूळ प्राचीन अंश बराच लुप्त झालेला असण्याचा संभव आहे

१. पद्मपुराणाच्या निरीक्षणात दाखविलेलेंच आहे कीं, नारदपुराणानें विषयसूची देते वेळीं त्या पुराणात मायावादनिंदा, पाखंडलक्षण, हीं व असला मतद्वेषाचा मजकूर नव्हता. यावरून या पुराणातील पुराणवर्णन मतद्वेषोत्पत्तीच्या पूर्वीच आहे हे कळून येतें.

२. तसेंच, विष्णुपुराणनिरीक्षणांत असें दाखविलें आहे कीं, या पुराणांतील पुराणसूची बहुधा शंकराचार्यांहूनही प्राचीन, म्हणजे ५०० ते ६०० च्या सुमारची असावी. असो.

बृहन्नारदपुराण नांवाचाही एक वैष्णवग्रंथ छापलेला आहे; परंतु तो महापुराण नव्हे; उपपुराणांत त्याची गणना करितां येईल. लघुबृहन्नारदीय नांवाच्याही चोपड्या मिळतात; पण त्यांचीही गणना उपपुराणांत करणें जरूर दिसतें.

---

## मार्कंडेयपुराण, ७ वें.

नारदपुराणानें या पुराणाची याप्रमाणें सूची दिलेली आहे:—

अथातः संप्रवक्ष्यामि मार्कंडेयाभिधं मुने ।
पुराणं सुमहत् पुण्यं पठतां शृण्वतां सदा ॥
यत्राधिकृत्य शकुनीन्सर्वधर्मनिरूपणम् ।
मार्कंडेयेन मुनिना जैमिनेः प्राक् समीरितम् ॥
पक्षिणां धर्मसंज्ञानां ततो जन्मनिरूपणम् ।
पूर्वजन्मकथा येषां विक्रिया च दिवस्पते ॥
तीर्थयात्राबलस्यातो द्रौपदेयकथानकम् ।
हरिश्चंद्रकथा पुण्या युद्धमाडीबकाभिधम् ॥
पितापुत्रसमाख्यानं दत्तात्रेयकथा ततः ।
हैहयस्याथ चरितं महाख्यानसमाचितम् ॥
मदालसाकथा प्रोक्ता अलर्कचरितान्विता ।
सृष्टिसंकीर्तनं पुण्यं नवधा परिकीर्तितम् ॥

कल्पांतकालनिर्देशो यक्षसृष्टिनिरूपणम् ।
रुद्रादिसृष्टिरप्युक्ता द्वीपवंशानुकीर्तनम् ॥
मनूनां च कथा नाना कीर्तिताः पापहारिकाः ।
तासु दुर्गाकथाऽत्यंतं पुण्यदा चाष्टमेंऽतरे ॥
तत्पश्चात्प्रणवोत्पत्तिस्त्रयीतेजसमुद्भवः ।
मार्कंडेयस्य जन्माख्या तन्माहात्म्यसमन्विता ॥
वैवस्वता च यश्चापि वत्सप्रेश्चरितं ततः ।
खनित्रस्य ततः प्रोक्ता कथा पुण्यमहात्मनः ।
अविक्षिच्चरितं चैव किमिच्छव्रतकीर्तनम् ।
नरिष्यंतस्य चरितं रामचंद्रस्य सत्कथा ॥
कुशवंशसमाख्यानं सोमवंशानुकीर्तनम् ।
पुरूरवाकथा पुण्या नहुषस्य कथाऽद्भुता ॥
ययातिचरितं पुण्यं यदुवंशानुकीर्तनम् ।
श्रीकृष्णबालचरितं माथुरं चरितं ततः ॥
द्वारकाचरितं चाथ कथा सर्वावतारजा ।
ततः सांख्यसमुद्देशप्रपंचस्तत्त्वकीर्तनम् ॥
मार्कंडेयस्य चरितं पुराणश्रवणे फलम् ।

मत्स्यपुराणांत याविषयीं असे लिहिलेले आहे कीः--

यत्राधिकृत्य शकुनीन्धर्मान्धर्मविचारणा ।
व्याख्याता वै मुनिप्रश्ने मुनिभिर्धर्मचारिभिः ॥
मार्कंडेयेन कथितं तत्सर्वं विस्तरेण तु ।
पुराणं नवसाहस्रं मार्कंडेयमिहोच्यते ॥ ५३-२६ ॥

प्रचलित मार्कंडेय पुराणांत नारद व मत्स्यपुराणांची लक्षणें सर्व आहेत. प्रचलित मार्कंडेयात ६९०० श्लोक आहेत;* मग आणखी २१०० श्लोक कोठें गेले ? यास उत्तर असें कीं, प्रचलित मार्कंडेय पुराणांत नरिष्यंतचरिताच्या पुढचा मजकूर नाहीं. नरिष्यंतचरिताचा पुढे पराच मजकूर मार्कंडेयात होता ही गोष्ट नारदपुराणावरून कळून येते. तो ( लुप्त ) मजकूर या श्लोकसंख्येत मिळविला तर श्लोकसंख्या बरोबर ९००० होईल. या पुराणातील सप्तशति चंडीदेवीचा पाठ प्रसिद्ध असून सर्व लोकास सप्तशति विश्रुत आहे. या पुराणात अनेक जुनाट कथा अशा आहेत कीं ज्या दुसरीकडे कोठेंही आढळत नाहींत. प्रचलित पुराणात जशी जुन्यानव्याची मिसळ असते तशी या पुराणांत बिलकूल नाहीं; शिवाय, या पुराणाशीं व्यासाचाही संबंध दाखविण्यात आलेला नाहीं.

श्रीशंकराचार्य, बाणभट्ट व मयूरभट्ट यानीं या पुराणाचा उल्लेख केलेला असल्यामुळें या ग्रंथास पराच प्राचीनत्वाचा मान मिळतो. नेपाळात एक बौद्ध आचार्यानें ८००वर्षांपूर्वी लिहिलेली सप्तशतीची पोथी मिळालेली आहे !

---

## आग्नेयपुराण, ८ वें.

हल्लीं अग्निपुराण दोन तऱ्हेचें मिळतें, एक छापील ३८३ अध्यायाचें ( आनदाश्रमातील ) व जवळ जवळ १२ हजार श्लोकांचें; व दुसरें *अप्रसिद्ध पं. ज्वालाप्रसाद यास मिळालेलें १८१ अध्यायाचें.*

नारदपुराणात आग्नेयपुराणाची विषयानुक्रमणी याप्रकारें दिलेली आहे:—

> अथात. संप्रवक्ष्यामि तवाऽऽग्नेयपुराणकम् ।
> ईशानकल्पवृत्तालं वसिष्ठायानलोऽब्रवीत् ॥

---

* विल्सन यांस फक्त पहिलें खंड ६९०० श्लोकांचेंच तेवढें मिळालें !

तत्पंचदशसाहस्रं नाम्ना चरितमद्भुतम् ।
पठतां शृण्वतां चैव सर्वपापहरं नृणाम् ॥
प्रश्नपूर्वं पुराणस्य कथाः सर्वावतारजाः ।
सृष्टिप्रकरणं चाथ विष्णुपूजादिकं ततः ॥
अग्निकार्यं ततः पश्चान्मंत्रमुद्रादिलक्षणम् ।
सर्वदीक्षाविधानं च अभिषेकनिरूपणम् ॥
लक्षणं मंडलादीनां कुशापामार्जनं ततः ।
पवित्रारोपणविधिर्देवालयविधिस्तथा ॥
शालग्रामादिपूजा च मूर्तिलक्ष्म पृथक्पृथक् ।
न्यासादीनां विधानं च प्रतिष्ठा पूर्तका ततः ॥
विनायकादिदीक्षाणां विधिर्ज्ञेयस्ततः परम् ।
प्रतिष्ठा सर्वदेवानां ब्रह्माण्डस्य निरूपणम् ॥
गंगादितीर्थमाहात्म्यं जम्ब्वादिद्वीपवर्णनम् ।
ऊर्ध्वाधोलोकरचना ज्योतिश्चक्रनिरूपणम् ॥
ज्योतिषं च ततः प्रोक्तं शास्त्रं युद्धजयार्णवम् ।
षट्कर्म च ततः प्रोक्तं मंत्रयंत्रौषधीगणः ॥
कण्डिकादिसमर्चा च षोढा न्यासविधिस्तथा ।
कोटिहोमविधानं च तदनंतरनिरूपणम् ।
ब्रह्मचर्यादिधर्माश्च श्राद्धकल्पविधिस्तथा ॥
गृह्यज्ञस्ततः प्रोक्तो वैदिकस्मार्तकर्म च ।
प्रायश्चित्तानुकथनं तिथीनां च व्रतादिकम् ॥

वारव्रतानुकथनं नक्षत्रव्रतकीर्तनम् ।
मासिकव्रतनिर्देशो दीपदानविधिस्तथा ॥
नवव्यूहार्चनं प्रोक्तं नरकाणां निरूपणम् ।
व्रतानां चापि दानानां निरूपणमिहोदितम् ॥
नाडीचक्रसमुद्देशः संध्याविधिरनुत्तमः ।
गायत्र्यर्थस्य निर्देशो लिंगस्तोत्रं ततः परम् ।
राजाभिषेकमंत्रोक्तिर्धर्मकृत्यं च भूभुजाम् ॥
स्वप्नाध्यायस्ततः प्रोक्तः शकुनादिनिरूपणम् ।
मंडलादिकनिर्देशो रणदीक्षाविधिस्तथा ॥
रामोक्तनीतिनिर्देशो रत्नानां लक्षणं ततः ।
धनुर्विद्या ततः प्रोक्ता व्यवहारप्रदर्शनम् ॥
देवासुरविमर्दाख्या ह्यायुर्वेदनिरूपणम् ।
गजादीनां चिकित्सा च तेषां शांतिस्ततः परम् ।
गोनसादिचिकित्सा च नाना पूजास्ततः परम् ॥
शांतयश्चापि विविधाश्छंदःशास्त्रमतः परम् ।
साहित्यं च ततः पश्चादेकार्यादिसमाह्वयाः ॥
सिद्धशिष्टानुशिष्टश्च कोषः स्वर्गादिवर्गके ॥
प्रलयानां लक्षणं च शारीरकनिरूपणम् ।
वर्णनं नरकाणां च योगशास्त्रमतः परम् ॥
ब्रह्मज्ञानं ततः पश्चात्पुराणश्रवणे फलम् ।
एतदाग्नेयकं विप्र ! पुराणं परिकीर्तितम् ॥

नारदपुराणाच्या सूचींतील सर्व लक्षणें हल्लींच्या उपलब्ध अग्निपुराणात असलीं तरी त्यात ईशानकल्पाचा वृत्तात नाहीं एवढाच गौणपणा आहे, कारण प्रचलित अग्निपुराणाच्या दुसऱ्या अध्यायात म्हटलें आहे कीं.—

प्राप्ते कल्पेऽथ वाराहे कूर्मरूपोऽभवद्धरिः ॥

नारदसूचींतील अग्निवसिष्ठसवाद व ईशानकल्पवृत्तात हीं दोन सोडून बाकीचे सर्व विषय प्रचलित पुराणाशीं जुळतात, यावरून त्या वेळच्यापेक्षा हल्लीं हे पुराण लहान असावें असें अनुमान होत. नारदपुराणानें याची संख्या १५ हजार व मात्स्यानें १६ हजार दिली आहे. हल्लींच्यात जवळ जवळ १२ हजार श्लोक आहेत. यावरूनच हल्लींचें अग्निपुराण पूर्वीच्या अ. पु. चें सशोधित व अवशिष्टरूप असण्याचा समव आहे. बल्लाळ-सेनानें दानसागरात अग्निपुराणातील म्हणून जे उतारे घेतलेले आहेत त्यातील काहीं यात मिळत नाहींत, यावरूनही या पुराणाचा पूर्वभाग काहीं लुप्त झालेला आहे असें वाटतें. तसेंच, स्कदपुराणातील शिवरहस्य खंडात लिहिलेलें आहे कीं, अग्नींचें महात्म्य सागणें हाच अग्निपुराणाचा मुख्य हेतु आहे, पण हें लक्षण तर प्रचलित अग्निपुराणाशीं मुळींच लागू पडत नाहीं !

यावरून प्रचलित अग्निपुराण हें प्रतिसस्करण पावलेलें नूतन अग्नि पुराण आहे असें दिसतें, तथापि हें याचें नूतन स्वरूपही नारदसूचीच्या वेळीं होतें, किंवा उलट म्हणावयाचें म्हणजे असें कीं, नारदसूची झाली तेव्हा हें प्रचलित अग्निपुराण असून त्यात ईशानकल्पवृत्तात व वसिष्ठाग्निसवाद हे ३।४ हजार श्लोकाचे भाग अधिक होते. हे भाग पुढें लुप्त झाले. हे भाग बहुधा पुराणाच्या प्रारंभींच असावेत. मूळचें अग्नीच्या माहात्म्यानें भरलेलें अग्निपुराण तर अजी लुप्त झाल्याप्रमाणें दिसतें!

विल्सन साहेबास मिळालेल्या प्रतींत सुमारें १५ हजार श्लोक होते. आनंदाश्रमांत छापलेल्या प्रतींत ३८३ अध्याय व ११४५७ श्लोक आहेत; पण आनंदाश्रमाच्या श्लोकगणनापद्धतींत कित्येक श्लोकार्धांची गणनाच केलेली नसल्यामुळे आनंदाश्रमी प्रत सामान्यतः १२ हजारांची आहे असे म्हणतां येईल. विल्सनच्या दुसऱ्या दोन प्रती सुमारें १२ हजाराच्याच होत्या; पैकीं एक अकबरच्या वेळची व दुसरी इ० स० १८५९ मधील होती !*

प्रचलित अग्निपुराणाचा मुख्य उद्देश अग्नीची स्तुति हा नसून, सर्व-विद्या—परा व अपरा—सांगण्याचा आहे. पहाः—

आग्नेये हि पुराणेऽस्मिन् सर्वविद्याः प्रदर्शिताः ।

अ. ३८३, श्लोक ५२.

---

* अध्याय २७२ मध्यें या पुराणाची संख्या व लक्षणें अशीं दिलेलीं आहेत.

**अग्निना यद्वसिष्ठाय प्रोक्तं चाग्नेयमेव तत् ॥ १० ॥**
**द्वादशैव सहस्राणि सर्वविद्यावबोधकम् ।**

तेव्हा हें सर्वविद्यावबोधक स्वरूप हें पुराण १२ हजारांचें झाल्यानंतरचें लक्षण दिसतें ! या पुराणाच्या शेवटींही ( ३८३–६५ ) असा एक श्लोक आहे —

**इदं द्वादशसाहस्रं शतकोटिप्रविस्तरम् ।**
**देवानां हितकामेन संक्षिप्योद्गीतमग्निना ॥**

यावरून हें पूर्वी १२ हजाराहून अधिक असून हल्लींचें १२ हजाराचें हें स्वरूप संक्षिप्त आहे हें व्यक्त होतें. येथें ' द्वादशसाहस्रं ' बद्दल ' पंचदश, ' ' चतुर्दश ' असे पाठभेदही आहेत; पण ते छंदास जुळत नाहींत, शिवाय, मागील श्लोकांत ' द्वादशसाहस्र ' स्पष्टच आहे नारदसूचीच्या वेळीं वसिष्ठाग्नि-संवाद व ईशानकल्पवृत्तांत यांत असतां याची संख्या १५।१६ हजार होती व आतां त्याचें १२ हजारांचें संक्षिप्त स्वरूप राहिलेलें आहे हें कळून येतें.

यावरून विल्सनचें असें मत आहे कीं, हे मूळ अग्निपुराण नसावें. (It may be doubted if a single line of it be original) असें जरी आहे तरी त्यावरून हल्लींचें अग्निपुराण तयार करण्यात आलें आहे ते ग्रंथ प्राचीनतर असून, अग्निपुराणात त्याचा संग्रह ख्रिस्ती शकानंतर बऱ्याच काळानें केलेला असावा असें त्याचे मत आहे.

## हल्लींचें स्वरूप केव्हां आलें ?

हा प्रश्न अति महत्त्वाचा आहे, कारण, यावरून नारदसूत्रीचा काळही ठरेल आम्हीं यापूर्वीच नारदसूची शंकराचार्यांहून पूर्वी बहुधा ५०० ते ७०० च्या दरम्यान तयार झालेली असावी असें ठरविलेलें आहे हेच अनुमान आता जें आम्ही अग्निपुराणाच्या सद्य स्वरूपाविषयीं लिहिणार आहों त्यावरूनही दृढ होईल.

अग्निपुराण ३९ व्या अध्यायात २५ तंत्राचीं नावे आहेत, व दुसरी कडेही युद्धजयार्णव, कुब्जिकामत इत्यादि तंत्राचा उल्लेख आहे, यावरून कित्येकजण हा ग्रंथ तंत्रकालाच्या नंतरचा समजतात, पण तंत्रकाळ म्हणजे काय ? अलीकडे पंडित हरप्रसादशास्त्री वगैरेंनीं नेपाळदरबारच्या पोथ्या तपासून जे शोध लाविलेले आहेत त्यावरून तांत्रिक वाङ्मय बरच प्राचीन आहे हें कळून आलेलें आहे. कुब्जिकातंत्राची, गुप्तलिपीतील सुमारें सहाव्या शतकातली एक प्रत नुकतीच मिळालेली आहे यावरून कुब्जिकातंत्र व कुब्जिकामत निदान २००।३०० वर्षे या पोथीहून तरी प्राचीन असलीं पाहिजेत हें कळून येईल, म्हणजे इ० स० ३००।४०० इतकें तरी हें मत प्राचीन असेल, याहूनही पूर्वीचेंच असेल पण अर्वाचीन काहीं नाहीं !

दुसरें असें कीं, अग्निपुराणाचें सद्य स्वरूप ठरविण्याला दुसरीही

कांहीं साधनें आहेत. अग्निपुराणकर्त्यानें खालील धर्मशास्त्रें पाहून धर्मशास्त्रांचा संग्रह केलेला आहे:—

> मनुर्विष्णुर्याज्ञवल्क्यो हारीतोऽत्रिर्यमोंऽगिराः ।
> वसिष्ठदक्षसंवर्तशातातपपराशराः ॥ १ ॥
> आपस्तंबोशनोव्यासाः कात्यायनबृहस्पती ।
> गौतमः शंखलिखितौ धर्ममेते यथाऽब्रुवन् ॥ २ ॥
>
> अध्याय, १६२.

यावरून अग्निपुराणकर्त्यानें आपलें धर्मशास्त्रसार वरील स्मृतींवरून बनविलें हे कळून येतें.

वृद्धशातातपस्मृति म्हणून एक स्मृतिग्रंथ आहे; त्यांत या 'वन्हिधर्मशास्त्रा'चा स्पष्ट उल्लेख आहे:—

> पितुः सा भजते गोत्रं ऊर्ध्वं तु पतिपितृकम् ।
> इति प्रोक्तं पुरा वन्हि–धर्मशास्त्रानुसारतः ॥ ४३ ॥

आतां ही शातातपस्मृति किती प्राचीन आहे हें आपण पाहिलें पाहिजे; त्याशिवाय या प्रमाणाचा उपयोग काय होणार !

श्रीशंकराचार्यांनी आपल्या विष्णुसहस्रनामभाष्यांत या वृद्धशातातपस्मृतींतील उतारे घेतलेले आहेत. यावरून वृद्धशा. स्मृति त्यांच्याहून १००–१५० वर्षे तरी प्राचीनतर असली पाहिजे. म्हणजे वृद्धशा. स्मृति सुमारें ७०० इ०स० नंतर तरी असली पाहिजे! त्या स्मृतींत 'पुरा प्रोक्तं' म्हणण्याइतकें वन्हिधर्मशास्त्र प्राचीन असलें पाहिजे; म्हणजे १००–१५० वर्षे तरी तें प्राचीन–निदानपक्षीं–असलें पाहिजे. म्हणजे वन्हिधर्मशास्त्र निदान ५००–५५० इ० स० इतकें तरी प्राचीन असलें पाहिजे.

हल्लींच्या अग्निपुराणांत ३५९ ते ३६७ अध्याय अखेरपर्यंत अमरकोशांतील स्वर्गादि अनेक वर्गांचे उतारे आढळतात. हा अमर जर विक्रमाच्या वेळेचा धरिला तर प्रश्नच नाहीं; पण जरी ५ व्या किंवा ६ व्या शतकांतला धरिला तरी इ० स० ५०० ते ५५० हा अग्निपुराणाच्या *सद्यःस्वरूपाचा काळ म्हणून धरण्यास कांहींच हरकत नाहीं ! !*

यावरून मागें आम्हीं नारदपुराणाच्या सूचीचा इ. स. ५०० ते ६०० हा जो काळ ठरविलेला आहे तो जवळ जवळ बरोबर आहे हें कळून येईल; कारण असें कीं, नारदपुराणाच्या अग्निपुराणसूचींत ' कोपः स्वर्गादिवर्गके ' असा उल्लेख असल्यामुळें, ह्या सूचीच्या वेळीं या पुराणांत अमरकोशांतील उतारे होते हें निःसंदेह ठरतें; मग अमराचा काळ ५०० इ. स. धरिला तरी नारदसूची ६०० च्या सुमाराची धरण्यास बिलकूल हरकत दिसत नाहीं ! पण अमरकोश याहून प्राचीनतर धरिल्यास काळगणनेची खेंचाखेंच होत नाहीं ! जसें:—

कुब्जिकातंत्र इ. स. ३०० सुमारें.
अमरकोश इ. स. ३००—४००.
प्रचलित अग्निपुराण इ. स. ४००—४५० सुमारें.
वृद्धशातातपस्मृति इ. स. ५००—६०० सुमारें.
नारदपुराणसूची इ. स. ५००—६०० सुमारें.
*श्रीशंकराचार्य इ. स. ७८८—८२०.

*यांत थोडेंसें आगेंमागें करावें लागेल; पण सामान्यतः हे काळ बरोबर दिसतात. अमरकोश इ. स. ५०० त घेतला तर काळमानाची मारी* गर्दी होते; म्हणून वरील काळच सामान्यतः बरोबर दिसतात.

---

*तसेंच " आत्मविद्या च देवि त्वं इति श्रीस्तुती ' असा उतारा विष्णुसहस्रनामभाष्यांत आचार्योंनीं अग्निपुराणांतील श्रीस्तुतींतील दिलेला आहे. (अ.२३७)

## भविष्यपुराण, ९ वें.

या पुराणाविषयीं फारच गडबडगुंडा आहे. पंडित ज्वालाप्रसाद यांस हल्लीं चार प्रकारचीं भविष्यपुराणें मिळालेलीं आहेत. या चारींतही भविष्यपुराणाचीं थोडीं थोडीं लक्षणे मिळतात असें त्यांचें म्हणणें आहे. या चारींशिवाय, ' भविष्यद्ब्रह्मखंड ' किंवा ' ब्रह्मांडखंड ' नावाचा एक भूगोलविषयक संस्कृत ग्रंथही आपणास मिळालेला असल्याबद्दलही त्यांनीं लिहिलें आहे. हें खंडही त्यांच्या मतें प्राचीन आहे. वरील चार प्रकारच्या भविष्यपुराणाविषयीं पंडितजी म्हणतात कीं, यांपैकीं एकासही आपण आदिभविष्यपुराण म्हणून ग्रहण करूं शकत नाहीं.

मत्स्यपुराणांत याविषयीं असें लिहिलेलें आहे कीं:—

यत्राधिकृत्य माहात्म्यं आदित्यस्य चतुर्मुखः ।<br>
अघोरकल्पवृत्तांतप्रसंगेन जगत्स्थितिम् ॥<br>
मनवे कथयामास भूतग्रामस्य लक्षणम् ।<br>
चतुर्दशसहस्राणि तथा पंचशतानि च ।<br>
भविष्यचरितप्रायं भविष्यत्तदिहोच्यते ।

यावरून, यात ब्रह्मदेवानें आदित्यमहात्म्याचा प्रारंभ करून अघोरकल्पाच्या हकीकतीच्या प्रसंगानें जगाची स्थिति व सर्वभूतांचें लक्षण—हीं मनूला सांगितलीं असून, त्यात बहुतेक भविष्यकाळचीं चरितें व १४५०० श्लोक होते हें कळून येईल.

शैवपुराणाच्या उत्तरखंडाच्या मतें "भविष्योक्तेर्भविष्यकं" हेंच भविष्यपुराणाचें लक्षण आहे, वर मत्स्यानेंही ' भविष्यचरितप्रायं भविष्यत्तदिहोच्यते ' असेंच म्हटलें आहे. आता नारदपुराणाची सूची या पुराणाविषयीं काय म्हणते हें आपण पाहूं:—

अथातः संप्रवक्ष्यामि पुराणं सर्वसिद्धिदम्
भविष्यद्भवतः सर्वलोकाभीष्टप्रदायकम् ॥
यत्राह सर्वदेवानां आदिकर्ता समुद्यतः ।
सृष्ट्यर्थं तत्र संजातो मनुः स्वायंभुवः पुरा ॥
स मां प्रणम्य पप्रच्छ धर्मं सर्वार्थसाधकम् ।
अहं तस्मै तदा प्रीतः प्रोवाच धर्मसंहिताम् ।
पुराणानां यदा व्यासो व्यासं चक्रे महामतिः ।
तदा तां संहितां सर्वां पंचधा व्यभजन्मुनिः ॥
अघोरकल्पवृत्तांतनानाश्चर्यकथाचिताम् ।
तत्रादिमं स्मृतं सर्वं ब्राह्मं यत्रास्त्युपक्रमः ॥
सूतशौनकसंवादे पुराणप्रश्नसंक्रमः ।
आदित्यचरितं प्रायः सर्वाख्यानसमाचितम् ॥
सृष्ट्यादिलक्षणोपेतः शास्त्रसर्वस्वरूपकः ।
पुस्तकलेखकलेख्याना लक्षणं च ततः परम् ॥
संस्काराणां च सर्वेषा लक्षणं चात्र कीर्तितम् ॥
अक्षय्यादितिथीनां च कल्पाः सप्त च कीर्तिताः ॥
अष्टम्याद्याः शेपकल्पा वैष्णवे पर्वाणि स्थिताः ।
शैवे च कामतो भिन्नाः सौरे चान्यकथाश्च याः ॥
प्रतिसर्गाव्हयं पश्चान्नानाख्यानसमाचितम् ।
पुराणस्योपसंहारसहितं सर्वपंचमम् ॥
एषु पंचसु पूर्वस्मिन् ब्रह्मणो महिमाधिकः ।

धर्मे कामे च मोक्षे तु विष्णोश्चापि शिवस्य च ॥
द्वितीये च तृतीये च सौरो वर्गचतुष्टये ।
प्रतिसर्गाह्वयं त्वंत्यं प्रोक्तं सर्वकथाचितम् ॥
सभविष्यं विनिर्दिष्टं पर्व व्यासेन धीमता ।
चतुर्दशसहस्रं तु पुराणं परिकीर्तितम् ॥
भविष्यत्सर्वदेवानां साम्यं यत्र प्रकीर्तितम् ।
गुणानां तारतम्येन समं ब्रह्मेति हि श्रुतिः ॥

यावरून पहातां, भविष्यपुराणांत पांच पर्वें असून तें ब्रह्मयानें मनूला सांगितलें व त्यांत अघोरकल्पवृत्तांत आहे हें कळून येईल. याची संख्या १४००० होती. याचीं पांच पर्वें. पहिलें, ब्राह्मपर्व. यांत प्रायः आदित्यचरित असून सर्व प्रकारचीं आख्यानें, सृष्टिलक्षणें, सर्व शास्त्रांचें स्वरूप, पुस्तक, लेखक व लेख्य यांचें स्वरूप, संस्कारांचें स्वरूप व प्रतिपदादि सात तिथींचे कल्प हे विषय आहेत.

अष्टमी आदि शेषकल्प विष्णुपर्वांत आहेत.* शैवपर्वांत कामाशिवाय इतर विषय आहेत. सौरपर्वांत अंत्य कथा आहेत. त्यानंतर नाना आख्यानांनीं भरलेलें प्रतिसर्गपर्व आहे; व त्यांतच पुराणाचा उपसंहार आहे. हीं पांच पर्वें होत !

या पांच पर्वांत, धर्म या पुरुषार्थांत ब्रह्माचा किंवा ब्राह्मपर्वांचा महिमा अधिक; धर्म, काम व मोक्ष यांत विष्णूचा अगर विष्णुपर्वांचा अधिक, अर्थ व काम यांत शिवाचा किंवा शैवपर्वाचा, व वर्गचतुष्टयांत सौराचा किंवा सौरपर्वाचा महिमा अधिक म्हणून जाणावा. प्रतिसर्गपर्व हें शेवटचें

* विष्णु, शैव व सौर या पर्वांत काय विषय आहेत हें नीट कळत नाहीं !

असून त्यांत भविष्यासह सर्व कथा व्यासांनीं सांगितल्या आहेत. हें पुराण १४ हजारांचें आहे. यांत भविष्य व गुणांच्या तारतम्यानें सर्व देवांचें *साम्य सांगितलेलें आहे; कारण, ' समं ब्रह्म ' अशी श्रुति आहे.*"

वेंकटेश्वरप्रेसमध्यें व त्यावरून वाईस छापलेल्या भविष्यपुराणांत प्राचीन भविष्यपुराणांचीं कांहीं काहीं लक्षणें मिळतात. यात ब्राह्मपर्वांत आदित्यमाहात्म्य असलें तरी अघोरकल्पवृत्तांत किंवा ब्रह्मयानें मनु स्वायंभुव यास जगाची स्थिति सांगितलेली आढळत नाहीं. हल्लींच्या भ. पुराणांत नारदसूची-प्रमाणे पांच पर्वें मिळत नसून ब्राह्मपर्व व भविष्यासह प्रतिसर्गपर्व मात्र आहेत; पण या प्रतिसर्गपर्वांत अगदीं आधुनिक अशीं सर्व प्रकारचीं भविष्यें आढळतात. प्रतिसर्गपर्वांतील पुष्कळ अंश प्रक्षिप्त असावा, असेंच आम्हांस वाटतें.

नारदपुराणाच्या सूचीप्रमाणें भविष्यपुराणाचा विभाग ब्राह्म, वैष्णव, शैव, सौर, व प्रतिसर्ग या पांच पर्वांत झालेला आहे. पूर्वी भविष्यपुराणांत पांच पर्वें होतीं हें प्रचलित ब्राह्मपर्वावरूनही कळून येतें, जसें:—

प्रथमं कथ्यते ब्राह्मं द्वितीयं वैष्णवं स्मृतम् ।
तृतीयं शैवमाख्यातं चतुर्थं त्वाष्ट्रमुच्यते ॥
पंचमं प्रतिसर्गाख्यं सर्वलोकैः सुपूजितम् ।
एतानि तात ! पर्वाणि लक्षणानि निबोध मे ।
सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वंतराणि च ॥
वंशानुचरितं चैव पुराणं पंचलक्षणम् ॥ ब्राह्मपर्व, अ० १ ला

यात भविष्योत्तराचा उल्लेख नाहीं.

नारदमतानें अष्टमीतिथीच्या कल्पापासून वैष्णवपर्वाचा प्रारंभ होतो. पं. ज्वालाप्रसाद यांस *मिळालेल्या द्वितीय भविष्यपुराणाच्या* १५१ अध्या-

यापासून अष्टमीकल्पाचा आरंभ व विष्णुपर्व हीं दिसून येतात; परंतु या पोथींत या पूर्वीच्या अध्यायांत जितक्या कथा आहेत त्या त्यांस मिळालेल्या भविष्यपुराणांतील कथांशीं मेळ पावत असल्या तरी अधिकशा भागांत त्यांचा त्यांशीं मेळ नाहीं. यावरून असा संभव आहे कीं हा अधिकसा अंश प्रक्षिप्त असावा; म्हणजे पुढील काळांत कोणीं तरी तो बनवून त्यांत घातला असावा, असें त्यांनीं आपलें मत दिलेलें आहे.

• कांहीं भविष्याच्या ब्रह्मपर्वांत १३१ अध्याय आहेत; पंडित ज्वा. प्र. यांस मिळालेल्या दुसऱ्या भविष्याच्या विष्णुपर्वाच्या पूर्वार्धांत १५० अध्याय आहेत. बहुतेक पुराणांच्या मतें भविष्यपुराणाची श्लोकसंख्या १४।१४३ हजार आहे; पण दुसऱ्या भविष्यपुराणाच्या पहिल्या अध्यायांत त्याची श्लोकसंख्या ५० हजार आहे असें म्हटलेलें आहे ! ! ! शिवपुराणाच्या *वायुसंहितेंत ज्याप्रमाणें वाढलेल्या व नवीन शरीर पावलेल्या शिवपुराणाची* श्लोकसंख्या एक लक्ष म्हणून सांगितली आहे, त्याप्रमाणें ही अत्युक्ति समजली पाहिजे !

असले तरी मूळच्या भविष्यपुराणांतील अनेक कथा अजून विद्यमान आहेत, असें कळेल.

तिसऱ्या भविष्यपुराणांत सातव्या अध्यायांत आगम, तंत्र, यामल, डामर यांचा उल्लेख असल्यामुळे तें त्या त्या ग्रंथांच्या काळानंतर बनलेले असलें पाहिजे.

मत्स्यपुराणाच्या मतें व नारदाच्या मतें भविष्यपुराणांत अनेक भावी कथा आहेत. पहिल्या व दुसऱ्या भविष्यपुराणांत याची थोडी थोडी प्रचीति मिळते. सांबानें सूर्यमूर्तीची प्रतिष्ठा शाकद्वीपांतील 'मग'नांवाच्या ब्राह्मणांकडून करविली; तसेंच या ब्राह्मणांचे विवाह मग यादवकन्यांशीं होऊन त्यापासूनच 'भोजकां'ची उत्पत्ति झाली ही कथा भविष्यांत आढळते.

येथपर्यंत दिलेली माहिती पं. ज्वालाप्रसादाच्या माहितीप्रमाणें आहे. आता मी स्वतः मिळविलेल्या माहितीवरून या पुराणाविषयीं अधिक लिहितों.

मीं जी प्रत पाहिली आहे ती वेंकटेश्वरप्रेसने व त्यावरून वांईच्या पुराणप्रकाशक मंडळींनीं छापलेली पाहिली आहे. त्या प्रतीवरून खालील निरीक्षण आहे असें समजावें.

या पुराणांत प्रारंभापासून सूर्याचें महत्त्व फार आहे. त्यालाच ब्रह्मही म्हटलें आहे. भास्कररूपी परब्रह्मापासूनच ब्रह्मा ऊर्फ नारायण झाला असें यात वर्णन आहे; म्हणजे पर्यायानें सर्व काहीं सूर्यापासूनच उत्पन्न झालें असें म्हटलें आहे.

ब्राह्मपर्वाच्या चौथ्या अध्यायात उपनयनादि संस्कारवर्णनास सुरवात असून अ० १६ अखेरपर्यंत गृहस्थधर्म, स्त्रीधर्म-स्त्रियांनीं कर्तव्यें वगैरे सांगितलीं आहेत. हा भाग वात्स्यायनाच्या कामसूत्राशीं ताडून पाहण्यासारखा आहे. कदाचित् त्यावरूनही तो येथें घेतला असण्याचा संभव आहे; कदाचित् बाभ्रव्य-पांचालाच्या जुन्या कामतंत्रावरूनही घेतला असेल.

अध्याय १७ मध्ये ब्रह्मदेवाची पूजा व त्याच्या देवळांचे व पूजेचे महत्त्व सांगितलें आहे. तेव्हां वर्षारंभ कार्तिकांत व मास पूर्णिमान्त असल्याचें वर्णन आहे. तेव्हां कार्तिक कृष्ण प्रतिपदेस वर्षारंभ होत असे. यावरून हें वर्णन व हा भाग प्राचीन दिसतो; प्रतिपदेसच ब्रह्मदेवाची पूजा करावयाची ! कार्तिक कृष्ण प्रतिपदा; श्रावण कृष्ण द्वितीया, ( अशून्यशयना द्वि. ); तृतीया ( गौरीव्रत ); विनायक चतुर्थी, अंगारकी चतुर्थी; नागपंचमी; ( सर्पसत्र आस्तिकानें थांबविलें, ती पंचमी तिथि होती, ही भाद्रपद कृष्ण पंचमीस करावी असें म्हटलें आहे; म्ह. हल्लींच्या मानानें ती श्रावण शुद्ध पंचमीच होते ); स्कंदषष्ठी;* सूर्यसप्तमी ( रथसप्तमी )—या सात तिथींचे कल्प नारदसूचीप्रमाणें ब्राह्मपर्वांत असावयास पाहिजेत.

हल्लींच्या ब्राह्मपर्वाच्या अ० ४८ मध्ये भास्करसप्तमीबद्दल श्रीकृष्ण व सांब यांमधील संवाद आहे. अ० ४९–५२ पर्यंत सूर्याच्या देवळांची वर्णनें, त्याचें माहात्म्य,व त्याच्या पूजेचा विधि हे विषय आहेत. रथसप्तमी माघ शुद्ध सप्तमीस होती. पुढें सप्तमीकल्पाचाच विधि असून अध्याय २१६ पर्यंत सूर्याचेंच माहात्म्य वर्णिलेलें आहे. एकंदरींत या पर्वांत सूर्यमाहात्म्य व त्याची पूजा वगैरे बराच प्राचीन मजकूर आढळतो.

ब्राह्मपर्व अ० २१६ ला संपतें असें ( २१६–३० श्लोक ) यावरून दिसतें ' तयेदं परमं पर्व कथितं ब्रह्मसंज्ञितम्. ' ब्राह्मपर्वांत बहुतकरून सर्व

---

या ४३।४४ अध्यायांतील विषय **वज्रसूचिकोपनिषदाशीं** ताडून पहाण्यासारखा आहे. वज्रसूचिकोपनिषदही बरेंच प्राचीन आहे. त्यावर शंकराचार्यांची टीका असून, शिवाय इ० पू० पहिल्या शतकातील बौद्धआचार्य अश्वघोष याची त्यावर टीका ( विघातक ) आहे. यावरून हें वज्रसूचिकोपनिषद इ० पू० दुसऱ्या शतकाइतकें तरी प्राचीन असलें पाहिजे.

पूर्वीचाच मजकूर असल्याप्रमाणे याटतें. सौरधर्माचें इतकें विस्तृत व कंटाळवाणें वर्णन दुसरे कोठेंही नसेल. या पर्वाचे फक्त १२६ अध्याय विल्सन यांस मिळाले होते; शिवाय भविष्योत्तर म्हणून सुमारें १४००० ग्रंथ त्यांस मिळाला होता.

हे ब्राह्मपर्व जुनेच असावें असें दिसतें; यांतील एक उतारा बाराव्या शतकांतील अपरार्कांच्या याज्ञवल्क्यस्मृतीवरील टीकेत आढळतो (आनंदाश्रम ग्रंथांक, ४६, पृ. १६ ). तो उतारा म्हणजे:—

'तथा च भविष्यत्पुराणम् ।

अष्टादश पुराणानि रामस्य चरितं तथा ।
विष्णुधर्मादिशास्त्राणि शिवधर्माश्च भारत ॥
कार्ष्णवश्च पंचमो वेदो यन्महाभारतं स्मृतम् ।
सौराश्च धर्मा राजेंद्र मानवोक्ता महीपते ॥
जयेति नाम चैतेषां प्रवदंति मनीषिणः ॥'

हे श्लोक भविष्यपुराण, ब्राह्मपर्व, अध्याय ४ मधील ८७—९० हे आहेत. यावरून अपरादित्याच्या वेळीं भविष्यपुराणांत वरील श्लोक होते हें ठरतें. तसेंच, श्रीशंकराचार्यांनींही भविष्यत्पुराणातील उतारे घेतलेले आहेत. अपरादित्याने भविष्यत्पुराणाबरोबरच भविष्योत्तरांतूनही उतारे घेतलेले आहेत. यावरून भविष्योत्तर तेव्हा होतें हे कळून येईल. या ब्राह्मपर्वांत एकंदर २१६ अध्याय व ९०३६ श्लोक आहेत.

हल्लींच्या भविष्यपुराणातील मध्यमपर्व ही काय चीज आहे व तें पूर्वीचें कोणतें पर्व असावें हें कांहींच कळत नाहीं; कारण, नारदसूचीशीं याचा कोठेंच मेळ नाहीं. हे विष्णुपर्व, शैवपर्व अगर सौरपर्व ह्यांपैकीं

१ 'नारदोक्ता' असा हल्लीं भविष्यांत पाठ आहे,

एकही नव्हे हें उघडच आहे; मग, ही स्वतंत्रच कोठील तरी भानगड असावी. याचें आपण निरीक्षण करूं.

याच्या प्रारंभाच्या पहिल्या अध्यायात म्हटलेलें आहे कीः—

मध्यपर्व ह्यथो वक्ष्ये प्रतिष्ठादिविनिर्णयम् ।
धर्मप्रशंसनं चात्र ब्राह्मणादिप्रशंसनम् ॥
आपद्धर्मस्य कथनं विद्यामाहात्म्यवर्णनम् ।
प्रतिमाकरणं चैव स्थापना चित्रलक्षणम् ॥
कालव्यवस्था स्वर्गादि प्रतिसर्गादिलक्षणम् ।
पुराणलक्षणं चैव भूगोलस्य च निर्णयम् ॥
निरूपणं तिथीनां च श्राद्धकल्पमनंतकम् ।
मुमूर्षोरपि यत्कर्म दानमाहात्म्यमेव च ॥
भूत भव्यं भविष्यच्च युगधर्मानुशासनम् ।
उच्चावचविधानं च प्रायश्चित्तादिकं च यत् ॥
षष्ट्याधिकाष्टसाहस्रं नवश्लोकशतोद्भवम् ।
पंचतंत्रसमायुक्तं प्रतितंत्रे च विंशतिः ॥
पंचोत्तरं तथाऽध्यायाः पुराणेऽस्मिन्द्विजोत्तम ।

विष्णुपर्वांतील अष्टमी आदि व्रत्य यात नाहीं; तेव्हा हें मध्यमपर्व नाव फोठून आलें कोणास माहीत! हे पुराण (म्ह. मध्यपर्व?) २५×५=१२५ अध्यायाचें, पाच तंत्राच व ८९६० श्लोकाच आहे असें म्हटलें आहे. त्याप्रमाणं या मध्यमपर्वाची परीक्षा करिता यांत तीन भाग २१+२०+२०=६१ अध्याय व ३११४ श्लोक आहेत; म्हणजे य पर्वांच्याच गणनेप्रमाणें यात २ भाग, ६४ अध्याय, व ५८४६ श्लोक

कमी येतात. शिवाय, या मध्यमपर्वाच्या शेवटीं दुसरा एक संख्यावाचक श्लोक आहे तो असाः—

षट्पद्याधिकषट्षट्कसहस्रपरिसंख्यया ।
नवश्लोकशतोद्भूतं संपूर्णं स्याद्भविष्यकम् ॥

यावरून, लेखकाच्या मनासमोर भविष्यपुराण ५० हजारांचें आहे, ही कल्पना होती असें दिसते. तो म्हणतोः—" आतां ३६९०६ श्लोकांनीं भविष्यपुराण पुरें होईल. " या लेखकाच्या मतें मग ब्राह्मपर्व ५० हजार उणे ( ३६९०६+८९६०= ) ४५८६६ म्ह. ४१३४ श्लोकांचें असलें पाहिजे ! तें हल्लीं ९०३६ श्लोकांचे आहे ! ! !

वरें, ४१३४+८९६० मिळून १३०९४ ही संख्या या पर्वाअखेर व्हावयास पाहिजे होती, तीही ( ९०३६+३११४= ) १२१५० होत आहे. यावरून हा सर्व ब्रह्मघोटाळा काय आहे हें कळून येईल ! मध्यमपर्वांत सुमंतुशतानिकांचा विलकुल उल्लेख नमून प्रत्येक अध्यायाचे शेवटीं भविष्यपुराण ५० हजारांचें आहे, असें ब्राह्मपर्वांतल्याप्रमाणेंही कोठें म्हटलेलें नाहीं ! मध्यमपर्व हें नांव प्रारंभीं कोठें आलें नसलें तरी तिसऱ्या पर्वासच कदाचित् मध्यमपर्व म्हणता येईल ! पण मग दुसरें पर्व कोठें आहे ?

भविष्यपुराण १४।१४½ हजार ग्रंथ आहे अशी खरोखर कल्पना असतेवेळीं, हा ५० हजारांचा ग्रंथ आहे, ही मध्येंच कोठून कल्पना आली ? ब्राह्मपर्वांत एके ठाई म्हटलेलें आहे कीः—

सर्वाण्येव पुराणानि संज्ञेयानि नरर्षभ ।
द्वादशैव सहस्राणि प्रोक्तानीह मनीषिभिः ॥ १०४ ॥
पुनर्वृद्धिं गतानीह आख्यानैर्विविधैर्नृप ।

यथा स्कांदं तथा चेदं भविष्यत्कुरुनंदन ॥ १०५ ॥
स्कांदं शतसहस्र तु लोकाना ज्ञातमेव हि ।
भविष्यमेतदृषिणा लक्षार्धं संख्यया कृतम् ॥१०६ ॥

ब्राह्मपर्व, अ. १ ला.

यात मूळचीं पुराणें सर्व १२।१२ हजारांचीं होतीं, ही अत्यंत महत्वाची परंपरा आढळते. मग हीं पुराणें उपाख्यानानीं वाढलीं ! जसें स्कंदपुराण एक लक्षाचें आहे, तसेंच हें भविष्यदेखील ५० हजाराचें आहे !!! भविष्याची संख्या भागवत व मात्स्य यात १४५०० श्लोक आहे. या दोन पुराणाच्या वेळीं स्कंदपुराणही ८१,००० श्लोकाचें होत. पुढें स्कंदपुराण १९ हजारानीं वाढून एक लक्षाचें झाले व भविष्यही आपलें स्वरूप ( १४½ हजाराचें ) सोडून ५० हजारपर्यंत वाढण्याची हाव धरूं लागलें ! पण हल्लीं प्रचलित भविष्य एकंदरींत २७००० इतकेंही भरत नाहीं ! भविष्यात कशाला कशाचाही मेळ नाहीं !!! हल्लीं या पुराणाची संख्या येणेंप्रमाणे आहे:—

| | अध्याय | श्लोकसंख्या |
|---|---|---|
| ब्राह्मपर्व— | २१६ | ९०३६ |
| मध्यमपर्व— | ६१ | ३११४ |
| प्रतिसर्गपर्व— | १०० | ६२३२ |
| भविष्योत्तरपर्व— | २०८ | ८५९२ |
| | ५८५ | २६,९७४ |

प्रतिसर्गपर्वांत ४ अध्यायापर्यंत, सूर्यचंद्रवंशाच्या यादी असून पुढील भविष्यांत गमतीचा मजकूर आहे. पुढें आदम व ईव्ह (हव्यवती), ईदन (प्रदान) नगर, पापवृक्षतल, न्यूह ( नोहा ), चंद्रगुप्ताचा सुलुवाच्या

कन्येशीं विवाह, भर्तृहरि, विक्रम, व्याडि, पाणिनि, वररुचि, बोपदेव, श्रीधर, *कात्यायन*, पतंजलि, *शालिवाहन*, *जीजस काईस्ट*, पृथ्वीराज, मुकुल ( मोंगल ), तिमिरलिंग ( तैमूरलंग ), रामानंद, निंबादित्य, मध्वाचार्य, श्रीधर, विष्णुस्वामी, भट्टोजी दीक्षित, वराहमिहिर, शंकराचार्य, जयदेव, कबीर, पीपा, नानक इत्यादि साधुसंत, व अकबर, सेलीम, अवरंगजेब, शिवाजी, मोंगल, नादिरशहा, गुरुंड वगैरे व्यक्तींचें वर्णन आहे.

यांत इंग्रजी शब्दही आहेत; एकूण या पर्वांत फारच घोटाळा आहे. कैनाकिल यवनांनंतर कोणत्याही पुराणात पुढचीं भविष्यें नाहींत; पण भविष्यपुराणानें प्रतिसृष्टि निर्माण करून आपलें भविष्य इंग्रजांपर्यंत अगदीं Up-to-date आणून ठेविलें आहे.

गुरुंड भाषेचा मासला पहाः—

> रविवारे च संडे च फाल्गुने चैव फर्वरी ।
> षष्टिः सिक्टीति च ज्ञेया तदुदाहरमीरिशम् ॥
>
> प्रतिसर्ग १-६-३७.

इतकें सविस्तर भविष्य दुसरें कोठेंच नाहीं. लॉर्ड रे, विक्टोरिया ( विक्टावती ) वगैरेंचीं नावें दिलीं आहेत; पण एडवर्ड व जॉर्ज मात्र कां नाहींत कोणास माहीत ? त्या व्यासांना येथपर्यंत दिसलें त्यास पुढलें कां दिसूं नये ? असो. यांत एकंदर १०० अध्याय व ६२३२ श्लोक आहेत; व तिन्ही पर्वांची बेरीज मिळून येथें १८३८२ होते. भविष्योत्तर तर स्वतंत्रच ग्रंथ आहे. शेवटीं, " *सप्तलाक्षसहस्राणि संडेऽस्मिन्कथितं* मया । अतश्चोत्तरखंडं हि वर्णयामि पुनः शृणु ॥ " असें म्हटलें आहे; पण प्रतिसर्गांत ७००० श्लोक नाहींत. जवळ जवळ ८०० कमी आहेत.

१,यावरून मूळच्या भविष्यपुराणापैकीं फक्त मूळचें ब्राह्मपर्व मात्र थोड्याफार फरकानें उपलब्ध आहे, हे कळेल. बाकी सारीं पर्वे नवीन तयार झालेलीं दिसतात; हें मथुरामाहात्म्यांतील खालील वाक्यावरूनही कळून येईल:–भविष्योत्तर पुराणाविषयीं पुढे लिहिलेले आहे.

१. शांबप्रख्याततीर्थे तु तत्रैवांतरधीयत ।
शांबस्तु सह सूर्येण रथस्थेन दिवानिशम् ।
रविं पप्रच्छ धर्मात्मा पुराणं सूर्यभाषितम् ।
भविष्यपुराणमिति ख्यातं कृत्वा पुनर्नवम् ॥

प्रतिसर्गाची माहिती जरी जुनी व मूळ पुराणांतली नसली तरी तिचा इतिहासाला चांगला उपयोग होण्यासारखा आहे, हे मात्र खरें !

कलकत्ता संस्कृत कॉलेजांतील हस्तलिखित पोथ्यांत ( Catalogue No 14, P. 53 ) एक भविष्यपुराणाची फार जुनी प्रत आहे. त्यांत १४ हजार श्लोक असून ब्राह्मपर्व, वैष्णवपर्व, शैवपर्व, सौरपर्व व उपसंहार असे पांच भाग आहेत. शिवाय, नारदपुराणांत सांगितल्याप्रमाणे यांत सर्व विषय आहेत. हें खरें भविष्यपुराण होय.

भविष्यपुराणांत पूर्वी भविष्य सांगितलें असल्याबद्दलचे मराठी कवींचे समज एथे दोनतीन देतो:—

(१) शके १७४१ मधील, धुंडिराजसुत नरहरि मालु हा आपल्या नवनाथभक्तिसारांत म्हणतो:–( भक्तांनीं कोठकोठे व कसे अवतार घ्यावेत हे पूर्वीच वर्णिले आहे, असें श्रीकृष्ण त्यांस म्हणत आहेत, असें अनुसंधान आहे. )

यावरि बोले प्रत्यक्ष नारायण। कीं तुम्हीं दीक्षेचे
भविष्यपुराण । पूर्वींच कथिलें पराशरनंदनें ।
महामुनि व्यास तो ॥ अ० १–ओवी ५३ ॥

हें लिहून आज ९० वर्षे होत आलीं. सध्यांचे स्वरूपच्य् तिव्हांही या पुराणांचे असलें पाहिजे.

( २ ) शके १५६६–७० चे दरम्यान श्रीसमर्थांनी सुकारामास आपलें चरित्र वर्णन केलें आहे. ( रामदासस्वामींचे समग्र ग्रंथ, पृ. ६०५ पहा. ) त्यांत व्यासांच्या भविष्यपुराणाचा उल्लेख आहे, तो असा:—

बौध्य नारायण होउनि बैसला। उपाय बोलिला व्यास मुनि ॥५॥
व्यास मुनि बोले भविष्यपुराण । जग उद्धरणें कलीमाजीं ॥ ६ ॥
कलीमाजीं गोदातीरीं पुण्यक्षेत्र । तेथें वातपुत्र अवतरे ॥ ७ ॥
अवतरे अभिधानीं रामदास । कृष्णातीरीं वास जगदुद्धारा ॥ ८ ॥

यांत स्वामी 'आपण होणार हें भविष्य. भविष्यपुराणांत आहे' असें सांगत आहेत. स्वामींच्या वेळीं भविष्यपुराणाविषयीं काय कल्पना प्रचलित होत्या, याचें प्रतिबिंब वरील उताऱ्यांत आहे.

( ३ ) शके ९०० च्या सुमारच्या मुकुंदराजानें आपल्या विवेकसिंधूच्या शेवटीं गुरुपरंपरा देतेवेळीं आपल्या गुरूचें वर्णन भविष्योत्तरपुराणीं आहे असें म्हटलें आहे.

## भविष्योत्तरपुराणम्*

हे पुराण पूर्वी स्वतंत्रपणे उपलब्ध असावें. पूर्वी यास स्वतंत्र पुराणच समजत असत, याबद्दल वरीच प्रमाणें स्वतः त्या ग्रंथामध्यें व बाहेरही आढळतात. सध्या मात्र श्रीवेंकटेश्वरप्रेसमध्यें छापलेल्या भविष्यपुराणाप्रमाणें हें भविष्यपुराणाचें उत्तरपर्व ऊर्फ चवथें पर्व मानिलें आहे; पण पूर्वी हा स्वतंत्र ग्रंथ असावा, याला मुख्यत्वेंकरून हीं कारणें आहेत:—

* श्रीवेंकटेश्वरप्रेसमध्यें छापलेल्या भविष्यत्पुराणाचें चतुर्थ पर्व.

( १ ) सुमंतूने शतानीकास भविष्यत्पुराणाच्या ब्राह्मपर्वाच्या दुसऱ्यां अध्यायाच्या प्रारंभीं त्या पुराणांत कोणकोणतीं पर्वें आहेत, हें सांगितलें आहे; त्यांत ( १ ) ब्राह्मपर्व, ( २ ) वैष्णवपर्व, ( ३ ) शैवपर्व, (४) त्वाष्ट्रपर्व, व (५) प्रतिसर्गपर्व, हीं पांच पर्वें आहेत; त्यांत उत्तरपर्वाचें नांवही नाहीं. हल्लीं भविष्यत्पुराणांत ( १ ) ब्राह्मपर्व, ( २ ) मध्यमपर्व, ( ३ ) प्रतिसर्गपर्व व ( ४ ) उत्तरपर्व अशीं चार पर्वें मिळतात. सुमंतूचें तिसरें शैवपर्व कदाचित् मध्यमपर्व म्हणतां येईल. सुमंतूच्या वेळचें दुसरें व चवथें पर्व कोठें उपलब्ध असल्याप्रमाणें दिसत नाहीं. प्रतिसर्गपर्व हल्लींच्या पुराणाप्रमाणें तिसरें असून उत्तरपर्व चौथें आहे. चार पर्वांत दुसऱ्या पर्वाला मध्यमपर्व म्हणणें कसें शोभेल ? तेव्हां सुमंतूच्या वेळच्या पांच पर्वांपैकीं हल्लीं उपलब्ध असलेल्या तीन पर्वांमध्ये मध्यमपर्व हें मध्यम ठरतें. म्हणजे भविष्योत्तरपुराण स्वतंत्र धरावें लागतें.

( २ ) मागच्या सर्व पुराणांत भविष्यत्पुराणाची संख्या १४५०० सांगितली आहे. एकंदर चारी पर्वांची संख्या हल्लीं ९०३६+३११४+६२२८+८५९२=२६९७० इतकी आहे. म्हणजे स्थूलमानानें सध्यां २७,००० श्लोक यांत आहेत असें म्हटलें तरी चालेल. भविष्यत्पुराण १४½ हजारांवरून २७ हजारापर्यंत वाढलें असें मानण्यापेक्षां, भविष्योत्तराची ८५९२ श्लोकसंख्या ( स्वतंत्र ग्रंथाची म्हणून वेगळी करून ) बाकीच्याची बेरीज केली तर ती १८,३७८ इतकी येते. म्हणजे वर पुराणांनीं सांगितली आहे त्यापेक्षां जवळ जवळ स्थूलमानानें ४००० श्लोक हल्लीं जास्त आढळतात; व ते कां आढळतात हे मागें भविष्यांतील प्रतिसर्गपर्वावरूनच कळून येण्यासारखें आहे. हरिवंशासारखा ग्रंथ ( भारताच्या आदिपर्वांत त्याची संख्या १२०००सांगितली असतां)जर सध्या १६०००वर आढळतो,तर भविष्यत्पुराण चार हजारांनीं वाढलें असावें, असें मानण्यास हरकत दिसत नाहीं. व्यासांनीं सर्व ग्रंथ लिहिले तसेच सध्या कांहीं मिळणें शक्य नाहीं; भारत-

मावी मते वं दान यासंबंधानें उत्तरं असल्यामुळे, त्यास भविष्योत्तर असें नांव पडलें असें कळून येईल. असो, याप्रकारे भविष्योत्तरपुराण हा स्वतंत्रच ग्रंथ असावा असें आम्हांस वाटतें.

---

ब्रह्मवैवर्तपुराण, १० वें.

मत्स्यपुराणानें याविषयीं लिहिलेलें आहे कीः—

रथंतरस्य कल्पस्य वृत्तांतमधिकृत्य च ।
सावर्णिना नारदाय कृष्णमाहात्म्यमद्भुतम् ॥
यत्र ब्रह्मवराहस्य चरितं वर्ण्यते मुहुः ।
तदष्टादशसाहस्रं ब्रह्मवैवर्तमुच्यते ॥

नारदपुराणानें याची याप्रमाणें अनुक्रमणिका दिलेली आहे.—

शृणु वत्स ! प्रवक्ष्यामि पुराणं दशमं तव ।
ब्रह्मवैवर्तकं नाम वेदमार्गानुदर्शकम् ॥
सावर्णिर्यत्र भगवान्साक्षाद्देवर्षयेऽर्थितः ।
नारदाय पुराणार्थं प्राह सर्वमलौकिकम् ॥
धर्मार्थकाममोक्षाणा सारं प्रीतिर्हरौ हरे ।
तयोरभेदसिध्यर्थं ब्रह्मवैवर्तमुत्तमम् ॥
रथंतरस्य कल्पस्य वृत्तांतं यन्मयोदितम् ।
शतकोटिपुराणे तत्संक्षिप्य प्राह वेदवित् ॥
व्यासश्चतुर्धा संन्यस्य ब्रह्मवैवर्तसंज्ञितम् ।
अष्टादशसहस्रं तत्पुराणं परिकीर्तितम् ॥
ब्रह्मप्रकृतिविघ्नेशकृष्णखंडसमाचितम् ।

तत्र सूतर्षिसंवादे पुराणीयक्रमो मतः ॥
सृष्टिप्रकरणं त्वाद्यं ततो नारदवेधसोः ।
विवादः सुमहान्यत्र द्वयोरासीत्पराभवः ॥
शिवलोकगतिः पश्चाज्ज्ञानलाभः शिवान्मुनेः ।
शिववाक्येन तत्पश्चान्मरीचेर्नारदस्य च ॥
गमनं चैव सावर्णेर्ज्ञानार्थं सिद्धसेविते ।
आश्रमे सुमहापुण्ये त्रैलोक्याश्चर्यकारिणि ॥
एतद्धि ब्रह्मखंडं हि श्रुतं पापविनाशनम् ।
ततः सावर्णिसंवादो नारदस्य समीरितः ॥
कृष्णमाहात्म्यसंयुक्तो नानाख्यानकथोत्तरः ।
प्रकृतेरंशभूतानां कलानां चापि वर्णितम् ॥
माहात्म्यं पूजनाद्यं च विस्तरेण यथास्थितम् ॥
एतत्प्रकृतिखंडं हि श्रुतिभूतिविधायकम् ॥
गणेशजन्मसंप्रश्नसपुण्यकमहाव्रतम् ।
पार्वत्याः कार्तिकेयेन सह विघ्नेशसंभवः ॥
चरितं कार्तवीर्यस्य जामदग्न्यस्य चाद्भुतम् ।
विवादः सुमहान्पश्चाज्जामदग्न्यगणेशयोः ॥
एतद्विघ्नेशखंडं हि सर्वविघ्नविनाशनम् ।
श्रीकृष्णजन्मसंप्रश्नो जन्माख्यानं ततोऽद्भुतम् ॥
गोकुले गमनं पश्चात्पूतनादिवधोऽद्भुतः ।
बाल्यकौमारजा लीला विविधास्तत्र वर्णिताः ॥

रासक्रीडा च गोपीभिः शारदी समुदाहृता ।
रहस्ये राधया क्रीडा वर्णिता बहुविस्तरा ॥
सहाऽक्रूरेण तत्पश्चान्मथुरागमनं हरेः ।
कंसादीना वधे वृत्ते स्यादस्य द्विजसंस्कृतिः ॥
काश्यां संदीपनेः पश्चाद्विद्योपादानमद्भुतम् ।
यवनस्य वधः पश्चाद् द्वारकागमनं हरेः ॥
नरकादिवधस्तत्र कृष्णेन विहितोऽद्भुतः ।
कृष्णखंडमिदं विप्र ! नृणां संसारखडनम् ॥

मत्स्य व नारदोक्त लक्षणाशीं प्रचलित ब्रह्मवैवर्ताची ऐक्यता नाहीं. रथंतरकथन, सावर्णिनारदसंवाद, ब्रह्मवराहवृत्तांत, किंवा ब्रह्माचा वितर्तप्रसंग ह्यापैकीं एकही प्रसंग प्रचलित ब्रह्मवै. पुराणांत नाहीं. प्रचलित पुराणांत ब्रह्मादि तेच चार खंड असले तरी कित्येक विषयांत दोहोंचा मेळ नाहीं. नारदोक्त ब्रह्मखंडांतील सृष्टिप्रकरण, नारदब्रह्मविवाद, नारदाचें शिवलोकीं जाणें व ज्ञानप्राप्ति करून घेणें, हे विषय जरी ब्रह्मखंडांत हल्लीं असले तरी नारद मरीचि यांचें सिद्धाश्रमीं गमन, व सावर्णि यांशीं संवाद–हे विषय नाहींत. प्रकृतिखंडांत सावर्णिनारदसंवाद व मुख्यतः कृष्णमाहात्म्यकथा जी असावयाची ती हल्लीं नाहीं ! गौणरूपानें कृष्णकथा आहे, परंतु प्रकृतीचें माहात्म्य व पूजा इत्यादिकांचा विस्तार आहे. गणेशखंड व कृष्णजन्मखंड यांतील विषय मात्र सर्व यथास्थित आहेत. पं. ज्वालाप्रसाद यांनीं या पुराणाविषयीं बराच विचार करून असें ठरविलें आहे कीं, कित्येक स्थळीं जरी अर्वाचीन मजकूर प्रक्षिप्त असला व पुराणास नवा संस्कार मिळालेला असला तरी त्याचा सर्व क्रम व कथाभाग यांत पूर्वीप्रमाणेंच असावा.

निर्णयसिंधूत लघुब्रह्मवैवर्ताचा उल्लेख आहे, पण तें हल्लीं मिळत नाहीं.
दाक्षिणात्यातील ब्रह्मवैवर्तात ब्रह्मवैवर्ताची वरीच अधिक लक्षणें आहेत असे प ज्वा प्र याचें मत आहे विल्सन साहबाच्या मतानें देखील मात्स्योक्त ब्रह्मवैवर्ताहून हल्लींच ब्रह्मवैवर्त अर्वाचीन, नूतनसस्कृत व अत एव भिन्न आहे, यात हल्लीं राधाकृष्णाच्या उपासना विशेष वाढविलेली आहे यामुळें मूळचा जुना मजकूर यात वराच कमी असून अर्वाचीन मजकूरच अधिक आहे, असे त्याचें मत आहे व त प ज्वालाप्रसाद याच्या मताशी वहुतेक जुळतं
यातील उतारे श्रीशकराचार्यांनी विष्णुसहस्रनामभाष्यात घेतलेले आहेत

---

## लिंगपुराण, ११ वे

मत्स्यपुराणमतें याच लक्षण असें —

यत्राग्निलिंगमध्यस्थ प्राह देवो महेश्वर ।
धर्मार्थकाममोक्षार्थं आग्नेयमधिकृत्य च ॥
कल्पात लिंगमित्युक्त पुराण ब्रह्मणा स्वयम् ।
तदेकादशसाहस्र फाल्गुन्या य प्रयच्छति ॥

मत्स्य पु ५३–३७

नारदपुराणात याचा सूची यणेप्रमाणे दिलेली आहे —

शृणु पुत्र ! प्रवक्ष्यामि पुराण लिंगसज्ञितम् ।
पठता शृण्वता चैव भुक्तिमुक्तिप्रदायकम् ॥
यच्च लिंगाभिध तिष्ठन्वन्हिलिंगे हरोऽभ्यधात् ।
मह्य ब्रह्मादिसिध्यन्तमग्निकल्पकथाश्रयम् ॥
तदेव व्यासदेवेन भागद्वयसमाचितम् ।

पुराणं लिंगमुदितं बन्ह्याख्यानं विचित्रितम् ॥
तदेकादशसाहस्रं हरमाहात्म्यसूचकम् ।
परं सर्वपुराणानां सारभूतं जगत्त्रये ॥
पुराणोपक्रमे प्रश्नं सृष्टिसंक्षेपत पुरा ।
योगाख्यानं तत प्रोक्तं कल्पाख्यानं ततः परम् ॥
लिंगोद्भवस्तदर्चा च कीर्तिता हि ततः परम् ।
सनत्कुमारशैलादिसंवादश्चाथ पावन ॥
ततो दधीचिचरितं युगधर्मनिरूपणम् ।
ततो भुवनकोशाख्यो सूर्यसोमान्वयस्तथा ॥
ततश्च विस्तरात्सर्गस्त्रिपुराख्यानकं तथा ।
लिंगप्रतिष्ठा च तथा पशुपाशविमोक्षणम् ।
शिवव्रतानि च तथा सदाचारनिरूपणम् ॥
प्रायश्चित्तान्यरिष्टानि काशीश्रीशैलवर्णनम् ।
अंधकाख्यानकं पश्चाद्वाराहचरितं पुन. ॥
नृसिंहचरितं पश्चाज्जलंधरवधस्तत ।
शैवं सहस्रनामाऽथ दक्षयज्ञविनाशनम् ।
कामस्य दहनं पश्चाद्गिरिजायाः करग्रह. ॥
ततो विनायकाख्यानं नृत्याख्यानं शिवस्य च ।
उपमन्युकथा चापि पूर्वभाग इतीरितः ॥
विष्णुमाहात्म्यकथनमंबरीषकथा तत. ।
सनत्कुमारनंदीशसंवादश्च पुनर्मुने ॥

शिवमाहात्म्यसंयुक्तं स्नानयागादिकं ततः ।
सर्वपूजाविधिश्चैव शिवपूजा च मुक्तिदा ॥
दानानि बहुधोक्तानि श्राद्धप्रकरणं ततः ।
प्रतिष्ठा तत्र गदिता ततोऽघोरस्य कीर्तनम् ॥
वज्रेश्वरी महाविद्या गायत्रीमहिमा ततः ।
त्र्यंबकस्य च माहात्म्यं पुराणश्रवणस्य च ॥
एतस्योपरिभागन्ते लैंगस्य कथितो मया ।
व्यासेन हि निबद्धस्य रुद्रमाहात्म्यसूचिनः ॥

प्रचलित लिंगपुराणांत लिहिलें आहे कीं:—

ईशानकल्पवृत्तांतमधिकृत्य महात्मना ।
ब्रह्मणा कल्पितं पूर्वं पुराणं लैंगमुत्तमम् ॥ २–१ ॥

या लिंगपुराणात मत्स्यनारदोक्त लिंगपुराणातील सर्व कथा आहेत, तथापि अग्निकल्पाच्या ठाईं ईशानकल्पाची हकीकत आहे. संप्रदायाच्या द्वेषाचीं मूळपुराणात वाक्यं येणे शक्य नाहीं, तीं वाक्यें नंतरचीच असलीं पाहिजेत. अशा प्रकारचे प्रक्षिप्त श्लोक सोडून दिले म्हणजे हे एक बरेंच प्राचीन पुराण ठरेल, याची श्लोकसंख्या हल्लीं ११ हजारच आहे.

*श्रीशंकराचार्यांनीं विष्णुसहस्रनामभाष्य व सनत्सुजातीयभाष्य यात लिंग-पुराणातील उतारे घेतले आहेत.*

या पुराणाविषयीं विल्सनचें मत असें आहे कीं कल्पभेदाशिवाय *मात्स्योक्त लिंग व प्रचलित लिंगपुराण यात काहीं फरक नाहीं. पहा:—*

"The Ling Purana confirms accurately enough to this description The Kalpa is said to be Isana, but this is the only difference. . . . The work is, therefore, the same as that referred to by the Matsya."

## वराहपुराण, १२ वें.

मत्स्यपुराणाच्या मत याचें लक्षण असें आहे कीः—

महावराहस्य पुनर्माहात्म्यमधिकृत्य च ।
विष्णुनाऽभिहितं क्षौण्यै तद्वराहमिहोच्यते ॥
मानवस्य प्रसंगेन कल्पस्य मुनिसत्तमाः ।
चतुर्विंशत्सहस्राणि तत्पुराणमिहोच्यते ॥

मत्स्य पु, ५३–३९

नारदपुराणात वराहाची अनुक्रमणिका अशी दिलेली आहेः—

शृणु वत्स ! प्रवक्ष्यामि वराहं वै पुराणकम् ।
भागद्वययुतं शश्वद्विष्णुमाहात्म्यसूचकम् ॥
मानवस्य तु कल्पस्य प्रसंगं मत्कृतं पुरा ।
निबबंध पुराणेऽस्मिश्चतुर्विंशसहस्रके ॥
व्यासो हि विदुषा श्रेष्ठः साक्षान्नारायणो भुवि ।
तत्रादौ शभुसंवादः स्मृतो भूमिवराहयोः ।
अथादिकृतवृत्तांते रैभ्यस्य चरितं तत ॥
दुर्जयाय च तत्पश्चाच्छ्राद्धकल्प उदीरित. ।
महातपस आख्यान गौर्युत्पत्तिस्ततः परम् ॥
विनायकस्य नागाना सेनान्यादित्ययोरपि ।
गणाना च तथा देव्या धनदस्य वृषस्य च ॥
आख्यानं सत्यतपसो व्रताख्यानसमान्वितम् ।
अगस्त्यंगिरस पश्चात् रुद्रगीता प्रकीर्तिता ॥
महिषासुरविध्वंसे माहात्म्यं च त्रिशक्तिजम् ।

पर्वाध्यासस्ततः श्वेतोपाख्यानं गोप्रदानिकम् ॥
इत्यादिकृतवृत्तांतं प्रथमोद्देशनामकम् ।
भगवद्धर्मके पश्चाद्व्रततीर्थकथानकम् ॥
द्वात्रिंशदपराधानां प्रायश्चित्तं शरीरकम् ।
तीर्थानां चाऽपि सर्वेषां माहात्म्यं पृथगीरितम् ॥
मथुरायां विशेषेण श्राद्धादीनां विधिस्ततः ।
वर्णनं यमलोकस्य ऋषिपुत्रप्रसंगतः ॥
विपाकः कर्मणां चैव विष्णुव्रतनिरूपणम् ।
गोकर्णस्य च माहात्म्यं कीर्तितं पापनाशनम् ॥
इत्येव पूर्वभागोऽस्य पुराणस्य निरूपितः ।
उत्तरे प्रविभागे तु पुलस्त्यकुरुराजयोः ॥
संवादे सर्वतीर्थानां माहात्म्यं विस्तरात्पृथक् ।
अशेषधर्माश्चाख्याताः पौष्करं पुण्यपर्व च ॥
इत्येवं तव वाराहं प्रोक्तं पापविनाशनम् ॥

*नारदीय लक्षणाशीं प्रचलित वाराहाचा बहुतांशीं मेळ असला तरी* मानवकल्पसंगानें महावराहावताराचें माहात्म्य त्यांत वर्णिलेलें नाहीं; तसेंच हल्लीं वाराहांत व्रतादिकांची जी खूप गर्दी दिसते ती मत्स्योक्त किंवा नारदोक्त वराहांत होती किंवा नाहीं याचीही शंकाच वाटते. प्रचलित वराहपुराण भविष्योत्तराप्रमाणें अनेक पुराणावरून संकलित करून लिहिलेलें आहे.

यात बुद्धद्वादशीचें वर्णन असल्यामुळें बुद्धाला अवतार मानूं लागल्यानंतर यास हल्लींचें स्वरूप मिळालें ! कलकत्त्याच्या एशियाटिक सोसाइटीनें

छापलेल्या वराहपुराणांत १०७०० श्लोक आहेत; पण तें अपूर्ण आहे, असें नारदसूचीवरून कळून येतें. नारदसूचीप्रमाणें वरील वराह हा फक्त **पूर्वभाग** आहे. उत्तरभागांतील पुलस्त्यकुरुराजसंवादात सविस्तर तीर्थांचें माहात्म्य व अनेक प्रकारचीं धर्माख्यानें व पुष्करपर्व इत्यादि विषय प्रचलित मुद्रित वराहांत नाहींत ! ! !

हेमाद्रीच्या चतुर्वर्गचिंतामणींत वराहोक्त बुद्धद्वादशीचा उल्लेख आहे ( १३ वें शतक ); *गौडाधिप बल्लाळसेनाच्या* **दानसागरांत** *या वराहांतून* उतारे घेतलेले आहेत, ( १२ वें शतक); तसेच अपरादित्यानेंही आपल्या याज्ञवल्क्याच्या स्मृतीवरील टीकेत या पुराणांतील उतारे घेतलेले आहेत. ( १२ वें शतक ).

या पुराणांत वैष्णवधर्माचें फारसे प्राचीन स्वरूप नाहीं, असें विल्सनचें मत आहे; म्हणून हल्लींच्या वराहाचा काळ ते १२ व्या शतकाच्या पूर्वभाग ( इ० स० सुमारें ११०० ) ठरवितात !

---

## स्कंदपुराण, १३ वे.

हल्लीं स्कंदपुराण म्हणून स्वतंत्र ग्रंथ कोठेंही मिळत नाहीं. अनेक संहिता, खंड, हजारो माहात्म्यें या पुराणातील म्हणून प्रसिद्ध आहेत. हे संपूर्ण भाग मिळूनच स्कंदपुराण व्हावयाचें; पण या भागाचें पूर्वापर्यही नीट कळत नाहीं ! याकरिता प्रथम या पुराणात कोणते विभाग होते ( हें पाहूं:— )

स्कंदपुराणातील शंकरसंहितेपैकी हालास्यमाहात्म्यात लिहिले आहे कीं:—

स्कांदमयापि वक्ष्यामि पुराणं श्रुतिसारजम् ॥ ६२ ॥
षड्विधं संहिताभेदैः पंचाशत्खंडमंडितम् ।
आद्या सनत्कुमारोक्ता द्वितीया सूतसंज्ञिता ॥ ६३ ॥

तृतीया शाकरी प्रोक्ता चतुर्थी वैष्णवी तथा ।

पचमी सहिता ब्राह्मी षष्ठी सा सौरसहिता ॥६४॥ अ १ ला

सूतसहितेच्या प्रारभीं अठरा मुख्य पुराणें व अठरा उपपुराणें यांचीं नांवें देऊन सूत शेवटीं म्हणतो कीं —

लक्ष तु प्रथसख्यामि सर्वविज्ञानसागरम् ।

स्कादमद्यामिवक्ष्यामि पुराण श्रुतिसमितम् ॥

( १ १ १९ )

तेरावें जें स्कदपुराण त्यात वरील सहा सहिता, ५० खड व एक लक्ष श्लोक आहेत, असें सूतसहितेंत म्हटलें आहे ( १ १ २० ) सहितांच्या पृथक श्लोकसख्याही दिलेल्या आहत त्या अशा —

प्रथेन चैव पट्त्रिंशत्सहस्रेणोपलक्षिता ।

आद्या तु सहिता विप्रा ! द्वितीया षट्सहस्रिका ॥

तृतीया प्रथतस्त्रिंशत्सहस्रेणोपलक्षिता ।

तुरीया सहिता पचसहस्रेणाऽभिनिर्मिता ॥

ततो ह्यन्या सहस्रेण त्रयेणैव विनिर्मिता ।

अन्या सहस्रत सृष्टा प्रथत पडितोत्तमै ॥

अ १-२२ ते २४

| | | |
|---|---|---|
| १ | सनत्कुमारसहिता | ३६ हजार |
| २ | सूतसहिता | ६ |
| ३ | शाकरसहिता | ३० ,, |
| ४ | वैष्णवसहिता | ५ ,, |
| ५ | ब्राह्मसहिता | ३ ,, |
| ६ | सौरसहिता | १ ,, |
| ६ | | ८१ ,, |

या श्लोकसंख्येप्रमाणें ८१ हजार संख्या भरते; पण आनंदाश्रमांत छापलेल्या सूतसंहितेच्या प्रारंभीं सनत्कुमारसंहितेची ग्रंथसंख्या ५५ हजार दिली आहे, त्यामुळें एकंदर श्लोकसंख्या एक लक्षाची होते; पण स्कंदपुराण ८१ हजारांचें आहे, हीच जुनी ( मात्स्य व भागवताची ) परंपरा होय; यावरून पुढें स्कंदपुराण ८१ हजारांवरून एक लक्षपर्यंत वाढलें हें कळून येईल, व एक लक्ष स्कंदाचा उल्लेख हल्लींच्या भविष्यपुराणाच्या प्रारंभीं आहे. ( भविष्यपुराणनिरीक्षण पहा. )

स्कंदपुराणाच्या प्रचलित प्रभासखंडाच्या मतानेंही हें पुराण ८१ हजार एकशें श्लोकांचें आहे; पहा:—

> स्कांदं तु सप्तधा भिन्नं वेदव्यासेन धीमता ।
> एकाशीति सहस्राणि शतं चैकं च संख्यया ॥
> तस्यादिमो विभागस्तु स्कंदमाहात्म्यसंयुतः ।
> माहेश्वरसमाख्यातो द्वितीयो वैष्णवस्य च ॥
> तृतीयो ब्रह्मणः प्रोक्तः सृष्टिसंक्षेपसूचकः ।
> काशीमाहात्म्यसंयुक्तश्चतुर्थः परिपठ्यते ॥
> रेवायाः पंचमो भाग उज्जयिन्याः प्रकीर्तितः ।
> षष्ठः कल्पार्चनं विधं तापीमाहात्म्यसूचनः ।
> सप्तमोऽथ विभागोऽयं स्मृतः प्राभासिको द्विजाः ।
> सर्वे द्वादशसाहस्रं विभागाः साधिकाः स्मृताः ॥

प्रभासखंड, दुसरा अध्याय.

यांत श्लोकसंख्या ८११०० असून शिवाय याचे सात खंड सांगितले आहेत. ते असे:—

| | | |
|---|---|---|
| १ | माहेश्वरखंड— | स्कंदमाहात्म्य. |
| २ | वैष्णवखंड— | ... ... |
| ३ | ब्रह्मखंड— | सृष्टिवर्णन ( संक्षिप्त ). |
| ४ | काशीखंड— | काशीमाहात्म्य. |
| ५ | रेवाखंड— | उज्जयिनीकथा. |
| ६ | तापीखंड— | कल्पपूजा, विश्वकथा व तापीमाहात्म्य. |
| ७ | प्रभासखंड— | प्रभासमाहात्म्य. |



या सर्व खंडातून मिळून १२ हजारांवर विभाग आहेत ! ! !

याच सप्तमहाखंडात्मक विभागाची सूची नारदपुराणानें दिलेली आहे; ती लांबलचक असल्यामुळें येथें दिलेली नाहीं; ती मुळांतूनच पहावी.

वरील प्रमाणावरून पहातां स्कंदपुराणाचे दोन प्रकारचे विभाग असलेले दिसून येतात; एक, सहा संहिता व त्या सर्व संहितांत मिळून ५० पन्नास खंड, असा पहिला विभाग; व दुसरा, केवळ ७ महाखंडात्मक विभाग. दोहोंची ग्रंथसंख्या ८१ हजार किंवा ८११०० इतकीच आहे. पुढें मात्र ८१ हजाराची श्लोकसंख्या एक लक्षाची झाली; माधवाचार्यांनीं सूतसंहितेवर टीका लिहिली, तेव्हा तींत स्कंदपुराण एकलक्षात्मक ग्रंथ असल्याबद्दलचा समज दाखविणारा श्लोक होता.* यावरून, १४ व्या शतकांत, हें पुराण एक लक्षाचें आहे, असा समज झालेला होता हें आढळून येईल. शिवाय यावरून दुसरें एक सिद्ध होतें कीं, नारदसूची स्कंदपुराणाचा *षट्संहितात्मक व ( त्यांतून ) पंचाशत्खंडात्मक विभाग मोडून* त्या जागीं केवळ सप्तखंडात्मक विभाग उत्पन्न झाल्यानंतरची आहे, व हा विभाग हें पुराण ८१ हजारांचें आहे, असा समज असताच झालेला

* तो आनंदाश्रमांत छापलेल्या सूतसंहितेवरून वर दिलेला आहे.

आहे. यावरून हा दुसरा विभाग व त्यावरून झालेली नारदसूची हीं १ ल्या शतकापूर्वीच तयार झालेलीं आहेत हे सिद्ध होतें.

षट्संहिता व तदंतर्गत पंचाशत्खंड अशा विभागपद्धतींत सूतसंहिता ही दुसरी संहिता असून, त्या संहितेत खालीं दिल्याप्रमाणें खंडसंख्या व श्लोक संख्या दिलेली आहे.

| | खंड | अध्याय | श्लोक |
|---|---|---|---|
| १ | शिवमाहात्म्यखंड | १३ | ७०० |
| २ | ज्ञानयोगखंड | २० | ७३७ |
| ३ | मुक्तिखंड | ९ | ५६३ |
| ४ | यज्ञवैभवखंड | . | ४००० |
| ४ | | ४२+१ | ६००० |

हल्लीं स्कंदपुराणातर्गत म्हणून मिळणाऱ्या संहिता व खंड याची श्लोकसंख्या एकत्र करण्यानें ती एक लक्षाहूनही अधिक भरते असे पं. ज्वालाप्रसाद याचे मत आहे ! ! हल्लीं सनत्कुमार, सूत, शाकर, व सौर या संहिता मिळालेल्या आहेत, पैकीं शाकरसंहितेचे काहीं भाग मात्र मिळतात. तिसरी जी शाकरसंहिता तिचे अनेक खंड आहेत, त्या सर्वांत शिवरहस्यखंडच श्रेष्ठ आहे, त्या खंडात म्हटलेलें आहे कीं.——

तत्र या संहिता प्रोक्ता शांकरी वेदसंमिता ।
त्रिंशत्सहस्रैर्ग्रथाना विस्तरेण सुविस्तृता ॥
आदौ शिवरहस्याख्यं खंडमद्य वदामि व. ।
तत्त्रयोदशसाहस्रे सप्तकांडैरलंकृतम् ॥
पूर्व. संभवकांडाख्यो द्वितीयस्त्वासुर. स्मृत· ।
माहेंद्रस्तु तृतीयो हि युद्धकांडस्ततः परम् ॥

पंचमो देवकांडाख्यो दक्षकांडस्ततः परम् ।
सप्तमस्तु मुनिश्रेष्ठा उपदेश इति स्मृतः ।

( १ ) हल्लीं मिळत असलेल्या सनत्कुमारसंहितेंत खंड मिळत नाहींत.

( २ ) सूतसंहिता ६ हजाराची, तिच्यात शिवमाहात्म्यखंड, ज्ञान खंड, मुक्तिखंड व यज्ञवैभवखंड, ( उपरिभाग ) असे चार खंड मिळतात.

( ३ ) शंकरसंहिता ३० हजाराची, तिच्यात अनेक खंड आहेत, त्यापैकीं पहिले खंड शिवरहस्य नावाचें, तें १३ हजाराचें. त्यात सात काड —संभवकाड, आसुरकाड. माहेंद्रकाड, युद्धकाड, देवकाड, दक्षकाड व उपदेशकाड—हीं त्याचीं नावें !

( ४ ) वैष्णवसंहिता व ( ५ ) ब्राह्मसंहिता मिळत नाहीं.

( ६ ) सौरसंहिता एक हजाराची. यातही खंडविभाग नाहीं.

कांहीं कांहीं संहितातील किरकोळ खंडेंही मिळतात त्यांचीं नावें अशाः— भूमिखंड, उत्कलखंड, वैष्णवखंड, ब्रह्मखंड, ब्रह्मोत्तरखंड, पातालखंड, ब्रह्माडखंड, काशीखड, केदारखड, रेवाखंड, अवतीखंड, तापीखंड, नागरखंड, प्रभासखंड इत्यादि. एकूण १९ खंडाचीं नावे कळल्यासारखीं झालीं ! बाकीचीं ३१ खंडाचीं नावे अजून कळत नाहींत !!!

स्कंदपुराणाच्या काशीखंडाची एक शके ९३० सालची प्रत विश्वकोश कार्यालयात आहे, तिच्याशीं प्रचलित काशीखंड बहुधा जमतें, असें प. ज्वालाप्रसाद याचें मत आहे. तेव्हा या खंडाची उत्पत्ति याहीपूर्वी कितीतरी वर्षें झाली असली पाहिजे हें उघड आहे.

महामहोपाध्याय हरप्रसादशास्त्री याना नेपाळच्या राजपुस्तकालयात खिस्ती शकाच्या सहाव्या शतकांत लिहिलेली एक स्कंदपुराणाची पोथी पाहण्यास मिळाली ! शास्त्रीमजकुरानीं नेपाळदरबारच्या राजपुस्तकालयातील पोथ्याच्या सूचींत या स्कंदपुराणाच्या पोथीच्या प्रत्येक अध्यायाची सूची

दिलेली आहे; पण ही पोथी स्कंदपुराणाच्या कोणत्या संहितेपैकीं किंवा खंडापैकीं होती, याविषयीं त्यानीं कांहीं लिहिलेलें नाहीं. तथापि अध्यायसूचीवरून हरप्रसादशास्त्री यांस मिळालेली पोथी अंबिकाखंडाची असावी, असें पं. ज्वालाप्रसाद यानीं ठरविलेलें आहे. याविषयीं उक्त पंडितजी म्हणतात कीं, " नारदपुराणांत या अंबिकाखंडाची गणना सात खंडांत केलेली नाहीं, ही आश्चर्याची गोष्ट होय; परंतु अंबिकाखंडाची पोथी व शंकरसंहितेंतील खंडादिकांतील विषय यांचें निरीक्षण करून पहाता, हें खंड स्कंदपुराणांतर्गत आहे यात शंका राहत नाहीं. आजपर्यंत जितक्या पौराणिक पोथ्या उपलब्ध झालेल्या आहेत त्यात नेपाळची वरील प्रत प्राचीनतम होय !" आमचे मतें नारदपुराणात उक्त खंडाचें नाव न मिळण्याचें कारण असें आहे कीं, तेव्हां स्कंदपुराणाच्या षट्संहिता व तदंतर्गत पंचाशत्खंडात्मक विभाग प्रचलित होते, नारदसूचीच्या वेळेच्याप्रमाणें सप्तमहाखंडात्मक विभागपद्धति तेव्हा प्रचलित नव्हती. हरप्रसादशास्त्री यास मिळालेला स्कंदपुराणाचा हा भाग म्हणजे ५० खंडापैकीं एक खंड ( अंबिकाखंड ) असावें, यामुळें त्याची गणना नारदीय सप्तमहाखंडात येत नाहीं, हें उघडच आहे.

यावरून दुसरी एक गोष्ट सिद्ध होते कीं, नारदसूचींत स्कंदपुराणाची पंचाशत्खंडात्मक विभागपद्धति नसून सप्तमहाखंडात्मक पद्धति असल्यामुळें या पुराणातील ही पुराणसूची इ. स. च्या* साहव्या शतकानंतरची असली

---

* या पोथीच्या काळाविषयीं बाबू ज्ञानेंद्रनाथ मित्र हे आपल्या श्रीकृष्ण नामक इंग्रजी पुस्तकांत लिहितात कीं:—

" In the library of the Asiatic Society of Bengal, there is a copy of the Skanda Purāna found in the Nepal Durbar Library, which has a colophon proving it to be *at least as old as the sixth* century A. D. यावरूनही पोथी निदान साहाव्या शतकाइतकी तरी प्राचीन असली पाहिजे, हें उघड आहे. याहूनही ती प्राचीनतर असूं शकेल.

पाहिजे, म्हणजे ती इ. स. ५००–६०० दरम्यानची असली पाहिजे. मागे आम्हीं ही सूची याच दरम्यानची ठरविलेली आहे; ती पाहिजे तर जरा ५०–७५ वर्षे पुढे न्यावी. पण ती शंकराचार्यांच्या पूर्वीची तर असलीच पाहिजे, हे आपण विष्णुपुराण ( व अग्निपुराण ) यांच्या निरीक्षणांत पाहिलेंच आहे. ही सूची सामान्यतः इ. स. ५००–६०० च्या दरम्यानची धरण्यास बिलकुल हरकत दिसत नाहीं !

मत्स्यपुराणानें या पुराणाचें लक्षण असें दिलेलें आहे कीं:—

> यत्र माहेश्वरान्धर्मानधिकृत्य च षण्मुखः ।
> कल्पे तत्पुरुषे वृत्तं चरितैरुपबृंहितम् ॥
> स्कांदं नाम पुराणं तत् एकाशीति निगद्यते ।
> सहस्राणि शतं चैकमिति मर्त्येषु गद्यते ॥

हल्लीं जो भाग उपलब्ध होत आहे तो सर्व मत्स्योक्त स्कंदपुराणाचाच आहे कीं काय याबद्दल शंका वाटते. स्कंदपुराणावर दुसरा संस्कार झालेला आहे, यात शंकाच नाहीं. हा ग्रंथ एकत्र संपूर्ण मिळत नसून खंडात्मक असल्यामुळे यात अनेक स्थलमाहात्म्यें व इतर मजकूर घुसडून देण्यास मंडळीस सवड मिळणें साहजिक आहे. तथापि, अर्वाचीन भाग प्राचीन भागातून नेहमीं निवडून काढण्यासारखाच असतो. हें पुराण सर्वपुराणांत मोठें व विविध आश्चर्यकारक कथांनीं भरलेलें आहे. याच्या संपूर्ण प्रतीचा शोध होणें जरूर आहे.

मागें लिहिलेल्या १९ खंडाशिवाय खालील खंड या पुराणाचे भाग म्हणून आपणांस म्हणवून घेत असलेले आढळतातः—

सह्याद्रिखंड, अर्बुदाचलखंड, कनकाद्रिखंड, काश्मीरखंड, कोसलखंड, गणेशखंड, उत्तरखंड, पुष्करखंड, बदरिकाखंड, भीमाखंड, भैरवखंड, मलयाचलखंड, मानसखंड, कालिकाखंड, श्रीमालखंड, पर्वतखंड, सेतुखंड,

हालास्यखंड, हिमवत्खंड, महाकाळखंड, तीर्थखंड व पितृखंड. तरी ४१ खंड झाले ! अजून ९ खंड राहिले !

याशिवाय, यात खालील भाग आहेत म्हणून प्रसिद्धि आहे:—

अगस्त्यसंहिता, ईशानसंहिता, उमासंहिता, सदाशिवसंहिता, प्रल्हादसंहिता, अधिमासमाहात्म्य, अंबिकामाहात्म्य, अयोध्यामाहात्म्य इत्यादि माहात्म्यें. या अनेक प्रकारच्या माहात्म्यांनीं व खंडांनीं प्राचीन भारत काळचा भूगोल भरपूर समजतो. तेव्हां भौगोलिकदृष्टया त्याचें महत्त्व आहे, हें विसरता कामा नये.

विल्सन यास काशीखंड, उत्कलखंड, ब्रह्मोत्तरखंड, रेवाखंड, शिवरहस्यखंड व हिमवत्खंड इतके खंड मिळाले होते असें दिसतें. याशिवाय, सूतसंहिता, सनत्कुमारसंहिता, सौरसंहिता, व कपिलसंहिता याचा त्यांनीं उल्लेख केलेला आहे. हीं माहात्म्यें व या संहिता यांपैकीं एकही मूळ स्कंदाचा भाग आहे असें यास वाटत नाहीं !!!

सह्याद्रिखंड हे स्कंदपुराणांतर्गत आहे अशी प्रसिद्धि आहे. मि. गर्सन डी कुन्हा यांनीं इ० स० १८७७ मध्यें मुंबईस या खंडाची हिंदुस्थानांतील निरनिराळ्या ठिकाणच्या १४ हस्तलिखित प्रति जमवून, एक प्रत छापवून काढलेली आहे. त्या प्रतीवरून खालील माहिती देत आहें. या खंडाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन मुख्य भाग असून, शिवाय यातच मोडणारीं सह्य माहात्म्यें आहेत. हें खंड स्कंदपुराणांतील **सनत्कुमारसंहितेंत** होतें असें खालील ओळीवरून दिसतें. "इति श्रीस्कांदे, सनत्कुमारसंहितायां, सह्याद्रिखंडे, उत्तररहस्ये... ॥" वरील छापील प्रतींत अध्याय व श्लोक हल्लीं मिळतात त्याप्रमाणें दिलेले आहेत:—पूर्वार्धास 'आदिरहस्य' व उत्तरार्धास 'उत्तररहस्य' असेंही म्हटलेलें आहे.

| | नाव. | अध्याय. | श्लोकसंख्या. |
|---|---|---|---|
| | पूर्वार्ध. | ६७ | ३५५७ |
| | उत्तरार्ध. | २१ | ११४२ |
| १ | रेणुकामाहात्म्य | ४० | १०२५ |
| २ | चंद्रचूडमा. | ८ | १४३ |
| ३ | नागाव्हयमा. | ५ | ७९ |
| ४ | वरुणापुरमा | २ | ५३ |
| ५ | कामाक्षीमा. | ४ | १३० |
| ६ | मागारामा. | १२ | ४५७ |
| | | १५६ | ६५८७ |

केदारखंड हें स्कंदपुराणांतीलच एक खंड असून यांत ३० अध्याय व सुमारें ३१२५ श्लोक आहेत

काशीखंड हें स्कंदपुराणाचें १० वें खंड आहे, असें प्राकृतटीकाकार शिवदासगोमा कवि म्हणतो, अर्थात् हें ५० खंडापैकीं १० वें हें उघड आहे.

स्कंदपुराणांतील शिवरहस्यखंडांत व कूर्मपुराणांत आद्य श्रीशंकराचार्यांचा उल्लेख आहे असें ऐकण्यांत आहे असें असेल तर श्रीशंकराचार्यांचा उल्लेख असलेले कांहीं भाग त्या त्या पुराणांत अगर पुराणभागांत जोडण्यांत आले असें म्हणावें लागेल.

अमृतानुभवावरील टीकाकार शिवकल्याण हा आपल्या टींकेंत ( शके १५५७ ) वारंवार सूतसंहितेंतील ब्रह्मगीतेचा उल्लेख करितो, व माधवमंत्र्यांनीं १४ व्या शतकांत संपूर्ण सूतसंहितेवर टीका केलेली आहे!

स्कंदपुराणाच्या ईशसंहितेपैकीं हालास्यमाहात्म्य म्हणून एक भाग आहे. त्याचें तामिळ भाषेंत भाषांतर झालेलें आहे. हें भाषांतर परंज्योतिमुनिवर यांनीं अतिवीरराम पाड्यराजाच्या वेळीं इ० स० १६ व्या शतकाच्या **अखेरीस** केलें. याचें तामिळ नाव **'तिरुविलयादर्शपुराणं'** असें आहे. स्कंदपुराणाच्या अगस्त्यसंहितेचेंही तेलगू भाषेंत भाषांतर झालेलें आहे. परंज्योतिमुनिवर यांनीं हालास्यमाहात्म्याचें १६ व्या शतकाच्या अखेरीस भाषांतर करण्यापूर्वीच दुसरें एक भाषांतर प्रचलित होतें. या हालास्यमाहात्म्यात **पांड्यराजांची** यादी आहे, असें मि० एम्. शेषगीरशास्त्री यांनीं लिहिलें आहे. ( Report of Sk & Tamil Mss 1896-97, No 1; pt 52-56 ).

याहीपूर्वी तामिळ भाषेंत स्कंदपुराण अवतरल्याचा उल्लेख आढळतो. काजीवरम् ( काची ) चे कश्यपस्वामिगळ् यानीं सुमारें इ० स० ७८० च्या सुमारास स्कंदपुराण तामिळमध्यें रचलें. तेव्हा त्यात कोणकोणता व किती भाग होता, हें कळण्यास आम्हाजवळ साधन नाहीं; पण यावरून इ० स० ७८० मध्यें स्कंदपुराणाचा कांहीं तरी भाग असून तो भाषांतर रूपानें तामिळ भाषेंत अवतरण्याइतका प्रसिद्धीस आला होता, हें उघड आहे.

स्कंदपुराणाच्या *प्रश्नोत्तरखंडाचेंही तामिळ भाषेंत वरतुंगरामन् यानीं* इ. स० १२ व्या शतकांत भाषांतर केलें आहे, असें वरील शास्त्रयानीं वरील ठिकाणीं ( पृ० ५६ ) लिहिलें आहे. याच सुमारास तामिळींमध्यें कूर्मपुराणाचें भाषांतर झालें आहे, असेंही ते म्हणतात. एकंदरींत स्कंदपुराण तामिळ लोकांस फार प्रिय दिसतें.

स्कंदपुराणाच्या कालिकाखंडाच्या प्रारंभीं, पहिल्या अध्यायात, संपूर्ण स्कंदपुराणाची अनुक्रमणिका दिलेली आहे. कालिकाखंडाच्या मतें या पुराणात खालील सहा संहिता आहेत.—

१ सनत्कुमारसंहिता, २५ खंड, १० हजार अध्याय.

२ सूतसंहिता, ४ खंड, व ७६ अध्याय.

३ शांकरसंहिता, २१ खंड व २००० अध्याय.

४ वैष्णवीसंहिता, ... ... ३०० अध्याय.

५ ब्राम्हीसंहिता, ... ... ( ३००० श्लोक ).

५ सौरसंहिता, ... ... ( ६०००० श्लोक ).

यांत एकंदर सहा संहिता व पन्नास खंड आहेत असें म्हटलेलें आहेः—

> स्कांदं पुराणं संधाय पंचाशत्खंडमंडितम् ।
> षड्विधं संहिताभेदैः शिवधर्ममहार्णवम् ॥ १० ॥

पण वरील तीनच संहितात मिळून ५० खंडांची भरती होते, हें आश्चर्य नव्हे काय !

सनत्कुमारसंहितेत ५० हजार श्लोक असून २५ खंड आहेत असें म्हटले आहेः—त्यांची नावे. ( १ ) क्षेत्रखंड, ( २ ) तीर्थखंड, ( ३ ) काशीखंड, ( ४ ) सह्याद्रिखंड, ( ५ ) हिमाचलखंड, ( ६ ) मलयाचलखंड, ( ७ ) विंध्याद्रिखंड, ( ८ ) मोक्षखंड, ( ९ ) प्रभासखंड, ( १० ) पुष्करखड, ( ११ ) नागरखंड, ( १२ ) नर्मदाखंड, ( १३ ) श्रीशैलखंड, ( १४ ) अवंतीखंड, ( १५ ) गौरीखंड, ( १६ ) कुरुक्षेत्रखंड, ( १७ ) केदारखंड, ( १८ ) हरिहरखंड, ( १९ ) सेतुमाहात्म्यखंड, ( २० ) कालिकाखंड, ( २१ ) व्रतोपाख्यानखंड, ( २२ ) नदीखंड, ( २३ ) धर्मखंड, ( २४ ) देशखंड, ( २५ ) वर्षखंड.

स्कंदपुराणातील निर्वाणखंडांत एक रामगीता आहे. तीवर उपेंद्राश्रमांचे शिष्य विश्वरूपभारती यांची अर्थसंदीपिका नामक टीका आहे. या टीकेच्या शेवटीं खालील श्लोक आहेतः—

> उपेंद्रश्रीपदांभोजसम्योत--( सद्द्योत ) तत्स्मृतिमातलः।
> विश्वरूपेण तीर्णः श्रीरामगीतामहांबुधिः ॥ १ ॥

शिष्यः श्रीनरसिंहभारतियतेर्वेदोक्तवैश्वास्य सत् ( ? ) ।
सिद्धांतोत्तमदीपिकामरचयद्यो विश्वरूपो यतिः ॥
श्रीमद्वै नृपविक्रमार्कसमयात् वस्त्रष्टपंचद्रुमे ।
वर्षे श्री ....वीरसिंहनृपतौ विश्वं भुवं शासति ॥२ ॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यभारतीश्रीनरसिंहपूज्यपादशिष्यस्य उपेंद्राश्रमश्रीपद्मचारकस्य भारतीविश्वरूपस्य विरचिताया स्कंदपुराणीयनिर्वाणखंडस्य चतुस्त्रिंशतितमेऽध्याये श्रीरामगीताटीकाया तृतीयोऽध्यायः ॥

नृसिंहभारती
|
उपेंद्राश्रम
|
विश्वरूपभारती—रामगीताटीकाकर्ते

} विश्वरूपभारतींनीं ही टीका विक्रमकाल 'वस्त्वष्टपंचद्रुमे' १५८८ मध्यें लिहिलेली आहे; म्हणजे इ.स. १५३१ मध्यें ही टीका लिहिली गेली असें ठरतें; तसेंच, सिद्धांतोत्तमदीपिका हा ग्रंथही विश्वरूपयतींचाच आहे, हेंही यावरून कळतें.

---

## वामनपुराण, १४ वें.

नारदपुराणांत याची सूची याप्रकारें दिलेली आहे:—

शृणु वत्स ! प्रवक्ष्यामि पुराणं वामनाभिधम् ।
त्रिविक्रमचरित्राढ्यं दशसाहस्रसंख्यकम् ॥
कूर्मकल्पसमाख्यानं वर्गत्रयकथानकम् ।
भोगलयसमायुक्तं वक्तृश्रोतृशुभावहम् ॥
पुराणप्रश्नः प्रथमं ब्रह्मशीर्षच्छिदा ततः ।
कपालमोचनाख्यानं दक्षयज्ञविहिंसनम् ॥
हरस्य कालरूपाख्या कामस्य दहनं ततः ।

प्रल्हादनारायणयोर्युद्धं देवासुराह्वयम् ॥
सुकेश्यर्कसमाख्यानं ततो भुवनकोशकम् ।
ततः काम्यव्रताख्यानं श्रीदुर्गाचरितं ततः ॥
तपतीचरितं पश्चात्कुरुक्षेत्रस्य वर्णनम् ।
सुरमाहात्म्यमतुलं पार्वतीजन्मकीर्तनम् ॥
तपस्तस्या विवाहश्च गौर्युपाख्यानकं ततः ।
ततः कौशिक्युपाख्यानं कुमारचरितं ततः ।
ततोऽन्धकवधाख्यानं साधूपाख्यानकं ततः॥
जाबालिचरितं पश्चात् अरजायाः कथाऽद्भुता ॥
अंधकेश्वरयोर्युद्धं गणत्वं चांधकस्य च ॥
मरुतां जन्मकथनं बलेश्च चरितं ततः ॥
ततस्तु लक्ष्म्याश्चरितं त्रैविक्रममतःपरम् ।
प्रल्हादतीर्थयात्रायां प्रोच्यंते तत्कथाः शुभाः ॥
ततश्च धुंधुचरितं प्रेतोपाख्यानकं ततः ।
नक्षत्रपुरुपाख्यानं श्रीरामचरितं ततः ।
त्रिविक्रमचरित्रांते ब्रह्मप्रोक्त: स्तवोत्तमः ॥
प्रल्हादबलिसंवादे सुतले हरिशंसनम् ।
इत्येष पूर्वभागोऽस्य पुराणस्य तवोदितः ॥
शृणु तस्योत्तरं भागं बृहद्वामनसंज्ञकम् ।
माहेश्वरी भगवती सौरी गाणेश्वरी तथा ॥
चतस्रः संहिताश्चात्र पृथक्साहस्रसंख्यया ।
माहेश्वर्यां तु कृष्णस्य तद्भक्तानां च कीर्तनम् ॥

भगवत्यां जगन्मातुरवतारकथाऽद्भुता ।
सौर्यां सूर्यस्य महिमा गदितः पापनाशनः ॥
गाणेश्वर्यां गणेशस्य चरितं च महेशितुः ।
इतीदं वामनं नाम पुराणं सुविचित्रितम् ॥
पुलस्त्येन समाख्यानं नारदाय महात्मने ।
ततो नारदतः प्राप्तं व्यासेन सुमहात्मना ॥
व्यासात्तु लब्धवान्वत्स ! तच्छिष्यो रोमहर्षणः ।
स चाख्यास्यति विप्रेभ्यो नैमिषीयेभ्य एव च ॥
एवं परंपराप्राप्तं पुराणं वामनं शुभम् ॥

मत्स्यपुराणमतें याचें लक्षण असें आहेः—

त्रिविक्रमस्य माहात्म्यं अधिकृत्य चतुर्मुखः ।
त्रिवर्गमभ्यधात् तच्च वामनं परिकीर्तितम् ॥
पुराणं दशसाहस्रं कूर्मकल्पानुगे शिवम् ।

नारदसूचीप्रमाणेंच हल्लींही वामनपुराण मिळतें; पण उत्तरभाग हल्लीं मिळत नाहीं.

वेंकटेश्वरप्रेसमध्यें छापलेल्या वामनपुराणातही नारदसूचीप्रमाणें १० हजार श्लोक नाहींत; यातील श्लोकसमूह कसा नष्ट झाला असेल, हें कांहीं समजत नाहीं. मत्स्यपुराणोक्त त्रिविक्रमचरित्र प्रचलित वामनपुराणात असले तरी ब्रम्हद्वारा हें पुराण वर्णिलें गेलें नाहीं, तथापि हेंच वामनपुराण नारद-पुराणाची सूची रचण्यापूर्वी होतें असे वाटतें.

विल्सन साहेबास मिळालेला फक्त पूर्वभागच असावा; कारण त्याची श्लोकसंख्या त्यानीं सुमारें ७ हजार दिलेली आहे. उत्तरभाग ४००० श्लोकाचा मिळतच नाहीं ! यामुळें हल्लीं श्लोकसंख्या कमी पडते.

## कूर्मपुराण, १५ वें.

*मत्स्यपुराणमतें याचें लक्षण असें आहेः—*

यत्र धर्मार्थकामानां मोक्षस्य च रसातले ।
माहात्म्यं कथयामास कूर्मरूपी जनार्दनः ॥
इंद्रद्युम्नप्रसंगेन ऋषिभ्यः शुक्रसंनिधौ ।
अष्टादशसहस्राणि लक्ष्मीकल्पानुषंगिकम् ॥

याची सूची नारदपुराणानें अशी दिलेली आहेः—

शृणु वत्स ! मरीचेऽद्य पुराणं कूर्मसंज्ञितम् ।
लक्ष्मीकल्पानुचरितं यत्र कूर्मवपुर्हरिः ॥
धर्मार्थकाममोक्षाणां माहात्म्यं च पृथक् पृथक् ॥
इंद्रद्युम्नप्रसंगेन प्राहर्षिभ्यो दयांतिकम् ।
तत्सप्तदशसाहस्रं सुचतुःसंहितं शुभम् ॥
यत्र ब्राह्मयां पुरा प्रोक्ता धर्मा नानाविधा मुने ॥
नानाकथाप्रसंगेन नृणां सद्गतिदायकाः ।
यत्र पूर्वविभागे तु पुराणोपक्रमः पुरा ॥
लक्ष्मीप्रद्युम्नसंवादः कूर्मर्षिगणसंकथा ।
वर्णसमाचारकथा जगदुत्पत्तिकीर्तनम् ॥
कालसंख्या समासेन लयांते स्तवनं विभोः ।
ततः संक्षेपतः सर्गः शांकरं चरितं तथा ॥
सहस्रनाम पार्वत्या योगस्य च निरूपणम् ।
भृगुवंशसमाख्यानं ततः स्वायंभुवस्य च ।
देवादीनां समुत्पत्तिः दक्षयज्ञहतिस्तथा ॥

दक्षसृष्टिकथा पश्चात्कश्यपान्वयकीर्तनम् ॥
आत्रेयवंशकथनं कृष्णस्य चरितं शुभम् ॥
मार्कंडकृष्णसंवादो व्यासपांडवसंकथा ।
युगधर्मानुकथनं व्यासजैमिनिकी कथा ॥
वाराणस्याश्च माहात्म्यं प्रयागस्य ततः परम् ॥
त्रैलोक्यवर्णनं चैव वेदशाखानिरूपणम् ।
उत्तरेऽस्य विभागे तु पुरा गीतेश्वरी ततः ॥
व्यासगीता ततः प्रोक्ता नानाधर्मप्रबोधिनी ।
नानाविधानां तीर्थानां माहात्म्यं च पृथक् पृथक् ॥
नानाधर्मप्रकथनं ब्राह्मीयं संहिता स्मृता ॥
अतः परं भगवतीसंहितार्थनिरूपणे ।
कथिता यत्र वर्णानां पृथग्वृत्तिरुदाहृता ॥
( तदुत्तरभागीयभगवत्याख्यद्वितीयसंहितायाः पंचपादेषु )
अस्याश्च प्रथमे प्रोक्ता ब्राह्मणानां व्यवस्थितिः ।
सदाचारात्मिका वत्स ! भोगसौख्यविवर्धिनी ॥
द्वितीये क्षत्रियाणां तु वृत्तिः सम्यक्प्रकीर्तिता ।
यया त्वाश्रितया पापं विधूयेह व्रजेच्छिवम् ।
तृतीये वैश्यजातीनां वृत्तिरुक्ता चतुर्विधा ॥
यया चरितया सम्यक् लभते गतिमुत्तमम् ।
चतुर्थेऽस्यास्तथा पादे शूद्रवृत्तिरुदाहृता ॥
यया संतुष्यति श्रीशो नृणां श्रेयोविवर्धनः ।
पंचमेऽस्यास्ततः पादे वृत्तिः संकरजोदिता ॥

यया चरितयाऽऽप्नोति भाविनीमुत्तमां जानिम् ।
इत्येषा पंचपद्युक्ता द्वितीया संहिता मुने ।
तृतीयाऽत्रोदिता सौरी नृणां कामविधायिनी ॥
षोढा षट्कर्मसिद्धिः सा बोधयंती च कामिनाम् ।
चतुर्थी वैष्णवी नाम मोक्षदा परिकीर्तिता
चतुष्पदी द्विजादीनां साक्षाद्ब्रह्मस्वरूपिणी ।
ताः क्रमात् षट्चतुर्द्वीपुसहस्राः परिकीर्तिताः ॥

या सूचीवरून कूर्मपुराणाचे स्वरूप उत्तम रीत्या कळून येतें; ते असें:—

याच्या चार संहिता—१७ हजार श्लोक.

| | | |
|---|---|---|
| १ ब्राह्मीसंहिता—पूर्वभाग व उत्तरभाग— | ६ | हजार श्लोक. |
| २ भगवतीसंहिता—पाच पाद— ... | ४ | ,, ,, |
| ३ सौरीसंहिता— ... ... ... | २ | ,, ,, |
| ४ वैष्णवीसंहिता—चार पाद— ... | ५ | ,, ,, |
| एकूण. | १७ | हजार ,, |

प्रचलित कूर्मपुराणात फक्त ६ हजारच श्लोक मिळतात; तेव्हां हें संपूर्ण नसून, याची फक्त ब्राह्मीसंहिताच आहे हें उघड आहे. विल्सन यासही फक्त ब्राह्मीसंहिताच मिळाली होती. त्यांनीं या संहितेच्या उपक्रमांतील खालील श्लोकाचें सार उतरून घेऊन म्हटलें आहे कीं, यांत श्लोकसंख्या ६ हजार सांगितली आहे व मत्स्यांत १७ हजार सांगितली आहे, याचा मेळ घालणें दुर्घट आहे ! ! पण याचा मेळ नारदसूचीनें घालता येतो, हल्लीं उपलब्ध असलेला कूर्मपुराणाचा भाग हा केवळ ब्राह्मी संहिताच आहे. पहा:—

इदं तु पंचदशमं पुराणं कौर्ममुत्तमम् ।

चतुर्धा संस्थितं पुण्यं संहितानां प्रभेदतः ॥
ब्राह्मी, भागवती, सौरी, वैष्णवी च प्रकीर्तिता ।
चतस्रः संहिताः पुण्याः धर्मकामार्थमोक्षदाः ॥
इयं तु संहिता ब्राह्मी चतुर्वेदैश्च संमिता ।
भवंति षट् सहस्राणि श्लोकानामत्र संख्यया ॥
यत्र धर्मार्थकामानां मोक्षस्य च मुनीश्वराः ।
माहात्म्यमखिलं ब्रह्म ज्ञायते परमेश्वराः ॥

कूर्मपुराण, ब्राह्मसं० अ. १ ला, ३२-३५.

वस्तुतः ही ब्राह्मीसंहिता बरीच प्राचीन व नारदपुराणसूचीच्या वेळीं होती तशीच राहिलेली असल्याप्रमाणें दिसतें. हींत तांत्रिक विषय आहेत म्हणून कांहीं इला अर्वाचीन म्हणतां येत नाहीं, कारण शंकराचार्यांच्या वेळेस ६४ तंत्रेंही प्रसिद्ध होतीं ! ते म्हणतातः—

चतुःषष्ट्या तंत्रैः सकलमभिसंधाय भुवनम् ॥

आनंदलहरी.

यावरून तंत्रें बरीच प्राचीन आहेत यांत शंकाच नाहीं; शिवाय, इ० पू० दुसऱ्या शतकांतील नागार्जुनानें* आपल्या कक्षपुटींत खालील तंत्रांचा उल्लेख केलेला आहेः—

शांभवे यामले शाक्ते मौले कौलेयडामरे ।
स्वच्छंदे लाकुले शैवे राजतंत्रेऽमृतेश्वरे ॥ ६ ॥
उड्डीशे वातुले तंत्रे उच्छिष्टे सिद्धशाबरे ।
किंकिणीमेरुतंत्रे च काकचंडीश्वरीमते ॥ ७ ॥

* नागार्जुनाच्या काळाविषयीं माझें "भारतीयरसायनशास्त्र" पृ० ९० पहा.

शाकिनीडाकिनीतंत्रे रौद्रेऽनुग्रहनिग्रहे ।
कौतुके शक्तितंत्रे च निराकारगुणोत्तरे ॥ ८ ॥
हरमेखलके तंत्रे इंद्रजाले रसार्णवे ।
आथर्वणे महावेदे चार्वाके गारुडेऽपि च ॥ ९ ॥
इत्येतदागमोक्तं च वक्त्राद्वक्त्रेण यच्छ्रुतम् ।
तत्सर्वं तु समुध्दृत्य दध्नो घृतमिवादरात् ॥ १० ॥

यावरून तंत्र ग्रंथ अर्वाचीन आहेत ही समजूत चुकीची आहे.

*या पुराणांतील ब्राह्मी संहितेंतील ईश्वरगीता व व्यासगीता यांतील* उतारे श्रीशंकराचार्यांनीं आपल्या विष्णुसहस्रनामभाष्य व सनत्सुजातीयभाष्य यांत घेतलेले आहेत. असो.

अगदीं निर्भेळ अशी पुराणसंहिता सुमारें इ० स० ५०० पासून कोणती राहिली असेल तर *ती ह्या पुराणाची ब्राह्मीसंहिता* होय!

---

मत्स्यपुराण, १६ वें.

मत्स्यपुराणानें आपलें लक्षण असें दिलेलें आहेः—

श्रुतीनां यत्र कल्पादौ प्रवृत्त्यर्थं जनार्दनः ।
मत्स्यरूपेण मनवे नरसिंहस्य वर्णनम् ॥
अधिकृत्याब्रवीत् सत्यकल्पवृत्तं मुनीश्वराः ।
तन्मात्स्यमिति जानीध्वं सहस्राणि चतुर्दश ॥

अध्याय, ५०-५३.

*नारदपुराणांत याची सूची याप्रमाणें दिलेली आहेः—*

अथ मात्स्यं पुराणं ते प्रवक्ष्ये द्विजसत्तम !
यत्रोक्तं सत्यकल्पानां वृत्तं संक्षिप्य भूतले ॥

व्यासेन वेदविदुषा नरसिंहोपवर्णनम् ।
उपक्रम्य तदुद्दिष्टं चतुर्दशसहस्रकम् ॥
मनुमत्स्यसुसंवादो ब्रह्मांडवर्णनं ततः ।
ब्रह्मदेवासुरोत्पत्तिः मारुतोत्पत्तिरेव च ॥
मदनद्वादशी तद्वल्लोकपालाभिपूजनम् ।
मन्वंतरसमुद्देशो वैन्यराज्याभिषेचनम् ॥
सूर्यवैवस्वतोत्पत्तिर्बुधसंगमनं तथा ।
पितृवंशानुकथनं श्राद्धकालस्तथैव च ॥
पितृतीर्थप्रचारश्च सोमोत्पत्तिस्तथैव च ।
कीर्तनं सोमवंशस्य ययातिचरित्रं तथा ॥
कार्तवीर्यस्य चरितं सृष्टं वंशानुकीर्तनम् ।
भृगुशापस्तथा विष्णोर्दशधा जन्म च क्षितौ ॥
कीर्तनं पुरुवंशस्य वंशो हौताशनः परः ।
क्रियायोगस्ततः पश्चात्पुराणपरिकीर्तनम् ॥
व्रतं नक्षत्रपुरुषं मार्तंडशयनं तथा ।
कृष्णाष्टमीव्रतं तद्वद्रोहिणीचंद्रसंज्ञितम् ॥
तडागाविधिमाहात्म्यं पादयोत्सर्ग एव च ।
सौभाग्यशयनं तद्वदगस्त्यव्रतमेव च ॥
तथाऽनंततृतीयाया रसकल्याणिनीव्रतम् ।
तथैवानंदकार्याश्च व्रतं सारस्वतं पुनः ॥
उपरागाभिषेकश्च सप्तमीशयनं तथा ।
भीमाख्या द्वादशी तद्वदनंगशयनं तथा ॥

अशून्यशयनं तद्वत्तथैवांऽगारकव्रतम् ।
सप्तमीसप्तकं तद्वद्विशोकद्वादशीव्रतम् ॥
मेरुप्रदानं दशधा ग्रहशांतिस्तथैव च ।
ग्रहस्वरूपकथनं तथा शिवचतुर्दशी ॥
तथा सर्वफलत्यागः सूर्यवारव्रतं तथा ।
संक्रांतिस्वपनं तद्वद्विभूतिद्वादशीव्रतम् ॥
षष्टि व्रतानां माहात्म्यं तथा स्नानविधिक्रमः ॥
प्रयागस्य तु माहात्म्यं द्वीपलोकानुवर्णनम् ।
तथांतरिक्षचारश्च ध्रुवमाहात्म्यमेव च ॥
भुवनानि सुरेंद्राणां त्रिपुरोद्योतनं तथा ।
पितृप्रवरमाहात्म्यं मन्वंतरविनिर्णयः ॥
चतुर्युगस्य संभूतिर्युगधर्मनिरूपणम् ।
वज्रांगस्य तु संभूतिस्तारकोत्पत्तिरेव च ॥
तारकासुरमाहात्म्यं ब्रह्मदेवानुकीर्तनम् ।
पार्वतीसंभवस्तद्वत्तथा शिवतपोवनम् ॥
अनंगदेहदाहश्च रतिशोकस्तथैव च ।
गौरीतपोवनं तद्वच्छिवेनाथ प्रसादनम् ॥
पार्वतीऋषिसंवादः तथैवोद्वाहमंगलम् ।
कुमारसंभवस्तद्वत् कुमारविजयस्तथा ॥
तारकस्य वधो घोरो नरसिंहोपवर्णनम् ॥
पद्मोद्भवविसर्गास्तु तथैवांधकघातनम् ।
वाराणस्यास्तु माहात्म्यं नर्मदायास्तथैव च ॥

प्रवरानुक्रमस्तद्वत् पितृगाथानुकीर्तनम् ।
तथोभयमुखीदानं दानं कृष्णाजिनस्य च ॥
ततः सावित्र्युपाख्यानं राजधर्मस्तथैव च ।
विविधोत्पातकथनं ग्रहशांतिस्तथैव च ॥
यात्रानिमित्तकथनं स्वप्नमंगलकीर्तनम् ॥
वामनस्य तु माहात्म्यं वाराहस्य ततः परम् ॥
समुद्रमथनं तद्वत् कालकूटाभिशातनम् ॥
देवासुरविमर्दश्च वास्तुविद्या तथैव च ।
प्रतिमालक्षणं तद्वद्देवतास्थापनं तथा ॥
प्रासादलक्षणं तद्वन्मंडपानां च लक्षणम् ।
भविष्यराज्ञामुद्देशो महादानानुकीर्तनम् ।
कल्पानुकीर्तनं तद्वत् पुराणेऽस्मिन्प्रकीर्तितम् ॥

( १ ) नारदसूचीच्या वेळीं मत्स्यपुराणांत क्रियायोग ( अ. ५२ ) व नक्षत्रपुरुषव्रत ( ५४ अ ) यांच्यामध्यें **पुराणानुक्रम** होता हें अत्यंत महत्त्वाचें होय !

( २ ) तसेंच, मंडपलक्षणानंतर ( २७० अ ) व तुलादानादि महादानापूर्वी ( अ. २७४ ) नारदपुराणसूचीच्या वेळीं **भविष्यकाळच्या राजांची हकीकत** होती.

( ३ ) कुमारसंभवाची कथा कालिदासानें याच पुराणावरून घेतलेली असल्याप्रमाणें दिसतें.

( ४ ) विक्रमोर्वशीयांतही याच पुराणांतील कथा कालिदासानें घेतलेली असावी.

( ५ ) महाभारतांत या पुराणाचा उल्लेख आलेला आहे; तो आम्हीं वायुपुराणनिरीक्षणांत दिलेला आहे.

या पुराणाविषयीं विल्सनचें मत:—

"The story of the Fish Avatara of Vishnu is told in the महाभारत, with reference to the मात्स्य as its authority; from which it might be inferred that the Purana was *prior to* the poem. This, *of course*, is consistent with the tradition that the Puranas were first composed by Vyasa But there can be no doubt that the greater part of the Mahabharata is much older than any *extant* Purana. * * * The primitive simplicity with which the story of the Fish Avatara is told in the महाभारत is of a much more antique complexion than the mysticism and extravagance of the *actual* Matsya Purana "

## मत्स्यपुराणाची रचना.

याविषयीं विल्सनचें मत असें आहे कीं:—

"The मत्स्यपुराण is a miscellaneous compilation, but, including in its contents, the elements of a genuine Purana. * * * Upon examining it carefully, it may be suspected that it is indebted to various works, not only for its matter, but for its words The geneological and historical chapters are much the same as those of the Vishnu, and many chapters as those on पितृ's and श्राद्ध s are precisely the same as those of the सृष्टिखंड of the पद्मपुराण. It has drawn largely also from the महाभारत Amongst other instances, it is sufficient to quote the story of सावित्री the devoted wife of सत्यवान, which is given in the Matsya *in the same* manner, but considerably abridged"

अग्निपुराणाविषयीं लिहितेवेळीं विल्सननीं एके ठाईं म्हटलें आहे कीं:—

"Subsequent to these (the chapters on the duties of Kings) we have an account of the distribution and arrangement of the वेद s and पुराण s and, in a chapter on gifts, *we have a description of the Puranas, which is precisely*

*the same and in the same situation as the similar subject in the Matsya Purana.*"

जर अग्निपुराणांतील पुराणमाहात्म्य मत्स्यपुराणांतील पुराणमाहात्म्यावरूनच घेतलेलें असेल ( व तें तसें असण्याचा बळकट संभव आहे; कारण, हल्लींचें अग्निपुराण हा संग्रहरूप ग्रंथ आहे ) व जर मत्स्यांतील पुराणवर्णन नारदसूचीस माहीत आहे, तर यांचा कालानुक्रम खालीं लिहिल्याप्रमाणें असला पाहिजे. ( हा क्रम नीट कळण्यासाठीं अग्निपुराणनिरीक्षण पहा ).

१ मत्स्यपुराणांतील पुराणवर्णन, सुमारें इ० स० २००—३००.
२ अमरकोश, इ० स० ३००—४००.
३ प्रचलित अग्निपुराण, सुमारें ,, ,, ३००—४००.
४ वृद्धशातातपस्मृति, ,, ,, ,, ५००—६००.
५ नारदपुराणांतील पुराणसूची, ,, ,, ,, ५००—६००.
६ श्रीशंकराचार्य, ,, ,, ,, ,, ७८८—८२०.

मत्स्यपुराणांतील पुराणवर्णनाध्याय नारदपुराणसूचीसच माहित आहे असें नव्हे; तर १२ व्या शतकांतील अपरार्कानें तो अध्याय संपूर्णपणें आपल्या याज्ञवल्क्यस्मृतीवरील टीकेंत उतरून घेतलेला आहे. वर ठरविलेल्या काळामध्यें पांचपन्नास वर्षांच्या फरकाखेरीज अधिक फरक करितां येणें शक्य नाहीं.

मत्स्यपुराणाचा भारतांत उल्लेख आहे इतकेंच नव्हे तर मत्स्यपु. अ. २५ ते ४२ पर्यंतचे ५०६ श्लोक जसेचे तसे भारताच्या आदिपर्वांत अध्याय ७६ ते ९३ पर्यंत आढळतात. हे अठरा अध्याय आहेत. यास भारतांत उत्तरययात्युपाख्यान म्हटलेलें आहे. एवढें ययात्याख्यान सांगितल्यानंतर पुनः त्या अर्थी भारतांत हें उत्तरययात्याख्यान सांगितलें

आहे, त्या अर्थी भारताच्या सद्यःस्वरूपकारानें तें या पुराणांतून संग्रहीत केलेलें असावें असें वाटतें.

---

गरुडपुराण, १७ वें.

मत्स्यपुराणमतें याचें लक्षण असें आहे कीः—

यदा च गारुडे कल्पे विश्वांडाद्गरुडोद्भवम् ।
अधिकृत्याब्रवीद्विष्णुः गारुडं तदिहोच्यते ॥
तदष्टादशकं चैव सहस्राणीह पठ्यते ॥

अ. ५३–५३.

नारदपुराणमते याची सूची अशी आहेः—

मरीचे शृणु वक्ष्यद्य पुराणं गारुडं शुभम् ।
गरुडायाऽब्रवीत्पृष्टो भगवान्गरुडासनः ।
एकोनविंशसाहस्रं तार्क्ष्यकल्पकथाचितम् ॥
पुराणोपक्रमो यत्र सर्गसंक्षेपतस्ततः ।
सूर्यादिपूजनविधिः दीक्षाविधिरतः परम् ॥
श्र्यादिपूजा ततः पश्चान्नवव्यूहार्चनं द्विज !
पूजाविधानं च ततः वैष्णवं पंजरं तथा ।
योगाध्यायस्ततो विष्णोर्नामसाहस्रकीर्तनम् ॥
ध्यानं विष्णोस्ततः सूर्यपूजा मृत्युंजयार्चनम् ॥
मालामंत्राः शिवार्चाऽथ गणपूजा ततः परम् ।
गोपालपूजा त्रैलोक्यमोहनश्रीधरार्चनम् ।
विष्ण्वर्चा पंचतत्त्वार्चा चक्रार्चा देवपूजनम् ॥
न्यासादिसंध्योपास्तिश्च दुर्गार्चाऽथ सुरार्चनम् ।

पूजा माहेश्वरी चातः पवित्रारोहणार्चनम् ।
मूर्तिध्यानं वास्तुमानं प्रासादानां च लक्षणम् ॥
प्रतिष्ठा सर्वदेवानां पृथक्पूजा विधानतः ।
योगोऽष्टांगो दानधर्मः प्रायश्चित्तं निधिक्रिया ।
द्वीपेशनरकाख्यानं सूर्यन्यूहश्च ज्योतिषम् ॥
सामुद्रिकं स्वरज्ञानं नवरत्नपरीक्षणम् ।
माहात्म्यमथ तीर्थानां गयामाहात्म्यमुत्तमम् ।
ततो मन्वंतराख्यानं पृथक् पृथक् विभागशः ॥
पित्राख्यानं वर्णधर्मा द्रव्यशुद्धिसमर्पणम् ।
श्राद्धं विनायकस्यार्चा ग्रहयज्ञस्तथाऽऽश्रमाः ॥
मननाख्या प्रेताशौचं नीतिसारो व्रतोक्तयः ।
सूर्यवंशः सोमवंशोऽवतारकथनं हरेः ॥
रामायणं हरिवंशो भारताख्यानकं ततः ।
आयुर्वेदे निदानं प्राक् चिकित्सा द्रव्यजा गुणाः ॥
रोगघ्नं कवचं विष्णोः गारुडं त्रैपुरो मनुः ।
प्रश्नचूडामणिश्चांत्ये हयायुर्वेदकीर्तनम् ॥
औषधीनामकथनं ततो व्याकरणोऽहनम् ।
छंदःशास्त्रं सदाचारस्ततः स्नानविधिः स्मृतः ॥
तर्पणं वैश्वदेवं च संध्या पार्वणकर्म च ।
नित्यश्राद्धं सपिंडाख्यं धर्मसारोऽघनिष्कृतिः ॥
प्रतिसंक्रम उक्तोऽस्मात्युगधर्माः कृतेः फलम् ।
योगशास्त्रं विष्णुभक्तिः नमस्कृतिफलं हरेः ।

माहात्म्य वैष्णवाना च नारसिंहस्तवोत्तमम् ॥
ज्ञानामृत गुह्याष्टक स्तोत्र विष्ण्वर्चनाव्हयम् ।
वेदातसाख्यसिद्धान ब्रह्मज्ञान तथात्मकम् ॥
गीतासारफलोत्कीर्ति पूर्वखंडोऽयमीरित ॥
अथाऽस्यैवोत्तरे खडे प्रेतकल्प पुरोदित ।
यत्र तार्क्ष्येण सपृष्टो भगवानाह वाडव ॥
धर्मप्रकट्न पूर्वयोनीना गतिकारणम् ।
दानादिक फल चापि प्रोक्त मत्रौर्ध्वदेहिकम् ॥
यमलोकस्य मार्गस्य वर्णन च तत परम् ।
षोडशश्राद्धफलक वृत्राणा चात्र वार्णितम् ।
निष्कृतिर्यममार्गस्य धर्मराजस्य वैभवम् ॥
प्रेतपीडाविनिर्देश प्रेतचिन्हनिरूपणम् ।
प्रेताना चरिताख्यान कारण प्रेतता प्रति ॥
प्रेतकृत्यविचारश्च सपिंडकरणोक्तय ।
प्रेतत्वमोक्षणाख्यान दानानि च विमुक्तये ॥
आवश्यकोत्तम दान प्रेतसैख्यकर हितम् ।
शारीरकविनिर्देशो यमलोकस्य वर्णनम् ॥
प्रेतत्वोद्धारकथन कर्मकर्तृविनिर्णय ।
मृत्यो पूर्वक्रियाख्यान पश्चात्कर्मनिरूपणम् ॥
मध्य षोडशक श्राद्ध स्वर्गप्राप्तिक्रियोहनम् ।
सूतकस्याऽथ सख्यान नारायणबलिक्रिया ॥
वृषोत्सर्गस्य माहात्म्य निषिद्धपरिवर्जनम् ।

अपमृत्युक्रियोक्तिश्च विपाकः कर्मणां नृणाम् ।
कृत्याकृत्यविचारश्च विष्णुध्यानं विमुक्तये ॥
स्वर्गतो विहिताख्यानं स्वर्गसौख्यनिरूपणम् ।
भूर्लोकवर्णनं चैव सप्तधा लोकवर्णनम् ।
पंचोर्ध्वलोककथनं ब्रह्मांडस्थितिकीर्तनम् ॥
ब्रह्मांडानेकचरितं ब्रह्मजीवनिरूपणम् ।
आत्यंतिकलयाख्यानं फलस्तुतिनिरूपणम् ॥
इत्येतद्गारुडं नाम पुराणं भक्तिमुक्तिदम् ॥

नारद व मात्स्यपुराणानुसारच प्रचलित गरुडपुराण आहे; नारदपुराणाच्या अनुक्रमणिकेप्रमाणेंही सर्व विषय यांत आहेत. याची श्लोकसंख्या मात्स्यांत १८ हजार व नारदांत १९ हजार सांगितलेली आहे; पण हल्लीं हें सुमारें ७ हजारांहूनही प्रायः कमीच आढळतें; प्रचलित गरुडपुराणांतील भविष्यराजवंशाख्यानाचा पूर्वाध पहातां कळून येतें कीं हें पुराण मूळ जनमेजयाच्या वेळीं संकलित झालेलें होतें, (अ १४४–४२) पुढील भविष्यराजवर्णनांत राजा शूद्रकापर्यंतच नांवें आहेत. (शुद्धोदनो राहुलश्च सेनजिच्छूद्रकस्तथा । १४५–८). विष्णु, मत्स्य वगैरे पुराणांत आंध्रगुप्त वगैरे पुढील राजांचा उल्लेख असल्यामुळें, त्यांच्या अपेक्षेनें प्रचलित गरुडपुराण त्यांहून प्राचीनतर मानतां येईल.

हें अनेक विषयाचें असल्यामुळें ह्यास कोणी कोणी अर्वाचीन पुराण समजतात; परंतु यांतील कोणताही विषय अर्वाचीन दिसत नाहीं. मूळच्या गरुडपुराणाचे संपूर्ण श्लोक मिळत नसले व प्रचलित गरुडांत कांहीं कांहीं ठाईं ह्या माहात्म्यासारखीं अर्वाचीन प्रकरणें असलीं तरी, हे भाग सोडून बाकीच्या भागांत मूळचेंच पुराण कायम राहिलेलें आहे असें म्हणण्यास बिलकूल हरकत नाहीं.

विल्सन यास गरुडपुराणाच्या ३ प्रति पहाण्यास मिळाल्या, पण त्या तिन्ही प्रतींत सात हजारांवर श्लोक नव्हते तसेंच, कलकत्त्यास छापलेल्या गरुडपुराणात याची श्लोकसंख्या याप्रमाणे दिलली आहे कीं –

अष्टौ श्लोकसहस्राणि तथा चाष्टौ शतानि च ।
पुराण गारुड व्यास पुराऽसौ माऽब्रवीदिदम् ॥
अ. १–३५

यात श्लोकसंख्या ८८०० दिलेली आहे !!! वेंकटेश्वरच्या यादींत मात्र १९००० श्लोकांचें मोठें गरुडपुराण आहे !!! तें मला अजून तपासून पाहणें झालें नाहीं !

---

## ब्रह्मांडपुराण, १८ वें

प्रो विल्सन, राजा राजेंद्रलाल मित्र व डॉ० भांडारकर वगैरे विद्वान् लोक मूळ ब्रह्मांडपुराण बुडालेलें आहे, असें मानतात

मत्स्यपुराणमतें ब्रह्मांडाचें लक्षण असें आहे कीं —

ब्रह्मा ब्रह्मांडमाहात्म्य अधिकृत्याऽब्रवीत्पुन ।
तच्च द्वादशसाहस्र ब्रह्मांड द्विशताधिकम् ॥ ५४ ॥
भविष्याणां च कल्पानां श्रूयते यत्र विस्तर ।
तद्ब्रह्मांडपुराण च ब्रह्मणा समुदाहृतम् ॥ ५५ ॥ अ ५३

शिवपुराणाच्या उत्तरखंडात याच लक्षण असें आहे —

ब्रह्मांडचरितोक्तत्वाद्ब्रह्मांड परिकीर्तितम् ।

शैवमहापुराणाच्या वायुसंहितेच्या ११ व्या अध्यायात म्हटल आहे कीं –

ब्रह्मांड चातिपुण्योऽय पुराणानामनुक्रम ।

नारदपुराणात याची सूची अशी दिलेली आहे —

शृणु वत्स ! प्रवक्ष्यामि ब्रह्मांडाख्यं पुरातनम् ।
तच्च द्वादशसाहस्रं भाविकल्पकथायुतम् ॥
प्रक्रियाख्योऽनुषंगाख्य उपोद्घातस्तृतीयकः ।
चतुर्थ उपसंहारः पादाश्चत्वार एव हि ॥
पूर्वपादद्वयं पूर्वो भागोऽत्र समुदाहृतः ।
तृतीयो मध्यमो भागः चतुर्थस्तूत्तरो मतः ॥

( तत्र पूर्वभागे प्रक्रियापादे )

आदौ कृतसमुद्देशो नैमिषाख्यानकं ततः ।
हिरण्यगर्भोत्पत्तिश्च लोककल्पनमेव च ।
एष वै प्रथमः पादो द्वितीयं शृणु मानद! ॥

( पूर्वभागे अनुषंगपादे )

कल्पमन्वंतराख्यानं लोकज्ञानं ततः परम् ।
मानसीसृष्टिकथनं रुद्रप्रसववर्णनम् ॥
महादेवविभूतिश्च ऋषिसर्गस्ततः परम् ।
अग्नीनां विषयश्चाथ कालसद्भाववर्णनम् ॥
प्रियव्रतान्वयोद्देशः पृथिव्यायामविस्तरः ।
वर्णनं भारतस्यास्य ततोऽन्येषां निरूपणम् ॥
जम्ब्वादिसप्तद्वीपाख्या ततोऽधोलोकवर्णनम् ।
ऊर्ध्वलोकानुकथनं ग्रहचारस्ततः परम् ।
आदित्यव्यूहकथनं देवग्रहानुकीर्तनम् ॥
नीलकंठाह्वयाख्यानं महादेवस्य वैभवम् ।
अमावास्यानुकथनं युगतत्त्वनिरूपणम् ॥

यज्ञप्रवर्तनं चाथ युगयोरंडयोः कृतिः ॥
युगप्रजालक्षणं च ऋषिप्रवरवर्णनम् ।
वेदानां व्यसनाख्यानं स्वायंभुवनिरूपणम् ॥
शेषमन्वंतराख्यानं पृथिवीदोहनं ततः ।
चाक्षुषेऽश्यतने सर्गो द्वितीयोंऽघ्रिः पुरोदले ॥
अथोपोद्घातपादे तु सप्तर्षिपरिकीर्तिनम् ।
प्राजापत्याचयस्तस्माद्देवादीनां समुद्भवम् ॥
ततो जयाभिव्याहारौ मरुदुत्पत्तिकीर्तनम् ।
काश्यपेयानुकथनं ऋषिवंशनिरूपणम् ॥
पितृकल्पानुकथनं श्राद्धकल्पस्ततः परम् ।
वैवस्वतसमुत्पत्तिः सृष्टिस्तस्य ततः परम् ॥
मनुपुत्राचयश्चातो गांधर्वस्य निरूपणम् ।
इक्ष्वाकुवंशकथनं वंशोऽत्रेः सुमहात्मनः ॥
अमावसोराचयश्च रजेश्चरितमद्भुतम् ।
ययातिचरितं चाथ यदुवंशनिरूपणम् ॥
कार्तवीर्यस्य चरितं जामदग्न्यं ततः परम् ॥
वृष्णिवंशानुकथनं सगरस्याथ संभवः ।
भार्गवस्याथ चरितं तथा कार्तवधाश्रमम् ।
सगरस्याथ चरितं भार्गवस्य कथा पुनः ॥
देवासुराहवकथाकृष्णाविर्भाववर्णने ।
इलस्य च स्तवः पुण्यः शुक्रेण परिकीर्तितः ।
विष्णुमाहात्म्यकथनं बलिवंशनिरूपणम् ।

भविष्यराजचरितं संप्राप्तेऽथ कलौ युगे ।
एवमुद्घातपादोऽयं तृतीयो मध्यमे दले ।
चतुर्थमुपसंहारं वक्ष्ये खंडे तथोत्तरे ॥
वैवस्वतांतराख्यानं विस्तरेण यथातथम् ।
पूर्वमेव समुद्दिष्टं संक्षेपादिह कथ्यते ॥
भविष्याणां मनूनां च चरितं हि ततः परम्।
कल्पप्रलयनिर्देशः कालमानं ततः परम् ।
लोकाश्चतुर्दश ततः कथिता मानलक्षणैः ॥
वर्णनं नरकानां च विकर्माचरणैस्ततः ॥
मनोमयपुराख्यान लयः प्राकृतिकस्ततः ।
शैवस्याथ पुरस्यापि वर्णनं च ततः परम् ॥
त्रिविधाद्गुणसंबंधात् जंतूनां कीर्तिता गतिः ॥
अनिर्देश्याप्रतर्क्यस्य ब्रह्मणः परमात्मनः ।
अन्वयव्यतिरेकाभ्यां वर्णनं हि ततः परम् ।
इत्येष उपसंहारः पादो वृत्तः स चोत्तरः ॥
चतुष्पादं पुराणं ते ब्रह्मांडं समुदाहृतम् ।
अष्टादशमनौपम्यं सारात्सारतरं द्विज ॥

---

ब्रह्मांडं च चतुर्लक्षं पुराणत्वेन पठ्यते ।
तदेव चास्य गदितं अत्राऽष्टादशधा पृथक् ।
पाराशर्येण मुनिना सर्वेषामपि मानद ॥
वस्तु दृष्ट्वाथ तेनैव मुनीना भावितात्मनाम् ।

मत्वा श्रुत्वा पुराणानि लोकेभ्यः प्रचकाशिरे
मुनयो धर्मशीलास्ते दीनानुग्रहकारिणः ।
यथा वेदं पुराणं तु वसिष्ठाय पुरोदितम् ॥
तेन शक्तिसुतायोक्तं जातूकर्ण्याय तेन च ।
व्यासलब्धं ततश्चैतत् प्रभंजनमुखोद्गतम् ॥
प्रमाणीकृत( स्य ) लोकेऽस्मिन् प्रावर्तयदद्भुतम् ॥

या नारदपुराणाच्या अनुक्रमणिकेप्रमाणें पहातां हें चतुष्पाद पुराण म्हणजे हल्लीं ज्यास वायुपुराण म्हणतात तेंच होय असे दिसून येईल. हें चतुष्पादलक्षण संपूर्णपणें प्रचलित वायुपुराणास बरोबर लागू पडतें.या पुराणाच्या १६।१७।१८ अध्यायांत भाविष्यकल्पवृत्त बऱ्याच विस्तृत तऱ्हेनें सांगितलेलें आहे;इतकें सविस्तर ते कोठेंच सांगितलेलें नाहीं. या पुराणाच्या अ. ३३–५८ पर्यंत ब्रह्मांडाचा जसा व जितका विस्तृत भूगोल दिलेला आहे तसा दुसऱ्या कोठेंही नाहीं. यामुळें वायुपुराण म्हणून प्रचलित असलेलें चतुष्पाद पुराणच (उ. आनंदाश्रमप्रत, एशियाटिक सोसायटी प्रत ) ब्रह्मांडपुराण होय, असें पं. ज्वालाप्रसाद यांचें मत आहे. या ब्रह्मांड-पुराणाच्या पोथ्यांमधून कित्येक ठाईं "वायुप्रोक्तसंहितायां" असे लिहिलें असतें; पण वरील नारदीय पुराणांतील उताऱ्यांत हें ब्रह्मांडपुराण "प्रभंजनमुखोद्गतम्" आहे हें स्पष्ट म्हटलेलेंच आहे. एशियाटिक सोसाइटींत व आनंदाश्रमांत छापलेले वायुपुराण नसून ब्रह्मांडच आहे. हीं दोन्हीं चतुष्पादच आहेत. एशियाटिक सोसाइटीच्या प्रतींत म्हटलें आहे कीं:—( ८१--२ )

एवं द्वादशसाहस्रं पुराणं कवयो विदुः ।
यथा वेदश्चतुष्पादः चतुष्पादं तथा युगम् ॥

यथा युगं चतुष्पादं विधात्रा विहितं स्वयम् ।
चतुष्पादं पुराणं तु ब्रह्मणा विहितं पुरा ॥

* * *

प्रक्रिया प्रथमः पादः कथावस्तुपरिग्रहः ।
उपोद्घातोऽनुषंगश्च उपसंहार एव च ॥
धर्म्यं यशस्यमायुष्यं सर्वपापप्रणाशनम् ॥

पुढें श्लोकसंख्याही दिलेली आहे; ती अशीः—

| | |
|---|---|
| १ प्रक्रियापाद | ४८०० |
| २ अनुषंगपाद | ३६०० |
| ३ उपोद्घातपाद | २४०० |
| ४ उपसंहारपाद | १२०० |
| | १२००० |

राजेंद्रलालच्या आदर्शपोथींत (वायुपुराणाच्या) ही शेवटीं "इति महापुराणे वायुप्रोक्ते द्वादशसाहस्र्या संहितायां ब्रह्माख्यं समाप्तम् ॥" येथें 'ब्रह्माख्यं 'म्ह. 'ब्रह्मांडाख्यं ' असाच अर्थबोध होतोसें दिसतें. बहुतेक पुराणमतें ब्रह्मांडाची श्लोकसंख्या १२००० च आहे. तेव्हां हीं ( वरील दोन ) पुस्तकें वायुपुराणाचीं नसून ब्रह्मांडाचीं होत, हें कळून येईल.

वंगवासी प्रेसनें छापलेल्या शिवपुराणाच्या वायुसंहितेंत' वायुपुराणोक्त ' श्वेतकल्पाचा प्रसंग आहे; शिवाय, श्रीधरस्वामींनीं भागवतटीकेंत नैमिष शब्दावर टीका करितेवेळीं खालील श्लोक उतरून घेतलेला आहे:—

तथा च वायवीये ।

" एतन्मनोरमं चक्रं मया सृष्टं विसृज्यते ।
यत्रास्य शीर्यते नेमिः स देशस्तपसः शुभः ॥ "

सोसाइटीनें छापलेल्या वायुपुराणात हा श्लोक आढळत नसून याठाईं तो असा आढळतो:—

भ्रमतो धर्मचक्रस्य यत्र नेमिरशीर्यत ।
कर्मणा तेन विख्यातं नैमिषं मुनिपूजितम् ॥
( सोसाइटीचें ) वायु पु. २ अ. ७ श्लोक.

पण श्रीधरोध्दृत श्लोकच वंगवासी कार्यालयात प्रसिद्ध झालेल्या शिव-पुराणाच्या वायुसंहितेत जशाचा तसा आहे ( वायुसंहिता, पूर्वभाग, अ. २–८८ ). या कारणामुळें पं. ज्वालाप्रसाद याचें मत असें आहे कीं, शिवपुराणांतील वायुसंहिता हीच मत्स्योक्त वायुपुराण असून हल्लीं वायुपुराण म्हणून प्रसिद्ध झालेले ग्रंथ ब्रह्मांडपुराण आहेत!!

सोसाइटीच्या वायुपुराणावरोबर गयामाहात्म्य जे प्रसिद्ध केलें तें मात्र ब्रह्मांडाचा भाग नव्हे असें त्याचें मत आहे.

ब्रह्मांडपुराण इ० स० च्या पाचव्या शतकात यवद्वीपात नेलें गेलें होतें; अजून तेच ब्रह्मांडपुराण वालि ( बलि ) द्वीपात कविभाषेत भाषांतरित होऊन उपलब्ध आहे. प्रचलित ब्रह्मांडपुराणाशीं त्याची तुलना करून पाहिली तर असें आढळून येतें कीं, भविष्यराजवर्णनाशिवाय बाकीचे सर्व भाग प्रस्तुतच्या ब्रह्मांडासारखेच आहेत ! ! !

यावरून पाचव्या शतकानंतरच यात भविष्यराजवर्णन हिंदुस्थानात जोडण्यात आलें, वलिद्वीपात हें पुराण जाण्याच्या पूर्वी काहीं त्यात हें नव्हतें हें उघड होतें. यावरून यात ' भविष्यराजवर्णन ' आहे, असें म्हणणारी नारदसूची पाचव्या शतकानंतर त्या पुराणात हें प्रकरण घातल्या-नंतर तयार केली हेंही पण सिद्ध होत. म्हणजे या सूचीचा जो आम्ही ५००--६०० इ० स० हा काळ ठरविलेला आहे तो वरोबर ठरतो.

भविष्याचा भाग सोडून बाकीचा भाग सर्व इ० स०. ४०० इतका तरी सहज प्राचीन आहे ! ! !

इतकें जरी वर पं. ज्वालाप्रसाद याच्या मतें, प्रचलित वायूच ब्रह्मां-डाशीं ऐक्य आम्ही प्रदर्शित केलें, तरी हें ऐक्य कबूल करण्यात एक मोठी

गोम आड येते,--ती ही की, श्रीशंकराचार्यांनी ब्रह्मांडपुराणांतील कावषेयगीतेंतील उतारे घेतलेले आहेत ( विष्णुस.नाम व सनत्सुजातीयभाष्यें पहा ). ही कावषेयगीता पं. ज्वा. प्र. च्या ब्रह्मांडांत म्ह. प्रचलित वायुपुराणांत नाहीं. म्हणून हें वायुपुराण ( चतुष्पाद ) असून ब्रह्मांड हल्लीं लुप्त झालेलें आहे, असेच शेवटीं वाटते. नाहींपेक्षां, शंकराचार्योक्त कावषेयगीता ब्रह्मांडांत दाखवावी लागेल !

विल्सन यांस मिळालेल्या ब्रह्मांडपुराणाचा पूर्वार्ध*( तो मोठाच होता ) प्रचलित वायुपुराणच होता; पण दुसरा भाग म्ह. उत्तरार्ध मात्र वायुपुराणाचा कोणताही भाग नव्हता. या दुसऱ्या भागांतील मजकुराचा नारदोक्त ब्रह्मांडपुराणाशीं बिलकूल मेळ नाहीं! वायु व ब्रह्मांडपुराणाचा कांहीं तरी निकट संबंध दिसतो एवढें मात्र खरे ! ! ! मग प्रचलित वायु ब्रह्मांडच असो किंवा त्याचा पूर्वभाग असो ! मग, कावषेयगीता कशांत आहे !

---

## उपपुराणें.



सूतसंहितेंत त्याविषयीं खालील माहिती मिळतेः—

अन्यान्युपपुराणानि मुनिभिः कीर्तितानि तु ।
आद्यं सनत्कुमारेण प्रोक्तं वेदविदां वराः ॥
द्वितीयं नारसिंहाख्यं तृतीयं नांदमेव च ।
चतुर्थं शिवधर्माख्यं दौर्वासं पंचमं विदुः ।

---

* पूर्वार्धात १२४ अध्याय व उत्तरार्धात ७८ अध्याय होते; संख्या सुमारे १२२०० होती !

षष्ठं तु नारदीयाख्यं कापिलं सप्तमं विदुः ॥
अष्टमं मानवं ( वामनं ) प्रोक्तं ततश्चोशनसेरितम् ॥
ततो ब्रह्मांडसंज्ञं तु वारुणाख्यं ततः परम् ।
ततः कालीपुराणाख्यं विशिष्टं मुनिपुंगवाः ॥
ततो वासिष्ठलिंगाख्यं प्रोक्तं माहेश्वरं परम् ।
ततः सांबपुराणाख्यं ततः सौरं महाद्भुतम् ॥
पाराशरं ततः प्रोक्तं मारीचाख्यं ततः परम् ।
भार्गवाख्यं ततः प्रोक्तं सर्वधर्मार्थसाधकम् ॥

हे श्लोक माधवाचार्यांच्या वेळीं ( १४ वे शतकांत ) सूतसंहितेंत होते; व हेच श्लोक प्रस्थानभेदांत मधुसूदनसरस्वतींनीं उतरून घेतलेले आहेत. याही पूर्वींच्या मत्स्यपुराणाच्या ५३ व्या अध्यायांत उपपुराणांची माहिती येणेंप्रमाणें सांगितलेली आहे:—

उपभेदान्प्रवक्ष्यामि लोके ये संप्रतिष्ठिताः ।
पाद्मे पुराणे यत्रोक्तं नारसिंहोपवर्णनम् ।
तच्चाष्टादशसाहस्रं नारसिंहमिहोच्यते ॥ ५९ ॥
नंदाया यत्र माहात्म्यं कार्तिकेयेन वर्ण्यते ।
नंदीपुराणं तल्लोकैराख्यातमिति कीर्त्यते ॥ ६० ॥
यत्र सांबं पुरस्कृत्य भविष्येऽपि कथानकम् ।
प्रोच्यते तत्पुनर्लोके सांबमेतन्मुनीश्वराः ॥ ६१ ॥
पुरातनस्य कल्पस्य पुराणानि विदुर्बुधाः ।
धन्यं यशस्यमायुष्यं पुराणानामनुक्रमम् ॥ ६२ ॥

एवमादित्यसंज्ञा च तत्रैव परिगद्यते ।
अष्टादशभ्यस्तु पृथक् पुराणं यत्प्रदिश्यते ॥ ६३ ॥
विजानीध्वं द्विजश्रेष्ठास्तदेतेभ्यो विनिर्गतम् ॥

मत्स्यपुराणाच्या वेळीं उपपुराणांपैकीं फक्त **नारसिंहपुराण** ( पद्मांतर्गत ); **नंदीपुराण** ( स्कंदांतर्गत ? ); **सांबपुराण** ( भविष्यांतर्गत ) व **आदित्यपुराण** ( तेंच ) एवढींच उपपुराणें म्हणून माहीत होतीं; व तींही मुख्य पुराणांचे निवडक भाग म्हणून माहीत होतीं. ( इ० स० ४०० ) पुढें सूतसंहितेच्या वेळीं उपपुराणें इतकीं झालीं होतीं:—

१ सनत्कुमारपुराण, २ **नृसिंहपुराण**, ३ **नंदीपुराण**, ४ शिवधर्मपुराण, ५ दुर्वासपुराण, ६ नारदोपपुराण, ७ कपिलपुराण, ८मानवपुराण, ९ उशनसपुराण, १० ब्रह्मांडोपपुराण, ११ वारुणपुराण, १२ कालीपुराण, १३, वासिष्ठलिंगपुराण, १४ माहेश्वरपुराण, १५ **सांबपुराण**, १६ **सौरपुराण**, १७ पाराशरपुराण, १८ मारीचपुराण, १९ भार्गवपुराण.

हीं सर्व वेगळाल्या मुनींनीं लिहिलीं, अशी तेव्हां समजूत होती. देवीभागवतांत उपपुराणांचीं नांवें आलेलीं आहेत; त्यात शिवपुराण आलें तेंच शिवधर्म असावें; भार्गवपुराणाच्या ऐवजीं ' भागवत ' पुराण आहे; बाकीचीं १६ नांवें सारखींच आहेत. एकंदर १८ उपपुराणे दिलेलीं आहेत. एक ब्रह्मांडोपपुराण देवीभागवतात नाहीं. देवीपुराणानेंही सूतसंहितेप्रमाणेंच हीं पुराणें अनेक महात्म्यांनीं केलीं, असें म्हटलें आहे:—

एतान्युपपुराणानि कथितानि महात्मभिः ॥

या १८।१९ उपपुराणांशिवाय लोकांत अनेक उपपुराणें म्हणून प्रसिद्ध आहेत; तीं १४वे शतकानंतरचींच असलीं पाहिजेत हें उघड आहे.

१ आदिपुराण, २ मुद्गलपुराण, ३ गणेशपुराण, ४ देवीपुराण, ५ देवीभागवतपुराण इ०.

देवीभागवत इ. स. ११०० च्या सुमारास होतें, हें मागें दाखविलेलें आहे; यामुळें इ. स. ४०० ते ११०० च्या दरम्यान हीं उपपुराणें झालीं असावीत. उपपुराणांपैकीं आदिपुराण, आदित्यपुराण, कालिकापुराण, देवीपुराण, नंदीपुराण, नृसिंहपुराण, शिवधर्मोत्तर इतक्यांचा उल्लेख अपरार्कानें केलेला आहे. ( १२ वें शतक. ) तसेंच शंकराचार्यांनीं उपपुराणांपैकीं नृसिंहपुराणाचा उतारा घेतलेला आहे.



# पुरवणी.

—S:x.S—

पूर्वार्ध छापून झाल्यानंतर पुराणाविषयीं उपलब्ध झालेली माहिती एकत्र करून पुरवणीरूपानें येथें दिलेली आहे. ही माहिती पूर्वार्धांतच येणें जरूर असल्यामुळें ती पूर्वार्धासच जोडिली आहे.

( १ ) टीप, पृ. ४१. हरिवंशातील हरिवंशपर्वाचा प्रास्ताविक भाग बहुतेक ब्रह्मपुराणाच्या प्रास्ताविक भागाशीं सारखाच आहे. त्याचा तपशील असा:—

| हरिवंश(मुंबईप्रत, गणपत कृष्णाजीची.) | ब्रह्मपुराण, ( आनंदाश्रमप्रत ) |
|---|---|
| १–१–२० ते ४७ | १–३२ ते ५६ |
| १–२– १ ते ५७ | २– १ ते ५७ |
| १–३– १ ते १४० | ३– १ ते १२६ |
| १–४– १ ते ३८ | ४– १ ते २७ |
| १–५– १ ते ५६ | ४–२७ ते ८१ |
| १–६– १ ते ५४ | ४–८२ ते १२२ |
| १–७– १ ते ४९ | ५– १ ते ४५ |

वर दाखविलेले सुमारें ४१५ श्लोक हरिवंशात व ब्रह्मपुराणात सारखेच आढळतात. महाभारताच्या सद्यःस्वरूपकर्त्यास ब्रह्मपुराण माहीत होतें व त्यानें त्यातून इतर उतारेही भारतात घेतलेले आहेत हें पूर्वी दाखविलेंच आहे. ( पृ. ४०–४१ )

( २ ) मागे भागवताच्या उल्लेखांविषयीं बरेंच लिहिलेले आहे. ( पृ. ७६–८२ ). त्यानंतर, वैशंपायनाच्या नीतिशास्त्रावरील एका ग्रंथांत भागवताचा एक नवीन उल्लेख मिळाला. वैशंपायनाने पारिक्षित जनमेजयास हा ग्रंथ तक्षशिला नगरींत सांगितलेला आहे. प्रो. गस्टॅव्ह ऑपर्ट यांनीं या वैशंपायनाच्या नीतिग्रंथाची इ० स० १८८२ मध्यें एक प्रत काढिली आहे. या ग्रंथाचे नांव **नीतिप्रकाशिका** होय ! त्यांत लिहिलेले आहे कीं:—

धर्मशास्त्रपुराणानि ह्यपराण्हे समभ्यसेत् ।
संध्यां चोपास्य विधिवदग्निं हुत्वा समाहितः ॥ ९० ॥
भुक्त्वा, **भागवतं शास्त्रं** पठित्वा ध्यानसंयुतः ।
संविशेच्च यथाकालमुत्तिष्ठेद्विगतक्लमः ॥ ९१ ॥
एवं वृत्तस्य नृपतेर्नीतिमार्गानुसारिणः ।
धर्मार्थकाममोक्षाश्च सिध्येयुर्नात्र संशयः ९२ ॥

हा ग्रंथ वैशंपायनाचाच खुद्द असल्यामुळें त्या वेळीं भागवत प्रसिद्ध असल्याबद्दलचा हा निर्विवाद पुरावा मिळाला. गर्गाचार्यांच्या गर्गसंहितेत असाच भागवताचा उल्लेख आहे हें मागें लिहिलेलेंच आहे. ( पृ. ८२ )

( ३ ) स्कंदपुराणाच्या कुमारिकाखंडात, महाकालमाहात्म्यांत, करंधम-महाकालसंवादामध्यें खालील श्लोक आढळतात. हे श्लोक भारतेतिहाससंशोधकमंडळाचे चिटणीस रा. खंडेराव चिंतामण मेहेंदळे यांनीं मला दाखविले;

त्रिषु वर्षसहस्रेषु कलेर्यातेषु पार्थिव ।
त्रिं ( त्रि ) शते च दशन्यूने ह्यस्यां भुवि भविष्यति ॥१॥
शूद्रको नाम वीराणामधिपः सिद्धसत्तमः ।
( नृपान्सर्वान्पापरूपान् वर्धितान्यो हनिष्यति ॥ २ ॥ )

चर्चितायां ( ताम्वां ) समाराध्य लिप्सते भूभरापहः
ततस्त्रिषु सहस्रेषु दशाधिकशतत्रये ॥ ३ ॥
भविष्यन्नंदराज्यं च चाणक्यो यान्हनिष्यति ।
ततस्त्रिषु सहस्रेषु विंशत्या चाधिकेषु च ॥ ४ ॥
भविष्यो विक्रमादित्यो राज्यं सोऽत्र प्रलप्स्यते ।
ततः शतसहस्रेषु शतेनाप्यधिकेषु च ॥ ५ ॥
शको नाम भविष्यश्च योऽतिदारिद्र्यहारकः ॥

या श्लोकांचा इतिहासाला कितपत उपयोग आहे हें कळतेच आहे; तथापि पुराणांतून कसा मजकूर आढळतो याच्या मासल्याकरितां वरील उतारा येथें दिलेला आहे.

( ४ ) प्रचलित पुराणे व महाभारत यांच्या परस्परसंबंधाविषयीं प्रो. ई. डब्ल्यू. हॉपकिन्स् यांनीं आपल्या The great Epic of India(1902) या पुस्तकांत बरीच चर्चा केलेली आहे. ( पृ. ४७–५४ पहा. ) त्यांचे मत थोडक्यांत येथें उतरून घेतों:—

"Most of the extant puranas are in their present shape certainly later than the Epic. Never-the-less, before the great epic was completed, the eighteen puranas were known, since they are mentioned as a group ( 18-5-46 and 6-97. )

Further a Vâyapurana is mentioned in 3-191-16....... Taken altogether, the epic account seems to be an extended and exaggerated one of that in the Vâyu purana, but it is impossible to say whether it is really based on the extant text or not. The purânic version, however, does not seem to be taken from the epic account, and as the latter is expressly said to be from the Purâna, it is reasonable to suppose that the मार्कंडेयोपाख्यान ( Markandeya episode ) was inserted

into the epic after the Vayu Purana was written though this must remain only a supposition

Another long intrusion in the third book of the epic, this *time in the* तीर्थ *stories* ( *3-110 ff* ) *leads to a result* somewhat more definite in respect of the relation between the particular story and the पद्मपुराण According to the acute investigation of Dr Luders the epic account in its *present form* is based upon that of the Purana

Even the Garuda and Varaha Puranas may precede the final revision of the whole epic though the evidence for references is far from conclusive but on the other hand our present *Puranas may have been so changed as not to* agree in any detail with puranas that once bore these names The epic passages supposed to refer to Puranas are हरिवंश, *3-33-5* and भारत *1-31-3* The epic declaration *1-2-38b* that it is the base of all *Puranas* presupposeses a goodly number already in existence but this statement is as late an addition to the poem as is the mention of the eighteen I suppose that most scholars will accept eighteen Puranas as actually referring to eighteen and I am inclined to do so myself "

सारांश, प्रो हॉपकिन्स यांचेंही, आमच्याप्रमाणेंच असें मत आहे कीं, भारताच्या सद्य स्वरूपकर्त्यांसमोर अठराही पुराणांची मूळस्वरूप ( म्ह. अठराही आदिपुराणें ) होतीं ! व भारताच्या सद्य स्वरूपानतर या पुराणास सद्य स्वरूपें प्राप्त झालीं ! सारांश, कालानुक्रमानें पौराणिक वाङ्मय व भारत यांचा सबंध याप्रकारें दाखवितां येईल —

व्यासापूर्वीचें एक पुराण.

व्यासकृत अठरा पुराणसहिता ( आदिपुराणें )

व्यासकृत महाभारत.

महाभारताचें सद्य स्वरूप.

अठराही पुराणांचें सद्य स्वरूप

पुराणांत मतप्रसाराचे काळीं मजकूर जाडणें

# पुराणनिरीक्षण—उत्तरार्ध.

## प्रस्तावना.



या पुस्तकाच्या पूर्वार्धाविषयीं नव्या व जुन्या मताच्या लोकांत मतभेद होण्याचें कारणच नाहीं. उत्तरार्धांत मात्र मतभेद होण्यास जागा आहे सारा उत्तरार्ध चिकित्सक व शोधकबुद्धीनें लिहिलेला आहे. त्यांत पौरा णिक व इतर प्रमाणांवरून प्राचीन भरतखंडाचा इतिहास व कालगणना हीं ठरवून भारतीयांवर इतिहासशून्यतेचा जो अति मोठा आरोप आहे, तो घालवून टाकण्याचा यत्न केलेला आहे. त्याकरितां, पूर्वी पौराणिक कालगणना कशी होती, व ती युगमन्वंतरपद्धतीनें कशी ठरविता येते, हें दाखवून त्या पद्धतीप्रमाणें अनेक गोष्टींचे काळ दिलेले आहेत. भारतीय युद्ध, महानंद व चंद्रगुप्त यांचे प्रथम काळ ठरवून मग प्राचीन इति हासांतील राम, परशुराम, ययाति, मांधाता इत्यादि व्यक्तींचे काळ ठर विलेले आहेत. पुढें ह्या कल्पांतील मुख्य मुख्य राजांच्या हकीकतींचा व तत्कालीन इतिहासाचा विचार करून अनेक ऋषींचा व ग्रंथकारांचा काळ ठरविलेला आहे. भारतीय कालगणना व इतिहास यांची याप्रमाणें इ०पू० ३१०२ पासून संगति लाविल्यानंतर प्राचीन पौराणिक भूगोलाविषयीं थोडासा विचार रा. राजवाडे व मि. पिटर्कोर्ट यांच्यामतें केलेला आहे नंतर पूर्वकल्पांतील कांहीं गोष्टींविषयीं माझे विचार प्रकट केलेले आहेत

उत्तरार्धांतील ६ विषय जुन्या मताच्या लोकांत विस्मय उत्पन्न करणारे आहेत, किंबहुना त्यांच्या फार मोठ्या युगाच्या कल्पनांस जबरदस्त धक्का देणारेही आहेत, पण केवळ एवढ्यामुळें त्यांनीं या भागाचें वाचन सोडून देऊं नये स्वायंभुवमनूपासून चंद्रगुप्तापर्यंत दिलेल्या याद्या १५३–१५४ पृष्ठांवरच आहेत. प्रत्येक पिढीला २०–२२ वर्षें धरिलीं तरी ( चंद्र

युगापर्यंत ) ( १५३ × २० = ) ३०६० वर्षे सुमारें होतात. स्वायंभुवमनूपासून हल्लींचा कल्प सुरू होतो. इ० पू० ३१०१ हा जो काळ आपण कलीचा आरंभ म्हणून धरितों तो खरोखर कल्पाचा आरंभ आहे. भारतीय युद्धापासून चंद्रगुप्ताच्या वेळेपर्यंत ३४–३५ पिढ्या जर आहेत, तर त्यास २७०० वर्षांचा काळ दिला तर प्रत्येक पिढीस सुमारें ८० वर्षे पडतात, शिवाय, भारतीय युद्धापूर्वीच्या ११९–१२० पिढ्यांस याच हिशेबानें द्वापर, त्रेता व कृत या युगाची बेरीज मिळून ( ८६४००० + १२९६००० + १७२८००० = ) ३८८८००० वर्षे पडत असल्यामुळें प्रत्येक पिढीस $\left(\frac{३८८८०००}{१२०}=\right)$ ३२४०० वर्षे द्यावीं लागतात ! भारतीय युद्धानंतरच्या पिढ्यास कदाचित् कोणी एक वेळ ८० वर्षे कबूल करतील ! पण कृत, त्रेता व द्वापर या युगातील प्रत्येक पिढीस ३२४०० वर्षे देणें, हें मात्र जुन्या किंवा नव्या कोणत्याही मताच्या मंडळीस मान्य होणार नाहीं, असें मला वाटतें ! मूळची युगमन्वंतरपद्धति फार साधी असावी, असें मला तरी या पुस्तकांत गोळा केलेल्या प्रमाणावरुन वाटतें, कोणत्याही स्थितींत, व वेदात दर्गात जर १०० वर्षांच्यावर मनुष्याचें आयुष्य सांगितलेलें नाहीं, तर उगाच अवाढव्य युगास चिकटून रसण्यात मतलब काय ! दशरथ ६०००० वर्षे राज्य करीत होता, रामानं ११००० वर्षे राज्य केलें, विश्वामित्रान १० हजार वर्षे तप केलें, रामराज्याचे वेळीं ब्राह्मणाचा मुलगा मेला तो ५ हजार वर्षांचा होता, यातील सर्व ' हजार ' निरर्थक आहेत, असें मला तरी वाटतें. याचें कारण असें की, पद्मपुराणांत उत्तरकांडातील कथा आलेली आहे तेथें, रामराज्याच्या वेळीं जो मुलगा मेला, त्याचें वय पांच ( ५ ) वर्षांचें होतें, असें स्पष्ट दिलेलें आहे, आनंदरामायणांत पूर्वकाळच्या युगाचा

किंवा वर्षाला १००० नें गुणिलेलें आहे, किंवा पूर्वीचें वर्ष १००० वर्षांचें होतें, असा स्पष्ट उल्लेख आहे, तसेंच, अश्वघोषाच्या बुद्धचरितात विश्वामित्रान १० वर्षें तप केलेल्याचा स्पष्ट उल्लेख आहे, तसच, राम राज्यारूढ होताच कांहीं काळानें रजकाच्या आरोपावरून सीता वनात सोडून देण्यात आली, तव्हा ती ५—६ महिन्याची गरोदर होती, पुढें रामाचा अश्वमेधयज्ञ चालल्या वेळीं लवकुश आले, तेव्हा त्याच वय १२ वर्षांवर थोडसें झालेलें होतें, यावरून मध्यतरीं रामानें ११ वषच राज्य केलेलें असावें, असें स्पष्ट म्हणावें लागतें, नाहीं तर ११ हजार वष सातेच्या उदरीं गर्भ राहून होता, हा तरी सिद्धात काढावा लागेल ! साराश, वरील सर्व गोष्टींत त्या त्या सख्यास १००० नीं गुणिलेलें स्पष्ट आढळत असल्यामुळें, दशरथही रामजन्माचे वेळीं ६० हजार वर्षांचा नसून ६० वर्षांचा होता, असच मानणें जरूर पडतें, व तो तेव्हा वृद्ध झालेला होता, या वर्णनास हें जुळतेंही पुढच्या पौराणिकानीं अतिशयोक्तीनें युगें वाढविलीं, व त्यामुळें पौराणिक कालगणनापद्धति इतकी लोपून गेली कीं, पुढें तिचा मागमूस दखील राहिला नाहीं इ० पू० ३०० च्या सुमाराच्या मेगॅस्थीनीसच्या वेळेस ही मोठ्या युगाची कल्पना नव्हता, इ० पू० पहिल्या शतकातील अश्वघोषाच्या वेळीं नव्हती, गर्गाच्या वेळीं नव्हती, व आर्यभटापर्यंतही ही कल्पना नसावी, अशी माझी समजूत आह, पण भ्रमानें ४०००, ३०००, २००० व १००० वर्षांचीं कृत, त्रेता, द्वापर व कलि हीं युगें मात्र संधि व सध्यतर यासह भारताच्या सर्व स्वरूपपाळीं आढळतात. या पद्धतीप्रमाणेंही स्वायंभुवमनूपासून भारतीय युद्धापर्यंतच्या १२० पिढ्यास ( ४८०० + ३६०० + २४ ० = ) १०८०० वर्षें येतात, यानें दरपिढीस ९० वर्षें पडतात. पिढ्यांचें मा न अगें आहे कीं, कोणत्याही देशाच्या इतिहासावरून पाहिल तरी प्रत्येक

पिढीस ९०–८० इतकीं वर्षे केव्हांही देतां येत नाहींत; फक्त २०–२२ वर्षेच देतां येतात. तेव्हां संभाव्यतेच्या दृष्टीनें ४८००, ३६००,२४०० व १२०० या मानवी वर्षांचीं युगें देखील ऐतिहासिक दृष्ट्या ग्राह्य करितां येत नाहींत, असें काहीं पाश्चात्य व काहीं पौर्वात्य विद्वानांचेंही मत आहे. अशा प्रकारच्या युगाच्या भिन्नभिन्न अवाढव्य व्यासिमधून सुव्यवस्थित साध्या युगाकडे व युगमन्वंतरपद्धतीकडे मी कशी वाट काढिली, पूर्वी चार वर्षांचें चतुर्युग मानवी कालगणनेस कसें घेत असत, भारतीय युद्ध ज्या द्वापरांतीं झालें, तें द्वापर २००० वर्षांचें नसून या ४ वर्षांच्या चौकडींतील तिसरें वर्ष कसे होतें, पुढें त्या द्वापरापुढीलच कलियुग ऊर्फ कलिवर्ष याच्या अंतीं परिक्षित् जन्मला हें गर्गांचें वाक्य कसें बरोबर आहे, हें सारें मी या उत्तरार्धांत दाखविलेलें आहे.

युगाच्या व कालगणनेच्या सर्व अतिशयोक्तीच्या पद्धतींचें समालोचन करून, शेवटीं निराशेनें The Historians' History of the World या ग्रंथमालेचे कर्ते इ० स० १९०८ सालीं लिहितात कीं:—

"Ancient India has no history proper Its books furnish no documents on its past chronology, and its monuments cannot supply the place of books, since the oldest are scarcely three centuries anterior to our era But for a small number of religious books,* in which the historical facts are embedded under masses of legends, the past of India would be as unknown as that of that lost Atlantis, which was destroyed by a geological cataclysm and whose story is related in the ancient traditions preserved by Plato" Vol II. P. 495

भारतीय इतिहास व कालगणना यावरील दूषण थोडें तरी घालवून, त्याच्या स्पष्टीकरणावर नवा प्रकाश पाडावा, एवढ्याकरितां हा उत्तरार्ध

* हे ग्रंथ म्हणजे पुराणेच होत.

या पुस्तकास जोडलेला आहे. या पुस्तकापासून, साधारण वाचकांस पुष्कळ नवी माहिती व पुराणशोधकांस विचार करण्यास नव्या गोष्टी मिळून, भारतीय इतिहास व कालगणना यांची चर्चा मजहून अधिक *विद्वान् लोकांकडूनही होऊं लागली म्हणजे माझी अल्पशी कामगिरी* संपली असें मी समजतों.

या उत्तरार्धांत पौराणिक कालगणना, पौराणिक इतिहास, पौराणिक भूगोल व पूर्वकल्पाचा इतिहास अशीं चार प्रकरणे आहेत.

पौराणिक कालगणनेविषयीं वर लिहिलेलेंच आहे. पौराणिक कालगणनेच्या धोरणानेंच पौराणिक इतिहासाचा उलगडा चौथ्या प्रकरणांत केलेला आहे. त्यांत इक्ष्वाकूपासून, निमीपासून व बुधापासून अनुक्रमें सूर्यवंश, जनकवंश व चंद्रवंश हे कसे सुरू झाले, व ते भारतीय युद्धापर्यंत व पुढेंही गौतमबुद्ध, महानंद व चंद्रगुप्त यांचे वेळेपर्यंत कसे चालू होते, हें दाखविलेलें आहे. कालगणनेशिवाय इतिहास अंधळा असल्यामुळें तिसऱ्या प्रकरणांत इतक्या परिश्रमानें प्रथम पौराणिक कालगणनापद्धति ठरवावी लागली आहे. मग तिच्या प्रकाशानें भारतीय इतिहास इ० पू० २६०० किंबहुना इ० पू० ३१०२ पर्यंत संगतवारपणें नेलेला आहे. नंतर पांचव्या प्रकरणांत पौराणिक भूगोलाचा थोडासा विचार करून, सहाव्या प्रकरणांत पूर्वकल्पांतील गोष्टींवर ओझरता प्रकाश पाडण्याचा यत्न केलेला आहे.

ग्रंथकर्ता.

## पौराणिक कालगणनेवर पंडितांचे अभिप्राय.

"As to the *Grecian reference to 6451 years*, I do not know what modern Western scholars have to say. As you say, it appears that the Aryans *counted about* 2000 years before they began their गवामयनं (*Vedic Era*) in 3102 B. C. Those 2000 years seem to be a blank period, now, since no historical facts worth-mentioning have been narrated for that period. Hence, I am for leaving it out as a pre-historic period, dark and void. There may be a few hymns of that period as you say; that is all that can be said of that period.

"As to the *historic period, beginning with* 3102 B. C., we have plenty of materials in the Puranas, to construct a reliable history Inspite of the doubts of Western scholars about the starting point, I take it to commence in 3102 B. C and I hope *to find out some corroborating* evidence of the fact. If that is done, the history of India may be said *to have taken its shape.*

"Unless Western scholars who have devoted so much time *to the* study *of Indian History* and the Vedas, accept our Chronology, we cannot proceed further; for among ourselves, *scholars do not* come forward with any reliable theory and adhere to it Most of us are still plunged into superstitious and *irrational* chronological theories.

"You are *the only scholar that* has *taken the rational* system of Chronology and are troubling yourself about developing it *Complete it and you will be rewarded with* the thanks of the posterity."

'As to your exaplanation of the Puranic figures about the years from the Mahabharat War to Nanda, I entirely agree with you in holding that the Puranas have undergone various redactions and that the authors did not rightly understand what they said about traditional chronological figures Your explanation about the various redactions of Puranas seems to me very satisfactory, and you may publish all this in a book-form and invite the opinions of scholars upon it "

"Your attempt to fix the Chronology of Puranic Kings in the light of my theory of the Gavam Ayana is very interesting and more than satisfactory."

"The points of chronology of the Buddhist Period are tolerably correct and you deserve to be congratulated on the success you have achieved in gleaning the evidence from the three available sources (Puranic, Buddhistic and Jain) of Indian history. The dates you assign are a little different from those which Mr Vincent A Smith has assigned to the kings in his *Early History of India.*"

"It is however, essential, that scholars of your type should endeavour to bring out a chronological history of India as early as possible *Yours is the first attempt in this field.*'

"Your calculations in the Essay on *Puranic Chronology* seem to be sound Your view on the different redactions of the Puranas seems also to be sound and tenable Please publish your essay in full in Marathi or English and invite the opinion of the learned public in that part of the country.'

पं. रुद्रपट्टण शामशास्त्री, बी. ए. लैब्रेरियन, गव्हर्नमेंट ओरिएंटल लैब्ररी, व 'गवामयनं' पुस्तकाचे कर्ते, म्हैसूर.

" तुम्हीं लिहिलेले लेख—मराठी व इंग्रजी समग्र वाचले. एकदर लेखांतील तुम्हीं मिळविलेली माहिती महत्त्वाची असून, त्यावरून तुम्हीं जीं कित्येक अनुमानें काढिलीं आहेत तीं बरोबर आहेत, परंतु भारतीय युद्धाचा तुम्हीं ठरविलेला काळ माझ्या मतें बरोबर नाहीं. याचें मुख्य कारण असें कीं, तुम्ही पौराणिक दंतकथांवर पूर्ण विश्वास ठेवितां हें होय. पौराणिक दंतकथा—निदान प्राचीन काळच्या संबंधानें तरी अगदीं अविश्वनीय आहेत, असें सप्रमाण सिद्ध करिता येईल. याशिवाय, भारतीय युद्धाचा काळ इ. पू. १२६३ घेतल्यानें इतर किती घोटाळे उत्पन्न होतात याची तुम्हास कल्पना नाहीं. तुमचे लेख समग्र छापले जाऊन एकत्र करिता येतील तर त्यापासून बराच फायदा होईल. तुमच्या लेखास सप्रमाण उत्तर देण्याची माझी इच्छा आहे*. "

रा. ब. चिंतामण विनायक वैद्य.

( ' महाभारत ' व ' रामायण ' यावर इंग्रजी ग्रंथ लिहिणारे. )

*प्राचीन पौराणिक परंपरा कशा विश्वसनीय आहेत व अर्वाचीन पौराणिक परंपरा कशा अग्राह्य आहेत, हें या पुस्तकांत मीं सविस्तरपणें दाखविलेलें आहे, असें मला वाटतें मीं तरी सर्वच पौराणिक परंपरा विश्वसनीय कोठें मानलों? तसेंच, भिन्न भिन्न काळच्या पौराणिकांत काय काय समज होते व ते तसे समज त्यानीं कसकसे करून घेतले, व या एकंदर समजांत सर्वांत प्राचीन ऐतिहासिक समज कोणती, हेंही मीं दाखविलें आहे.

(ग्रंथकर्ता.)

———

# प्रकरण ३ रें.

## पौराणिक कालगणना.

### भारतीय युद्धाचा काळ.

मी गेल्या ४।५ वर्षांपासून पौराणिक कालगणनेविषयीं विचार करीत आहें. मद्रासेकडील प्रो. रंगाचार्य याचा युगांवरील निबंध व रा. आय्यर यांचें The Chronology of Ancient India हें पुस्तक वाचून भारतीय युद्धाचा काळ व एकंदर पौराणिक गोष्टींचा काळ कांहीं तरी स्पष्ट रीत्या ठरविणें शक्य आहे, असें मला वाटूं लागलें. त्यानंतर मन्वंतरें व युगें यांचा मला उलगडा झाला; पण अद्यापि पूर्णपणे पौराणिक कालगणनेचा उलगडा अर्वाचीन काळापर्यंत झालेला नव्हता; एतदर्थ हा विषय लिहून काढण्याची गडबड केली नव्हती. अलीकडे——माझी मन्वंतराची कल्पना परिणत होत असतेवेळींच——म्हैसूरचे पंडित शामशास्त्री यांचें 'गवामयनं' या नावाचें पुस्तक प्रसिद्ध झालें; त्यांत त्यांनीं असें प्रतिपादन केलेलें आहे कीं, मनूपासून भारतीय युद्धापर्यंत वैदिक ऋषींनीं एक कालगणना चालू ठेविली होती व ती भारतीय युद्धामुळें पुढें बुडून गेली; यावरून मला जास्तच उमेद आली व आपल्या लोकांना कालगणनेची ( Chronology ) कल्पना होती, हें जें माझें पौराणिक ग्रंथ वाचून मत झालेलें होतें, त्यास दुजोरा मिळाला. अलीकडे वैदिक व पौराणिक ऋषींप्रमाणेंच, अर्वाचीन लेखकास देखील कालगणनेची थोडी-बहुत कल्पना होती, असें आढळून आलेलें आहे. या सर्व कल्पना माझे मनात कशा परिणत होत गेल्या, याची सविस्तर हकीकत आतां लिहून ठेवण्याची वेळ आलेली आहे, असें मला वाटूं लागलें. याकरितां मी हीं

प्रकरणें लिहीत आहें. प्रथम मी वैदिक ऋषि, पौराणिक ऋषि व अर्वाचीन लेखक या शब्दांनी काय समजतों, हें मला स्पष्टपणें सांगितलें पाहिजे. वैदिक ऋषि या शब्दानें मी वैवस्वतमनूच्या काळापासून भारतीय युद्धापर्यंतच्या सर्व ऋषींचा समावेश करितों. पौराणिक ऋषि म्हणजे भारतीय युद्धापासून क्षत्रियकुळाचा अंत होऊन नंदाचें साम्राज्य सुरू होईपर्यंतच्या दरम्यानच्या काळातील ऋषि होत. तेथून पुढील लेखकांस मी अर्वाचीन लेखकात गणतों. या तिन्ही प्रकारच्या लोकाना कालगणनेची कल्पना होती, हेंच मला या लेखमालिकेंत दाखवावयाचें आहे.

भारतीय प्राचीन इतिहासात ज्याचा काळ थोडाबहुत ठरलेला आहे, तो राजा म्हणजे चंद्रगुप्त होय. याचा काळ इ० पू० ३१२ ते ३२५ पर्यंत युरोपीय लोक समजतात. तेव्हा याचा काळ तूर्त युरोपीय लोकांच्या मताप्रमाणेंच धरून त्यामागील कालासंबंधानें विवेचन करूं. भारतीय युद्धापासून चंद्रगुप्तापर्यंत किती वर्षे झालीं, या प्रश्नाचा आपण पौराणिक ग्रंथाच्या आधारें विचार करूं. चंद्रगुप्तापासून पुढील इतिहास बौद्ध व जैन ग्रंथादिकाच्या आधारेंही ठरविता येतो व पुढें ठरवूं; इतकेंच नव्हे, तर चंद्रगुप्ताचा राज्याभिषेककाळही नक्की ठरविता येतो. त्याचीं प्रमाणें बौद्ध व जैन ग्रंथावरून घ्यावयाचीं असल्यामुळें तीं नंतर देऊन चंद्रगुप्तापर्यंत किती वर्षे झालीं, याबद्दल पौराणिकाचें काय मत आहे हें पाहूं.

वायु, मत्स्य, विष्णु व भागवत या चार पुराणामध्यें भविष्यत्कालच्या राजाविषयीं माहिती मिळते; त्यात सर्वात प्राचीनपरंपरा डॉ. भांडारकर यानीं आपल्या दक्षिणच्या इतिहासांत ठरविल्याप्रमाणें वायुपुराणात मिळते. भविष्यत्कालच्या राजाची माहिती इतर पुराणानीं वायुपुराणावरूनच घेतली असें मानण्यास बळकट प्रमाणें आहेत. वायु, मत्स्य, विष्णु व भागवत यांचा भविष्याच्या भागाबद्दल काळाचा अनुक्रम आहे; म्हणजे

वायुपुराणांतील भविष्य सर्वांत प्राचीनतम असून बाकीच्या पुराणांचें क्रमानें अर्वाचीनतर आहे; एवढ्या प्रस्तावनेवरून वाचकांच्या लक्षांत येईलच कीं, पुढील विवेचनांत वायुपुराणालाच महत्त्व दिलेलें आहे; व बाकीच्या पुराणांचा पुरावा अनुषंगानें घेतलेला आहे.

वायुपुराण ( आनंदाश्रमप्रत, अ. ९९ व कलकत्ताप्रत, अ. ३७ ) मध्ये लिहिलेलें आहे कीं,

> महादेवाभिषेकात्तु जन्म यावत्परीक्षितः ।
> एतद्वर्ष-( एकवर्षं ) सहस्रं तु, ज्ञेयं पंचाशदुत्तरम् ॥

दुसऱ्या ओळीचे एतद्वर्ष० एकं वर्ष० व एकवर्ष० असे तीन पाठभेद आहेत. या श्लोकाचा अर्थ असा–

महादेवाच्या अभिषेकापासून परीक्षितीच्या जन्मापर्यंत १००० ( किंवा १००१ ) वर्षें झालीं व तीं ५० नीं अधिक होतीं. (It was 1000 years less by fifty ) Wilson's विष्णुपुराण, BK IV, 25, P. 230. पहिल्या ओळीच्या अर्थाबद्दल मतभेद असणें शक्यच नाहीं; दुसऱ्या ओळीच्या अर्थाबद्दलच तो आहे. तो असाः–

( १ ) " हीं १०५० वर्षें होतात, " असा एक अर्थ आहे.

( २ ) " हीं १००० वर्षें होतात, पण त्यांत ५० वर्षें अधिक आहेत," म्हणजे ९५० वर्षेंच होतात, असा दुसरा अर्थ आहे.

( ३ ) तिसरा अर्थ दुसऱ्यास धरूनच आहे. फक्त पाठभेद ' एकवर्ष सहस्र ' असा घेऊन ते, " हीं १००१ वर्षें होतात, पण त्यांत ५० वर्षें अधिक आहेत, " असा अर्थ करितात; व त्याप्रमाणें त्यांच्या मतें हा अवकाश ९५१ वर्षांचा होतो.

विल्सनसाहेबांनीं दुसऱ्या व तिसऱ्या तऱ्हेचाच अर्थ घेतलेला आहे. ' एक हजार पन्नास ' असा अर्थ न घेतां, ' एक हजार पण ते पन्ना-

सांनी अधिक, म्हणजे ९५०, ' असा अर्थ ते घेतात. या श्लोकाच्या विपरीत अर्थज्ञानानेंच मत्स्य, विष्णु व भागवत पुराणांनीं पुढें घोटाळे माजविले हें पुढील विवेचनावरून कळून येईलच. ' एकशत ' म्ह. १०१, अष्टशत म्ह. १०८ अशा अर्थी संस्कृतमध्यें पतंजलीनें व आर्यभट्टानें शब्द वापरलेले आहेत. उदाहरणार्थः—

यजुर्वेदस्य एकशत–शाला भवंति ( महाभाष्य ) तसेंच आर्यभट्टाच्या ' आर्याष्टशता ' मध्यें ८०० आर्या नसून १०८ च आर्या आहेत. यावरून ' एकसहस्रं ' असा पाठ असेल त्या वेळीं १००१ ' एक हजार एक ' असा अर्थ करण्यास मुळींच हरकत पडणार नाहीं, असें मला वाटतें. आतां उत्तरपदाविषयीं विचार करूं. त्यांत दोन पक्ष असलेले सांगितलेलेच आहेत. कोणी ' एक हजार पन्नास ' असा अर्थ करितात व कोणी ' एकहजार पण ते पन्नासांनीं अधिक म्हणजे ९५० ' असा अर्थ करितात.

या वायुपुराणांतील श्लोकावरून आपणांस ही गोष्ट कळून येते कीं, महादेवाच्या अभिषेकापासून ( मार्गे ) परीक्षितीच्या जन्मापर्यंत १०५०, ९५० किंवा ९५१ वर्षें झालीं ! ( आपण जो अर्थ घेऊं त्याप्रमाणें. ) आतां यांतील कोणता अर्थ बरोबर असावा, व वायुपुराणकर्त्यांनीं किती वर्षें नक्की धरिलीं असावींत हेंच आपणांस पाहिलें पाहिजे; व हें ठरविणेंच अत्यंत महत्त्वाचें आहे.

वायुपुराणकर्त्यांला अशी कोणती परंपरा माहीत होती कीं, जिच्यायोगानें ते आपणांस–परीक्षिताच्या जन्मापासून महादेवाच्या अभिषेकापर्यंत १०५०, ९५० किंवा ९५१ वर्षें झालीं, असें सांगूं शकतात ? या प्रश्नाचा आपण जरूर शोध केला पाहिजे. शिवाय, वायुपुराणकार ' महादेव ' पदानें कोणत्या राजाचें ग्रहण करितात हेंही ठरविलें पाहिजे. हें ठरवि-

ण्यापूर्वी आपण या महत्त्वाच्या श्लोकाचे इतर पुराणांनी कसे अर्थ केलेले आहेत तें पाहूं.

मत्स्यपुराणांत हा श्लोक असा आहे:—

महापद्माभिषेकात्तु यावज्जन्म परीक्षितः ।
एकवर्षसहस्रं तु ज्ञेयं पंचाशदुत्तरम् ॥
अ. २७३–३५.

येथेंही दुसऱ्या ओळीचे ' एतद्वर्ष०, ' ' एकवर्ष ' व ' एकं वर्ष ' असे पाठभेद आहेत. यांत वायुपुराण व मत्स्यपुराण यांचा द्वितीय श्लोकार्ध सारखाच आहे व त्याचे पाठभेदही सारखेच आहेत. प्रथमार्धावरून असें दिसतें कीं, वायुपुराणातील ' महादेव ' म्हणजे ' महापद्म नंद ' असा मत्स्यपुराणानें अर्थ केला.

पण हा अर्थ कितपत बरोबर आहे हें पुढें कळेलच. तूर्त आपण विष्णु व भागवतपुराणांचे वरील श्लोकांचे अर्थ पाहूं:—

विष्णुपुराण लिहितें कीं:—

यावत्परीक्षितो जन्म यावन्नंदाभिषेचनम् ।
एतद्वर्षसहस्रन्तु ज्ञेयं पंचदशोत्तरम् ॥ ४–२४

येथें परीक्षिताच्या जन्मापासून नंदाच्या अभिषेकापर्यंत १००० वर्षें अधिक १५ झालीं असें म्हटलें आहे, मत्स्यपुराणानें ' महादेव ' शब्दानें जो ' महापद्मनंदा ' चा अर्थ घेतला तोच विष्णुपुराणानें कायम केला; द्वितीयार्धांत मात्र ' ज्ञेयं पंचाशदुत्तरम् ' या पाठाच्या ठिकाणीं ' ज्ञेयं पंचदशोत्तरं ' असा तेथें पाठभेद आढळतो. पण हा लेखकप्रमाद असावा असें वाटतें. कारण वायु व मत्स्य यांतून ' ज्ञेयं पंचाशदुत्तरं ' असे स्पष्ट पाठभेद आहेत. तेव्हां विष्णुपुराणाला ' पंचदशोत्तरं ' अशी स्वतंत्र परंपरा असेल असें वाटत नाहीं. हा फक्त कालांतराचा लेखकप्रमाद असावा.

येथेंही एतद्वर्षं, एकवर्षं, व एकं वर्षं असे दुसऱ्या चरणात पाठभेद आहेतच. असो. आता भागवतपुराण काय म्हणते तें पाहू. तें म्हणतें:—

आरभ्य भवतो जन्म यावन्नंदाभिषेचनम् ।
एतद्वर्षसहस्रं तु शतं पंचदशोत्तरम् ॥ १२-२

येथें परीक्षितीला पुराण सांगत असल्यामुळें ' तुझ्या जन्मापासून नंदा भिषेकापर्यंत ' असें म्हटलें आहे. यात ' ज्ञेयं ' बद्दल ' शतं ' पद आहे, पण हाही लेखकप्रमादच दिसतो. कारण १०५० किंवा १०१५ यापेक्षा अधिक वर्षे मागच्या तिन्ही पुराणांनीं सांगितलीं नाहींत. शिवाय, विष्णूनें तर सप्तर्षींच्या भार्षेत या वर्षांचीं भाषांतरें करून मघात पूर्वी सप्तर्षि होते, ते नंदाभिषेकाच्या वेळीं पूर्वाषाढा नक्षत्रात येतील, म्हणजे १० नक्षत्राचीं १००० वर्षे होतील; वर ५०।१५ झालीं तरी ११०० कांहीं होणार नाहींत असें सुचविलेलें आहे. यावरून भागवताचा १११५ वर्षांचा 'शतं हा पाठ मूळचा नव्हे हें सिद्ध होतें. मूळचीं वर्षे १००० वर व ११०० च्या पेक्षा कमी असलीं पाहिजेत, असा विष्णुपुराणकर्त्यांनीं अर्थ केल्याचें स्पष्ट दिसतें. मत्स्यपुराणकर्त्यांनीं वायुपुराणातील वरील श्लोकार्धाच्या उत्त रार्धाचा कसा अर्थ घेतला होता हें कळण्यास मार्ग नाहीं. कारण त्यानीं सप्तर्षींच्या भार्षेत त्याचें ( वर्षांचें ) भाषांतर दिलेलें नाहीं. सारांश, वरील सर्व विवेचनावरून एक गोष्ट आपल्या लक्षात येईल, वायुपुराणातील वरील श्लोकच पुढील पुराणातील श्लोकाना व अर्थांना आधारभूत आहे. तेव्हा वायुपुराणकर्त्यांना हा श्लोक लिहिण्याला व हीं वर्षे सांगण्याला काय आधार होता हेंच आपणास पाहिलें पाहिजे. या दृष्टीनें आजपर्यंत या श्लोकाचें कोणीं अवलोकन केलेलें नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट होय. तथापि हा आधार वायुपुराणकर्त्यानें स्पष्टपणें देऊन ठेविलेला आहे. हा आधार मात्र पुढील एकही पुराणानें घेतलेला नाहीं. यावरूनच वायुपुरा-

तील भविष्यद्भागाची प्राचीनता सिद्ध होते. वायुपुराणाच्या निमित्तानें तरी प्राचीन पौराणिकांची परंपरा अर्वाचीन लेखकांनीं दाखविली हें आमचें महद्भाग्य होय. ती परंपरा अशीः—

महादेवाभिषेकात्तु जन्म यावत्परीक्षितः ।
एकवर्षसहस्रं तु ज्ञेयं पंचाशदुत्तरम् ॥ अ. ३०-४०९
प्रमाणं वै तथा चोक्तं महापद्मांतरं च यत् ।
अंतरं तच्छतान्यष्टौ षट्त्रिंशच्च समाः स्मृताः ॥ ४१० ॥
एतत्कालांतरं भाव्या आंध्रांता ये प्रकीर्तिताः ।
भविष्यैश्च संख्याताः पुराणज्ञैः श्रुतर्षिभिः ॥ ४११ ॥
सप्तर्षयस्तदा प्राहुः प्रतीपे राज्ञि वै शतं ।
सप्तविंशैः शतैर्भाव्या आंध्रान्तास्ते तदा पुनः ॥ ४१२ ॥
सप्तर्षयो मघायुक्ताः काले पारीक्षिते शतं ( भवन् ) ॥
आंध्रांते सचतुर्विंशे भविष्यंति मते मम ॥ ४१७ ॥

वायुपु. कलकत्ता प्रत, अ. ३७.

अशाच सारखें वर्णन थोडेंबहुत मत्स्यपुराणांत आहे. तेंही येथें ऐतिहासिकांसाठीं उतरून घेतोंः—

महापद्माभिषेकात्तु यावज्जन्म परीक्षितः ।
एतद्वर्षसहस्रं तु ज्ञेयं पंचाशदुत्तरम् ॥ ३५ ॥
पौलोम्नस्तु तथांध्रास्तु महापद्मांतरं पुनः ।
अनंतरं शतान्यष्टौ षट्त्रिंशत्तु समास्तथा ॥ ३६ ॥
तावत्कालांतरं भाव्यं आंध्रांतादापरीक्षितः ।
भविष्ये ते प्रसंख्याताः पुराणज्ञैः श्रुतर्षिभिः ॥ ३७ ॥

सप्तर्षयो मघायुक्ताः काले पारीक्षिते शत ।
आंध्रांशास्तु चतुर्विंशा भविष्यंति शतं समाः ॥

मत्स्य पु. २७३.

*वायुपुराणातून उतरून घेतलेल्या भागाचें भाषांतर माझ्या मतें* असे आहे.—

" महादेवाच्या अभिषेकापासून परीक्षितीच्या जन्मापर्यंत १००१ वर्षे झालीं, पण त्यात पन्नास वर्षे अधिक झालीं, ( म्ह० ९५१ वर्षे झालीं. ) *यास प्रमाण असें कीं, ( परीक्षितीच्या अभिषेकापासून )* महापद्मापर्यंत ८३६ वर्षे झालीं असे मानतात. इतकाच काळ (महापद्मापासून) आंध्राच्या अंतापर्यंत झाला, असें भविष्य जाणणारे, पुराण जाणणारे व श्रुतींत निपुण असे ऋषि म्हणतात. प्रतीप राजाच्या वेळीं सप्तर्षि जे होते तेव्हापासून आंध्राच्या अंतापर्यंत २७ वे नक्षत्रात येतील ( म्हणून २७०० वे वर्षात येतील ). परीक्षितीच्या काळीं सप्तर्षि मघात होते आंध्राच्या अखेरीस २४ व्या नक्षत्रीं येतील असें माझें मत आहे.

मत्स्यपुराणातील भागाचें भाषांतर असें —

" *महापद्माच्या अभिषेकापासून परीक्षितीच्या जन्मापर्यंत* ९५०।५१ वर्षे झालीं. पौलोमा नावाचा जो ( शेवटचा ) आंध्र राजा त्यापासून महापद्मापर्यंत ८३६ वर्षे झालीं. तसेंच, आंध्रांतापासून (?) परीक्षितीच्या वेळेपर्यंत आणखी तितकींच वर्षे गेलीं, असे पुराणें जाणणाऱ्या व श्रुतींत निपुण अशा ऋषींनीं भविष्यात सांगितलेलें आहे. परीक्षितीच्या काळीं सप्तर्षि मघानक्षत्रीं होते, ते आंध्रांश ( सप्तर्षि ) ( आंध्राच्या अंताच्या वेळीं ) २४ व्या नक्षत्रीं असतील. "

*वरील दोन्ही उतारे महत्त्वाचे आहेत दोन्ही पुराणाच्या मते परीक्षिती-* ( च्या अभिषेका ) पासून महापद्मापर्यंत ८३६ वर्षे व तसेंच, महापद्मा-

पुराणात या परंपराचा घोटाळा व विसंगतपणा आहे. फक्त वायुपुराणात मात्र या परंपरेपासून काय सिद्धांत काढावयाचा तो बरोबर काढलेला आहे.

परीक्षिती–( च्या अभिषेका )पासून महापद्मापर्यंत ८३६ वर्षे झालीं, या जुन्या परंपरेवरून वायुपुराणकर्त्यांनें ( अथवा भविष्यद्वागलेखकानें ) महादेवाच्या अभिषेकापासून परीक्षितीच्या जन्मापर्यंत ९५०–५१ वर्षे झालीं, असें विधान केलेलें आहे.

जुनी परंपरा महापद्मापर्यंतच असण्याचें कारण आहे. महापद्मापर्यंत सर्व राजे क्षत्रियच होते. तेव्हा, क्षत्रिय राजे जाऊन शूद्राच्या राज्याची केव्हा सुरवात झाली व मध्यंतरीं किती अवकाश गेला, म्ह. परीक्षितीच्या अभिषेकापासून महापद्माच्या अभिषेकापर्यंत किती अवकाश गेला यावद्दलची *वर्षसंख्या चंद्रगुप्तादिकाच्या काळीं असणें काहीं अशक्य नाहीं.* तशी परंपरा ( वर्षसंख्येची ) होती असें अनेक कारणामुळें वाटतें. ( वायु व मत्स्यपुराणातून मगधदेशाच्या राजाच्या कारकीर्दीचीं वर्षे दिलीं आहेत. चंद्रगुप्ताच्या वेळच्या मॅगास्थिनीसनें आपल्या वेळेपर्यंतचीं बरोबर वर्षे दिलेलीं आहेत. यावरून वर्षांच्या याद्या तेव्हा असत असें दिसतें. तेव्हा *कालगणनेच्या काहीं तरी परंपरा असणे काहीं अशक्य नाहीं.* ) **या परंपरेप्रमाणे पाहतां परीक्षिती ( च्या अभिषेका )पासून महापद्माच्या** अभिषेकापर्यंत ८३६ वर्षे झालीं ही परंपरा प्राचीन आहे. वायु व मत्स्य या दोहीं पुराणासही ती मान्य आहे. पण यावरून 'महादेवा'च्या *अभिषेकापासून परीक्षितीच्या जन्मापर्यंत ९५०।५१ वर्षे होतात* हे कसें सिद्ध होतें ? याचा आपण विचार करूं

| | वर्ष |
|---|---|
| भारतीय युद्ध } परीक्षितीचा जन्म } | १ |
| परीक्षितीचा अभिषेक | १६ वें |

| | |
|---|---|
| प. अ. पासून<br>म. अ. पर्यंत | ( १५ )<br>८३६ |
| नंदाचा काळ<br>( पुराणमतें ) | १०० |
| चंद्रगुप्ताचा अभिषेक | ९५१ |

याप्रमाणें वायुपुराणकर्त्याच्या मतें भारतीय युद्धापासून ९५१ वर्षांनंतर 'महादेवा' चा म्हणजे चंद्रगुप्ताचा अभिषेक झाला. वायुपुराणकर्त्यानें 'महादेव' पदानें चंद्रगुप्त घेतलेला आहे हे सिद्ध होतें. पण हें सिद्ध होण्यास ९५१ असाच अर्थ श्लोकाचा घेतला पाहिजे,* म्हणजेच वायुपुराणांतील पहिल्या २ श्लोकांची संगति लागते. एरवीं ८३६ आंकड्यावरून ९५१ या काळाची उपपत्ति कशी लागणार! वायुपुराणानें तर पहिल्या विधानाचें प्रमाण म्हणून दुसऱ्या श्लोकाची प्राचीनपरंपरा दिलेली आहे. तेव्हां या श्लोकांची सांगड असलीच पाहिजे हे उघड होतें; व ही सांगड असे अर्थ केल्यानेंच उत्पन्न होते.

( १ ) परीक्षितीच्या जन्मापासून महादेवाच्या म्ह. चंद्रगुप्ताच्या अभिषेकापर्यंत ९५१ वर्षें झालीं.

( २ ) याचें कारण असें कीं, परीक्षितीच्या अभिषेकापासून महापद्मनंदाच्या अभिषेकापर्यंत ८३६ वर्षें झालीं. ( यांत नंदाचीं १००—व परीक्षितीचीं अभिषेकापूर्वींचीं १५ वर्षें मिळविलीं कीं ९५१ वर्षें होतात. )

यावरून, वायुपुराणाच्या भविष्यद्भागकर्त्याचें मत काय होतें हें कळून

*अशा तऱ्हेनें अर्थ करण्याची संस्कृतमध्यें पद्धत आहे. श्रीशंकराचार्यांचाही काळ देतांना एका कवीनें असें लिहिलें आहे. 'चतुःसहस्रे द्विशतोत्तरे गते। तिष्येऽवतीर्णो भुवि शंकरार्यः ॥' म्ह. २०० वर्षांनीं अधिक अशीं ४००० वर्षें म्ह. ३८०० वर्षें कलीचीं गेलीं असतां या जगांत शंकराचार्य अवतीर्ण झाले!

येईल. शिवाय, ' महादेव ' व ' ९५१ ' याचे इतर पुराणानीं भिन्न भिन्न अर्थ केल्यामुळें कसे घोटाळे उत्पन्न झाले, हेंही कळून येईल.

आतां, चंद्रगुप्ताचा राज्याभिषेक ३१२ इ. पू. ते ३२५ पर्यंत धरितात. यापूर्वी ९५१ वर्षें म्हणजे १२६३ ते १२७६ इ. पू. परीक्षितीचा जन्म व भारतीय युद्धाचा काळ ठरविता येतो. जैन व बौद्ध परंपरावरून चंद्रगुप्ताचा राज्यारोहणकाल इ. पू. ३१२ हाच पक्का ठरविता येतो. या काळावरून परीक्षितीचा व भारतीय युद्धाचा काळ बरोबर इ. पू. १२६३ हाच ठरतो.

## चंद्रगुप्ताचा काळ.

चंद्रगुप्ताच्या राज्याभिषेकाचा काळ इ. पू. ३१२ हाच आहे, याविषयीं जैन व बौद्ध प्रमाणें काय आहेत हें आपण आता पाहूं. याविषयीं स्मिथ साहेबानीं आपल्या Early History of India, (p. 38, foote note) मध्यें म्हटलें आहे कीं, "It is quite possible that the *Coronation took place some years later* (*than* B. C. 321) and the 'Mourya Era' in which Kharavela of Kalinga dates his inscription, may be identical with the Seleukidan *era* beginning in October 312 B C."

इ. पू. ३१२ सालीं चंद्रगुप्ताचा राज्याभिषेक झालेला असणें अगदीं शक्य आहे असें स्मिथ यांचें म्हणणें आहे. तसेंच Historians' His of the World, Vol II मध्येंही इ. पू. ३१२ हाच चंद्रगुप्ताचा राज्याभिषेककाळ दिलेला आहे.

डॉ. भाऊ दाजी यानीं मेरुतुंगाचार्यांच्या थेरावलीचें सार दिलेलं आहे. (Literary Remains of Dr Bhau Daji, p 130 पहा). थेरावली ऊर्फ स्थविरावली यात कल्पसूत्र, परिशिष्टपर्व, हेमचंद्राच परिशिष्ट-

पर्व इ० प्राचीन जैन ग्रंथांवरून ऐतिहासिक परंपरा दिलेल्या आहेत. त्या परंपरांवरून खालील माहिती कळतेः—

" जैनाचे शेवटचे तीर्थंकर महावीर वर्धमान हे विक्रमापूर्वी ४७० वर्षी निर्वाण पावले. त्याच वर्षी त्याच रात्रीं, अवंतीचा प्रद्योत राजा (चंड-प्रद्योत ) मरण पावला. नंतर त्याचा मुलगा पालक उज्जनीस राज्य करूं लागला.

" महावीरांच्या निर्वाणानंतर ६० वर्षांनीं पाटलीपुत्रांत राज्य करीत असलेला कूणिकाचा पुत्र उदायी याचा खून झाला.

" यानंतर १५५ वर्षांनीं व निर्वाणापासून २१५ वर्षांनीं चंद्रगुप्त राज्यारूढ झाला."

येथें मेरुतुंगानें दोन मतें दिलीं आहेत. एका पूर्वीच्या परिशिष्टपर्वावरून, त्यांनीं चंद्रगुप्ताचा राज्याभिषेक उदायीच्या मरणानंतर १५५ वर्षांनीं म्हणजे निर्वाणापासून २१५ वर्षांनीं झाला असें लिहिलेलें आहे; पण हेमचंद्राच्या परिशिष्टपर्वावरून पहाता, मेरुतुंगाचार्यांस चंद्रगुप्ताचा अभिषेक निर्वाणानंतर १५५ हाच घ्यावा लागला; पण पहिलेंच मत खरें आहे. यास प्रमाण, चंद्रगुप्ताच्या काळाविषयीं दुसरी एक जैन परंपरा असल्याची जेकोबी *यांनीं दिलेली आहे. ती अशी कीं, विक्रमापूर्वी २५५ वर्षे चंद्रगुप्ताचा अभिषेक झाला. जुन्या परिशिष्टावरून मेरुतुंगानें दिलेली परंपरा व जेकोबींनीं दिलेली चंद्रगुप्तकाळाची परंपरा या दोन्हीवरून पाहतां चंद्रगुप्ताचा राज्याभिषेककाळ निर्वाणानंतर २१५ व विक्रमापूर्वी २५५ वर्षे झाला हेंच बरोबर दिसतें. यावरून खालील काळ ठरतातः—

* हेमचंद्राचें परिशिष्टपर्व, प्रस्तावना पहा.

| वि. पू. | इ. पू. | |
|---|---|---|
| ४७० | ५२७ | महावीराचें निर्वाण. |
| ४१० | ४६७ | उदायीचा खून |
| २५५ | ३१२ | चंद्रगुप्ताचा राज्याभिषेक |

अजातशत्रूला जैनलोक कूणिक म्हणत. त्याचा बाप बिंबिसार यास श्रेणिक म्हणत. उदायी हा अजातशत्रूचा पुत्र होता. त्याचा खून इ. पू. ४६७ सालीं झाला, ही एक महत्वाची परंपरा कळते; व ती ऐतिहासिक आहे.

जैनपरंपरांवरून दुसरी एक गोष्ट सिद्ध होते कीं प्रद्योत व पालक हे गौतमबुद्ध व महावीर यांचे काळीं व थोडेसे नंतर उज्जनीस राज्य करीत असत. मगध देशांत राज्य करीत नव्हते. आपलीं पुराणें बारीक दृष्टीनें तपासून पाहतांही हीच गोष्ट कळून येते. ह्या पूर्वीचे राजे वीतिहोत्र कुळांतले होते. तेव्हां वीतिहोत्र कुळीचे राजे अवंतींत राज्य करीत असतां, प्रद्योतानें आपल्या स्वामीचा खून करून राज्य बळकावलें.

> बृहद्रथेष्वतीतेषु वीतिहोत्रेष्ववंतिषु ।
> प्रद्योतः स्वामिनं हत्वा स्वपुत्रमभिषेक्ष्यति ॥

यावरूनही मगध देशाचे बृहद्रथराजे संपल्यावर अवंतीस वीतिहोत्र कुळीचें राजे असतां प्रद्योतानें स्वामीस मारून टाकून आपल्या मुलास अभिषिक्त केलें. तेव्हां प्रद्योतकुळीचे राजे मगधदेशचे नसून तत्कालीन अवंतीचे होते असेंच दिसतें. असो.

उदायीच्या मरणाचा काळ जैनपरंपरेवरून नक्की कळल्यामुळें हा राजा कोण व त्याविषयीं काय माहिती मिळते हें पाहणें जरूर आहे.

## उदायीची हकीगत.

जैनांनीं उदायीविषयीं बरीच हकीकत हेमचंद्राच्या परिशिष्टपर्वांत देऊन ठेविलेली आहे. भारतीय इतिहासांत याचें राज्य महत्त्वाचें आहे. कारण, याच्या राज्यांतच कुसुमपुर शहर बांधिलें गेलें. वायुपुराणानेंही यानें कुसुमपूर शहर बांधल्याचा उल्लेख केलेला आहे. गर्गानेंही तसाच उल्लेख केलेला आहे. हेमचंद्राच्या परिशिष्टपर्वांत सहाव्या सर्गांत उदायीची हकीकत आहे. तिचा सारांश हा:—

श्रेणिक ऊर्फ बिंबिसार राजानें राजगृहांत राज्य केल्यानंतर त्याचा पुत्र कूणिक ऊर्फ अजातशत्रु यानें आपली राजधानी चंपानगरीस नेली. अजातशत्रूनंतर त्याचा पुत्र उदायी हा गादीवर बसला. त्यास चंपानगर राजधानी असणें न आवडल्यामुळें त्यानें आपली नवी राजधानी कोठें वसवावी याचा शोध करण्यासाठीं माणसें पाठविलीं. शेवटीं गंगेच्या कांठीं एक पाटलवृक्ष प्रफुल्लित असलेला पाहून तेथें राजधानी वसविली. त्या शहरास कुसुमपूर किंवा पाटलिपुत्र म्हणत. उदायी जैनधर्मानुयायी होता. उदायी क्षत्रिय होता तरी धर्माकरिता भेदाच्या धोरणानें अनेक राजे त्यानें पादाक्रांत केले.

> स धर्मबाधया क्षात्रमपि तेजः प्रमापयन् ।
> आत्मनः सेवकांश्चक्रे तुर्योपायेन भूपतीन् ।
>
> परिशिष्टपर्व, सर्ग ६, श्लो. १८७.

उदायी राजा असेपर्यंत श्रावणांस कांहीं सुख नाहीं असें त्या वेळच्या राजास वाटत असे.

> राजानोऽत्यंतमाक्रांतास्ते तु सर्वेऽप्यचिंतयन् ।
> यावज्जीवत्युदाय्येष तावद्राज्यसुखं न नः ॥ १८८ ॥

एकदा, एका राजाचें राज्य खालसा करून त्यास हद्दपार केलें असता तेथें विदेशातही त्यास गाठवून उदायीनें ठार करविलें तेव्हा, त्या राजाच्या पळून गेलेल्या पुत्रानें—जैन यतीचा वेष घेऊन—रात्रीं राजाचा खून केला. राजधानींत रात्रीं एकाएकीं एका जैन यतीनें खून केला, अशी लोकाची समजूत झाली, परंतु हा राजकीय वध होता. याप्रमाणें खि० पू० ४६७ वर्षी उदायी याचा अंत झाला.

वायुपुराणात या उदायीविषयीं असा उल्लेख आहे:—

उदायी भविता यस्मात् त्रयस्त्रिंशत्समा नृप ।
स वै पुरवर राजा पृथिव्या कुसुमाव्हयम् ।
गगाया दक्षिणे कूले चतुर्थेऽब्दे करिष्यति ॥

वायुपुराण, अ ९९-३१९

मत्स्यपुराणात फक्त याचें राज्य ३३ वर्षांचें होतें, एवढेंच दिलेलें आहे. वृद्धगर्गाच्या बृहद्गार्गीसंहितेंतही उदर्धीविषयीं असें लिहिलें आहे कीं,

तत कलियुगे राजा शिशुनागात्मजो बली ।
उदर्धी नाम धर्मात्मा पृथिव्या प्रथितो गुणै ॥
गगातीरे स राजर्षि दक्षिणे स महावरे ।
स्थापयन्नगर रम्य पुष्पारामजनाकुलम् ।
तेऽथ पुष्पपुर रम्य नगर पाटलीसुतम् ॥

डेक्कन कॉलेज प्रत, न ३४५ (१८७९-८)

यावरून उदर्धी, उदयी किंवा उदायी यानें ३३ वर्षें राज्य केलें, व आपल्या राज्याच्या ४ थे वर्षीं त्यानें कुसुमपुर स्थापिलें असें दिसतें. यावरून कुसुमपूर शहर इ० पू० ४९६ सालीं स्थापिलें हें ठरून येतें.

उदायी—इ० पू० ५०० ते ४६७ पर्यंत चौथे वर्षी कुसुमपूर शहर बांधिलें.

बृहद्गार्गीसंहितेतील उताऱ्यावरून हा उदायी शिशुनागवंशांतील होता हे तर स्पष्टच होत आहे. आतां या शिशुनागवंशाची तपासणी करूं. पुराणांतून शिशुनागवंशांत १० राजे सांगितलेले आहेत. या वंशांतील राजांच्या अनुक्रमांत पुराणांतून घोटाळा आढळतो. आनंदाश्रमांतील वायुपुराण तपासून पाहिलें तर असें आढळतें कीं, क्षत्रौजा हा अजातशत्रु व बिंबिसार यांच्या मध्यंतरीं घातलेला आहे;व त्यामुळें अनुक्रम, अजातशत्रु, क्षत्रौजा,बिंबिसार, दर्शक, व उदायी असा झालेला आहे; पण हा अनुक्रम चुकीचा होय. भागवतानें बिंबिसारापूर्वी अजातशत्रूला आणून ठेविला आहे; पण त्याच्यामध्यें क्षत्रौजा नाहीं. दहा शिशुनागराजांपैकीं दर्शक एक असला तरी तो बिंबिसाराचा कोणीतरी पूर्वज असावा असें वाटतें. विष्णु व मात्स्यपुराणांनीं मात्र बिंबिसारानंतर अजातशत्रूचें नांव दिलेलें आहे व तें बरोबरच आहे. दर्शक हा अजातशत्रूनंतर आला आहे. मात्स्यानें इतर पुराणांत न आढळणारीं अशीं दोन नांवें विंध्यसेन ( बिंबिसार ) व अजातशत्रु यांच्यामध्यें दिलीं आहेत; वंशक ( दर्शक ) यास अजातशत्रु व उदायी यांच्या मध्यंतरीं ठेविलेला आहे. सारांश, पुराणांच्या मतें उदायी हा अजातशत्रूचा नातू असून बौद्ध व जैन परंपरांच्या मतें हा त्याचा पुत्र होय ! या बाबींत बौद्ध व जैन परंपरांस अधिक मान देणें जरूर आहे. पुराणांतील अनुक्रमांच्या घोटाळ्यामुळें व बौद्ध व जैन परंपरेच्या सविस्तरपणामुळें या वंशाचा अनुक्रम असा ठरवितां येईलः—

| | | |
|---|---|---|
| १ शिशुनाग. | ६ बिंबिसार. | ३८ |
| २ शाकवर्ण ( काकवर्ण ). | ७ अजातशत्रु. | २५ |
| ३ क्षेमधर्मा. | ८ उदायी. | ३३ |
| ४ क्षत्रौजा. | ९ नंदिवर्धन. | ४० |
| ५ दर्शक. | १० महानंद. | ४३ |

शेवटच्या पांच राजांचा काळ पुराणांतूनच घेतलेला आहे. या शेवटच्या पांच राजांचेंच इतिहासदृष्ट्या महत्त्व आहे.

अशोकअवदान नांवाच्या बौद्ध ग्रंथाप्रमाणें हा अनुक्रम बिंबिसारापासून खालीं दिल्याप्रमाणें आहे. त्यांतील काकवर्णिन् बिंबिसाराचा पूर्वज दिसतो. महावंसो व बुद्धघोष या दोन बौद्ध ग्रंथांवरून राजांचा अनुक्रम व त्यांचा काळ खालीं दिल्याप्रमाणें आहेः—

| अशोकावदाना-प्रमाणें राजे. | महावंसोप्रमाणें राजे. | वर्षे. महावंसोप्र. | वर्षे. बुद्धघोषाप्र. | |
|---|---|---|---|---|
| बिंबिसार. | बिंबिसार. | ५२ | ५२ | |
| अजातशत्रु. | अजातशत्रु. | ३२ | ३२ | |
| उदायीभद्र. | उदायिभद्रक. | १६ | १८ | |
| मुंड. | अनुरुद्धक व मुंड. | ८ | ८ | |
| काकवर्णिन्. | नागदासक. | २४ | २४ | |
| सहालिन्. | शिशुनाग. | १८ | १८ | |
| तलकुचि. | कालाशोक. | २८ | २८ | ७२ |
| महामंडल. | नंद नऊ. | २२ | २२ | |
| प्रसेनजित्. | नंद एकटा. | २२ | २२ | |
| नंद. | चंद्रगुप्त. | ३४ | २४ | |
| बिंदुसार. | बिंदुसार. | २८ | २८ | |
| सुशीम. | अशोक. | ३७ | ३७ | |

बुद्धघोषानें बुद्धाचा निर्वाण अजातशत्रूच्या १८ व्या वर्षी दिल्यामुळें १० वर्षांचें अंतर पडलें, तें चंद्रगुप्ताचे राज्यांत मरून आलेलें आहे. महावंसोमधील 'नागदासक' हा पुराणांतील यादींतील 'दर्शक' याच्या जवळ जवळ आहे.

## कांहीं बौद्ध परंपरा,

हुएनत्सांग नांवाच्या चिनी प्रवाशाच्या हकीकतींत मिळतात; त्या ह्या:—

( १ ) तथागताच्या निर्वाणानंतर १०० वे वर्षी अशोक नांवाचा एक राजा—बिंबिसाराचा पणतू होता.

सी–यू–की, पु. २ –पृ. ८५.

( २ ) सी-यू-की २–९४ मधील मूळावरून नंदराजाचें अशोकाशीं ऐक्य दाखविलेलें दिसतें; हा महानंदच असावा.

पहिल्या व दुसऱ्या उल्लेखावरून, हा १०० वर्षांनंतरचा अशोक कालाशोक ऊर्फ महानंद असावा असें दिसतें. हा कालाशोक व धर्माशोक भिन्न होत.

नवनंदांपैकीं पहिला राजा जो महापद्मनंद त्यासच कित्येक कालाशोक समजतात; तशा समजुतीनेंच महावंसोनें त्यास नंदांत गणिलेला आहे. पण कालाशोक हा नंदांच्या पूर्वींच होता. यास प्रमाण असें आहे कीं, टर्नरसाहेबानें महावंसोच्या प्रस्तावनेंत त्याच्या टीकेंतील उताऱ्याचें भाषांतर दिलेलें आहे. त्यावरून बुद्धानंतर १०० वर्षांनीं दुसरी धर्मसंगीति भरविणारा कालाशोक व नंदांपैकीं पहिला राजा हे भिन्न होते हें कळून येतें. टर्नरची प्रस्तावना, पृ. ३८ मध्यें म्हटलें आहे कीं:—

"Subsequent to Kaláshoka, who patronised those who held the second Convocation, the royal line is stated to have consisted of 12 monarchs to the reign of Dharmáshoka, when they held the third convocation. Kalashoka's own sons were ten brothers. Their names are specified in the अट्ठकथा. The appelation of the नवनंद's originates in nine of them bearing that patronymic title.

The अट्ठकथा of the उत्तरविहार priests sets forth that the eldest of these was of an entraction (Maternally)

not allied (inferior) to the Royal family * * *
It also gives the history of the other nine"

या महावंशाच्या टीकेवरून, कालाशोक हा नवनंदाचा बाप होता, व नंदांपैकीं पाहिला पुत्र शूद्रेपासून जन्मला होता ह्या गोष्टी सिद्ध होतात. हें वर्णन पुराणातील महापद्माला लागू पडत नसून त्याचा बाप जो महानंद त्याला लागू पडतें. यावरून महानंदाच्या राज्याचे वेळीं बुद्धापासून १०० वें येऊन गेलें होतें हें सिद्ध होतें. कालाशोक ऊर्फ महानंद याच्या राज्याच्या १० वे वर्षी निर्वाणानंतरचें १०० वें वर्ष होतें. तेव्हा, त्याचें राज्य निर्वाणानंतर ९० वर्षांनीं सुरू झालें हें उघड आहे. पुराणांतील यादींप्रमाणें अजातशत्रूचीं बाकीचीं* १७ + उदायीचीं ३३ + नंदिवर्धनाचीं ४० मिळून ९० वर्षे महानंदापर्यंत झालीं. तेव्हा या दृष्टीनेंही महानंदच कालाशोक ठरतो व पुराणात या राजाचे दिलेले काल ऐतिहासिक दृष्ट्या बरोबर ठरतात.

कालाशोकाचे पुत्र नवनंद असून महावंसोनें चुकीनें कालाशोकाची *गणना* नंदातच केलेली आहे. एकंदर नंदांचीं वर्षे महावंशोनें (कालाशोकास नंद धरून) २८ + २२ + २२ = ७२ दिलेलीं आहेत, हीच संख्या जैनानीं नंदास दिल्याप्रमाणें वाटतें.

कारण, महावीराच्या निर्वाणापासून उदायीच्या मरणापर्यंत ६० वर्षे झालीं; त्यानंतर १५५ वर्षांनीं चंद्रगुप्त राज्यावर आला; पुराणमतें मधील राजाचा काळ हा:—

* बुद्धनिर्वाण अजातशत्रूच्या ८ व्या वर्षी झालें, अशी बौद्धपरंपरा आहे महावंसो पहा).

| | | |
|---|---|---|
| नंदिवर्धन | ४० | ८३ |
| महानंद | ४३ | |
| नवनंद | ( १०० ) | ( ७२ ) |
| | ( पुराणमतें ) | जैन व बौद्धमत. |

८३ + ७२ = १५५.

साराश, जैन व बौद्ध परंपराप्रमाणें नवनंदाचा काळ ७२ वर्षे आहे; व पुराणमतें तो १०० वर्षे आहे; पण नवनंदाचा ७२ वर्षे हा काळच खरा दिसतो.

——साराश, उदायीचें मरण इ. पू. ४६७.

महानंदाचा अखेर, नवनंदांचा प्रारंभ } इ. पू. ३८४.

नवनंदाचा अंत, चंद्रगुप्त अभिषेक } इ. पू. ३१२.

हे ऐतिहासिक काळ दिसतात.

पुढील बौद्धांनीं कालाशोकासच पाहिला नंदराज मानल्यामुळें, चंद्रगुप्ताचा काळ असा ठरविलाः—

| | |
|---|---|
| महानंद, कालाशोक | ९० निर्वाणानंतर |
| नवनंद | ७२ |
| चंद्रगुप्ताचा | १६२ |

पण या गणनेंत महानंदाचीं राज्य-वर्षे धरिलीं नाहींत; कारण कालाशोकच पहिला नंद समजण्यात आला. पण ९० + ४३ + ७२ = २०५ निर्वाणानंतर असाच चंद्रगुप्ताचा काळ असावयास पाहिजे होता; व एका परंपरेंत तो तसा आहेही. Selections from the Asiatic Journal (Vol. II, p. 812) मध्यें एक परंपरा अशी आहे.

To these may be added information given by धर्मा धारी ब्रह्मचारी, who has lately been introduced to the publ c notice as the राजगुरु of Assam and who is well verse l in Buddha literature

According to him the निर्वाण of शाक्यमुनी took place in the 18 th year of Ajatasatru and 192 years before Chandra gupta '

अजातशत्रूच्या १८ व्या वर्षी बुद्धाचें निवाण झालें, अशी एक पूर्वीही परपरा दिल्लीच आहे, पण ता चुकीची होय आठवे वर्षीच बुद्ध निवाण पावला पण अजातशत्रूच्या १८ वे वर्षापासून चद्रगुप्तापर्यंत १९६ वें वर्ष झालें असावें हें स्पष्टपणें दिसतें निवाण ८ वे वर्षी झाले असल्यामुळें तीं १० वर्षे त्यात मिळविली म्ह १९६ + १० = २०६ वर्षी ( निवाणानतर ) चद्रगुप्ताचा काळ येतो

साराश, निवाणानतर ९० + ७२ = १६२ हा चद्रगुप्ताचा खरा काळ नसून, निर्वाणानतर ९० + ४३ + ७२ = २०५ हाच खरा काळ होय साराश, बौद्ध कालगणनेंत कालाशोकाला पहिला नद मान ल्यानें ४३ वर्षांचा घोटाळा झालेला आहे.

जैन व बौद्ध परपरा कांहीं पौराणिक परपरांशीं जमतात, यावरूनच एकमेकांचा परस्परावर प्रकाश पडतो शिशुनागवशातील राजाचा–निदान शेवटच्या पाच तरी–( आम्हीं दिलेला ) अनुक्रम व ( पुराणातील ) का लावधि बरोबर असावा असें वाटतें एरव्हीं जैन व बौद्ध परपरांनीं हें जुळतेंना जैन व बौद्ध प्रमाणावरून पहाता नवनदाचा काळ ७२ वर्षांचा आहे पुराणानीं हा काळ बरोबर १०० वर्षांचा बनविलेला आहे तो का बनविला हें पुढें कळेल जैनाच्या मतें उदायीच्या मरणापासून चद्रगुप्ता पर्यंत १५२ वर्षे झालीं त्यापैकीं महापद्मापर्यंतचीं ४० + ४३ = ८३

वर्षे वजा केलीं तर नवनंदांचीं ७२ च वर्षे राहतात. बौद्ध व जैन परंपरा जेथें याप्रमाणें नवनंदांचा काळ एकमतानें ७२ वर्षें देतात, तेथें पौराणिकांच्या १०० या आंकड्यांवर भरंवसा ठेवणे शक्य वाटत नाहीं. असो.

सारांश,

| | | |
|---|---|---|
| इ. पू. | ३१२ | चंद्रगुप्ताभिषेक. |
| ,, | ३८४ | नवनंदांची कारकीर्द. |
| ,, | ४६७ | उदायीचा खून. |
| ,, | ४९६ | कुसुमपुर बांधलें. |

असे काळ ठरवितां येतात.

आतां बौद्धांचीं व पुराणांचीं नांवें व काळ जमत नाहींत एवढें खरें; पण कालाशोक हा नवनंदांपूर्वीचा राजा व त्यांचा बाप असून, तो पुराणांतील महानंदाशीं जुळतो हें मीं वर दाखविलेंच आहे. शिवाय बुद्धनिर्वाणापासून महानंदाच्या प्रारंभापर्यंत ९० च वर्षें होतात. असो.

मागें वायुपुराणकर्त्यानें दिलेल्या परंपरेवरून भारतीय युद्धाचा काळ याप्रमाणें ठरविला आहेः--

| | |
|---|---|
| परिक्षितीच्या जन्मापासून अभिषेकापर्यंत | १५ वर्षें |
| परि. च्या अभिषेकापासून महापद्माच्याअभिषेकापर्यंत | ८३६ ,, |
| नंदाचा काळ (पुराणमतें) | १०० ,, |
| एकूण. | ९५१ |

हें अनुमान ज्या परंपरांवरून वायुपुराणाच्या अर्वाचीन लेखकानें काढिलेलें आहे. खरी परंपरा अशी असावी कीं,परिक्षितीच्या जन्मापासून तो (महापद्माच्या नव्हे तर महानंदाच्या अभिषेकापर्यंत ८३६ वर्षें झालीं. ही परंपरा जुळली तर असे काळ होतात.

| | | |
|---|---|---|
| परि. च्या जन्मापासून महानंदाच्या अभिषेकापर्यंत | } ८३६ | |
| महानंदाचीं वर्षें | ४३ | |
| नवनंदांचा खरा काळ | ७२ ( जुन्या पुराणमतें ) | |
| एकूण | ९५१ | |

दोन्ही तऱ्हांनीं पाहिलें तरी चंद्रगुप्तापूर्वी ९५१ वर्षे म्ह. ३१२ + ९५१= इ. पू. १२६३ वर्षी भारतीय युद्ध झालें हें बरोबर ठरतेंच.

शिवाय, नंदाचा काळ १०० वर्षे मानल्यामुळें, महानंदापर्यंत ८३६ वर्षे झालीं अशी जी मूळची परंपरा असेल तिचा अर्थ महापद्मापर्यंत असा कसा करण्यांत आला हेंही कळेल. कारण, वायुपुराणकर्त्यांनीं तरी ८३६ वर्षांचा प्रारंभ कोठून धरावयाचा—परिक्षितीच्या जन्मापासून का अभिषेकापासून हें मोघमच ठेविलेलें आहे. यावरून मूळची परंपरा महानंदापर्यंतच असावी असें वाटतें. ' नंदांतं क्षत्रियकुलं ' याचा अर्थ ' नंदानें क्षत्रिय कुलाचा अंत झाला, ' असाच करावा लागेल; व येथें क्षत्रिय कुलांतला शेवटला राजा महानंदच घ्यावा लागेल. पण पुढें ' नंद ' यानें महापद्मच घेऊं लागले. तेव्हां मूळची परंपरा " परिक्षिती–( जन्मा ) पासून ( महा ) नंदाच्या अभिषेकापर्यंत ८३६ वर्षें झालीं; " अशीच असावीसें खास वाटतें.

याचा वायुपुराणाच्या सद्यःस्वरूपकर्त्यांनीं असा अर्थ केला असावा कीं नंद म्हणजे महापद्मनंद होय. सारांश, ऐतिहासिकदृष्ट्या—

| | | |
|---|---|---|
| ( १ ) परिक्षितीच्या जन्मापासून ( महा ) नंदाभिषेकापर्यंत | } ८३६ | वर्षे. |
| ( २ ) महानंदाचा काळ | ४३ | ,, |
| ( ३ ) नवनंदांचा खरा काळ | ७२ | ,, |
| ( ४ ) चंद्रगुप्ताचा अभिषेक | ३१२ | इ. पू. |

हे काळ धरून, भारतीय युद्धाचा काळ १२६३ इ. पू. हा पक्का ठरतो. अर्वाचीन कालगणनेच्या आधारांवर भारतीय युद्धाचा काळ याप्रमाणें पक्का ठरविता येतो.

## शिशुनाग व नंदवंशांची कालगणना.

| नं. | नांव. | वर्षे. | शेरा. |
|---|---|---|---|
| ६ | बिंबिसार. | ३८ | राजगृह बांधिलें. महावीर व गौतम याचा समकालीन होता. |
| ७ | अजातशत्रु. | २५ | याच्या आठव्या वर्षी गौतमबुद्ध निर्वाण पावला. |
| ८ | उदायी. | ३३ | चौथ्या वर्षी कुसुमपुर बांधिलें. |
| ९ | नंदिवर्धन. | ४० | |
| १० | महानंद ऊर्फ ( कालाशोक. ) | ४३ | परिक्षितीच्या जन्मापासून महानंदाच्या अभिषेकापर्यंत ८३६ वर्षे झालीं अशी मूळची परंपरा असावी. |
| | (नंद वंश). | अर्वाचीन (पुराणमतें) | |
| ११ | नवनंद. | १०० | जैन व बौद्ध परंपराच खऱ्या दिसतात; व तें वरील परंपरा खरी धरल्यास मूळच्या पुराणमताशींही जुळतें. |
| १२ | ( तीन पिढ्या. ) | जैनबौद्ध. | |
| १३ | | ७२ | |
| | ( मौर्य वंश. ) | | |
| १४ | चंद्रगुप्त. | २४ | भारतीय युद्धापासून याचा अभिषेक ९५१ वर्षी झाला. |
| १५ | बिंदुसार. | २५ | ... ... ... ... ... |
| १६ | अशोक. ( मौर्यवंशाचा अशोकाखेर काळ ९० वर्षे. ) | (३६)४१ | तिबेटी बौद्धपरंपरेप्रमाणें अजातशत्रूपासून अशोकापर्यंत ( अशोक धरून) १० पीढ्या झाल्या. अशोकाचा अभिषेक या परंपरेच्या मतें बुद्धानंतर २३४ वर्षांनीं झाला. |

थोडासा खुलासा—हुएनत्सांगच्या ' सी यू-की ' वरून मागें उतारा दिलेला आहे कीं, तथागताच्या निर्वाणानंतर १०० वे वर्षी अशोक नांवाचा एक राजा—बिंबिसाराचा पणतू—होता. हा अशोक कालाशोकच असून त्याचें पुराणांतील महानंदाशीं ऐक्य वर सिद्ध केलेलेंच आहे. तेव्हां हा कालाशोक ऊर्फ महानंद बिंबिसाराचा पणतू म्हणून हुएनत्सांगनें दिलेलें आहे; पण हा अजातशत्रूचा पणतू असेल तरच बरोबर जमतें. कांहीं असो. या परंपरेवरून एवढें तरी बरोबर ठरतें कीं शिशुनागवंशाचा शेवटचा क्षत्रियराजा कालाशोक ऊर्फ महानंद हा बिंबिसार ( अगर बहुधा अजातशत्रु ) याचा पणतू होता; म्हणजे उदायीनंतर वंशाअखेरपर्यंत पुराणांत दिल्याप्रमाणें १।२ च राजे झाले. ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. दुसरी परंपरा टर्नरच्या महावंसोच्या प्रस्तावनेंत अशी दिलेली आहे कीं, कालाशोकानंतर धर्माशोकापर्यंत एकंदर १२ राजे झाले. तसेंच रॉकहिलनें आपल्या बुद्धचरित्रांत तिबेटी परंपरा अशी दिलेली आहे कीं, अजातशत्रूपासून धर्माशोकापर्यंत ( अशोकास धरून ) १० पिढ्या झाल्या. ह्या परंपरा कशा जुळतात हें आपण पाहूं. नवनंद, चंद्रगुप्त, बिंदुसार व अशोक असे बारा राजे होतात. आतां अजातशत्रूपासून १० पिढ्या कशा होतात हें आपण पाहूं. अजातशत्रु, उदायी, नंदिवर्धन व महानंद—या चार पिढ्या, नंदांच्या बौद्धमतें २८–२२–२२ वर्षांच्या तीन पिढ्या, चंद्रगुप्त, बिंदुसार व अशोक—या तीन पिढ्या—मिळून १० पिढ्या होतात. या एकंदर प्रमाणावरून पहातां महानंद ऊर्फ कालाशोक हा अजातशत्रूचाच पणतू असावा असें स्पष्टपणें वाटतें. यामुळें अजातशत्रु, उदायी नंदिवर्धन व महानंद यांचे पुराणांतील काळ—अनुक्रमें २५, ३३, ४० व ४३ वर्षें—बरोबर दिसतात. एरव्हीं अजातशत्रूच्या ८ वे वर्षापासून महानंदाच्या आरंभापर्यंत ९० वर्षें होणार कशीं ? अजातशत्रूचीं बारीकचीं

१७ + उदायीचीं ३३ + व नंदिवर्धनाचीं ४० मिळून बरोबर ९० वर्षे होतात. यावरून अजातशत्रूपासून चंद्रगुप्तापर्यंतचा अनुक्रम व काळ हे दोन्ही बरोबर आहेत हें जैन व बौद्ध परंपरांवरून पक्कें ठरतें. उदायीच्या मरणापासून चंद्रगुप्तापर्यंत एरव्हीं ( ४० + ४३ + ७२ = ) १५५वर्षे होणें शक्यच नाहीं. यावरून भारतीय इतिहासाच्या ह्या भागाचा काळ पक्काच ठरतो व चंद्रगुप्ताचा काळ भारतीय युद्धापासून ९५१ वे वर्षी व इ० पू० ३१२ वर्षी हाही पक्काच होतो. यामुळें भारतीय युद्ध ९५१ + ३१२ = १२६३ इ० पू० झालें हेंही निर्विवाद ठरतें.*

## बौद्धकालीन क्षत्रिय राजे.

बौद्धकाळापासून भारतवर्षाच्या खऱ्या इतिहासाला सुरवात होते, त्यापूर्वीची कालगणना व इतिहास हीं दोन्ही कळत नाहींत अशी साधारणतः

* Historians' His. of the World, Vol II मध्येंही भारतीय युद्ध "a few years before 1200 B. C" इ० पू० १२०० इन कांहीं वर्षांपूर्वी झालें असें म्हटलेलें आहे. चंद्रगुप्ताचा काळ या इतिहासांत इ० पू० ३१२ हाच धरिलेला आहे.

चंद्रगुप्तानें ( प्रीकराजा ) सेल्यूकस याच्या कन्येशीं लग्न केल्याचा उल्लेख आहे:—

> चंद्रगुप्तस्तस्य सुतः पौरसाधिपतेः सुताम् ।
> सुलूकस्य ततोद्वाह्य यावनीं बौद्धतत्परः ॥ ४३ ॥
> षष्टि वर्षं शतं राज्यं बिंदुसारस्ततोऽभवत् ।
> पितुस्तुल्यं कृतं राज्यं अशोकस्तनयोऽभवत् ॥ ४४ ॥

भविष्य पु. प्रति, खं. २, अ. ६.

यांत चंद्रगुप्तास बुद्धाचा ' पुत्र ' म्हटलें आहे तें कदाचित् शिष्य या अर्थी असेल, पण ' सुलूकाची यावनी कन्या ' परिणीत केल्याचा यांत स्पष्ट उल्लेख आहे; पण ' सुलूक ' पौरसाधिपति कसा ? पौरस देश होता ?

समजूत आहे. आम्हाला देखील भारतकाळापासून तों बुद्धापर्यंतच्या राजाशीं विशेष कर्तव्य नाहींच म्हणून बौद्धकालीन चंद्रसूर्यवंशाचें व मगधदेशचे राजे तेवढे पाहू —

| चंद्रवंशीय. | मगधदेशचे. | सूर्यवंशीय |
|---|---|---|
| शतानीक | बिंबिसार. | प्रसेनजित्. |
| उदयन. | अजातशत्रु | क्षुद्रक,क्षुद्रक |
| वहीनर. | उदायी. | रणक |
| दडपाणि | नंदिवर्धन | सूरथ |
| निरामित्र | | |
| क्षेमक | महानंद | सुमित्र. |
| महापद्मनंदानें सर्व क्षत्रियांचा संहार केला. इ. पू. (३८४) | | |

चंद्रवंश—चंद्रवंशापैकीं वत्सनामिदेशांत, कौशांबी राजधानींत गौतम बुद्धाचे वेळीं व नंतर कोष्टकांत दाखविलेले राजे राज्य करीत असत. ललितविस्तर नावाच्या बौद्धग्रंथांत लिहिलें आहे कीं, वत्साचा उदयन राजा ज्या दिवशीं जन्मला त्याच दिवशीं गौतमबुद्ध उज्जिनी नगरांतर्ल्या वागेंत जन्मला कौशांबी नगर यमुनेच्या कांठीं होतें जैनांनीं श्रेणिक ( बिंबिसार ) चरित्रांत म्हटलेलें आहे कीं, सिंधु देशांतील चेतक राजाची कन्या मृगावती ही शतानिकास दिली —

> विषये वत्सनाम्याख्ये कौशांबीपुरवासिने ।
> सोमवंशे स्वर्नाकीय वितीर्णा द्वितीया सुता ॥
>
> श्रेणिकचरित्र, ८-१९

कथासरित्सागरांत देखील उदयनाच्या आईचें नाव मृगावती असेंच दिलेलें आहे.

' ' उदयनास वत्सपति अगर वत्सराज म्हणत; यास जंगलांतून हत्तींची शिकार करण्याचा फार नाद असे. उज्जयिनीच्या चंडप्रद्योत राजाच्या शिपायांनीं एका कृत्रिम हत्तींत लपून यास पकडून नेलें, असें हर्षचरित्रांत म्हटलेले आहे. अवंतीच्या प्रद्योताची कन्या वासवदत्ता ही वत्सराज उदयनाच्या तीन राण्यांपैकीं एकटी होती, असे धम्मपदाच्या टीकेंत उल्लेख आहे. उज्जैनीस महासेनाच्या ( प्रद्योताच्या ) कैदेंत असतां प्रद्योताची कन्या वासवदत्ता इचे मन मोहून तिच्या साह्यानें, उदयनानें तिला पळवून नेली ! हा मोठा गायनवादनपटु होता. कालिदासानें याच उदयनाचा मेघदूतांत उल्लेख केलेला आहे. ' प्रद्योतस्य प्रियदुहितरं वत्सराजोऽनुजह्रे । ' उदयनानें बनविलेल्या रक्तचंदनाच्या बुद्धाच्या मूर्ति कौसम येथें ज. कुनिंगहाम यास मिळाल्या.

उदयनानें वासवदत्तेखेरीज रत्नावली व प्रियदर्शिका यांशींही लग्न लाविलें होतें. याच उदयनाला पंचतंत्रांत वीणावत्सराज म्हटलेलें आहे; कारण यास वीणा नेहमीं प्रिय असे.

उदयन एके दिवशीं वनविहार करून थकून दारूच्या धुंदींत पडला असतां, त्याच्या राण्या पिंडोल नावाच्या बौद्ध भिक्षूचें प्रवचन ऐकण्यास गेल्या. हें पाहून राजानें रागाच्या भरात पिंडोलचा छळ केला; पण पुढें पिंडोलभिक्षूची प्रत्यक्ष गांठ पडल्यावर राजाचें व त्याचें ' संयमा ' वर भाषण झालें. तेव्हांपासून उदयन बौद्धधर्मानुयायी झाला. उदयन गौतमबुद्धाच्या मरणानंतरही जिवंत होता.

उदयनास वासवदत्तेच्या पोटीं नरवाहनदत्त नांवाचा पुत्र झाला; हाच कथासरित्सागरांतला नरवाहनदत्त होय; यास तेथें कामाचा अवतार म्हटलेलें आहे. मत्स्यपुराणानें याचा अनंगाचा तिसरा अवतार म्हणून याप्रमाणें वर्णन केलेलें आहे:—

तती भरतवंशांते भूत्वा वत्सनृपात्मजः ।

हा वहीनर बौद्धधर्माचा चागलाच आश्रयदाता होता. याच्या नांवाचें एक सुत्तच आहे, व विनयपिटकांत याविषयीं अधिक माहिती आहे असें म्हणतात.

शेवटचा जो क्षेमक तो महापद्मनंदाकडून मारला गेला; येथें भरतवंश संपला! क्षमकापर्यंत कुरुवंशांत २६ राजे झाले असें मात्स्यानें सांगितलेलें आहे:—" कुरवश्चापि षड्विंशः" ( २७२–१५ ).

मगध देशचे राजे—गौतम बुद्धाचे वेळीं मगध देशाची राजधानी राजगृह होती. तेथें तेव्हा बिंबिसार राजा राज्य करीत असे; यासच जैन श्रेणिक म्हणत. मात्स्यानें याचा ' राजानः श्रेणिबुद्धाश्च ' असा एके ठाई उल्लेख केलेला आहे. अजातशत्रूनें ( कूणिकानें ) बापास कैदेंत टाकून त्यास अन्नावाचून तडफडाट करवींत मारिलें ! हा जात्या मोठा दुष्ट होता. अजातशत्रूनें आपली राजधानी चंपानगरी केली. हा प्रथम जैन धर्मास अनुकूल होता, पण पुढें हा बौद्धांकडे वळला ! वस्तुतः याचें धर्माकडे मुळींच लक्ष नव्हतें ! पुढें यास पश्चात्ताप होऊन, पितृवधाचें प्रायश्चित्त काय म्हणून तो बौद्धास विचारूं लागला ! गौतमानें पुष्कळ उपदेश करून त्याचें मन शांत केलें, पण त्यास पितृघ्न म्हणून त्यानें संघात घेतलें नाहीं. याच्या आठव्या वर्षी गौतमबुद्ध निर्वाण पावला. शेवटीं बुद्धाच्या मरणानंतर त्याच्या अवशेषावर यानें स्तूप बांधून आपली बुद्धभक्ति व्यक्त केली ! बौद्धधर्माची पहिली महासभा भरली तेव्हां यानें सप्तपर्णी गुहेसमोर महामंडप बांधून दिला ! असो.

उदायीनें पुढें कुसुमपूर स्थापन केलें. त्याचें राज्य लोकांना पिती जाचक झालें व तो कमा मारला गेला हें मागें आम्हीं दिलेलेंच आहे.

याचा खून झाल्यानंतर, नंदिवर्धन नांवाचा राजपुत्र व त्याचा नोकर

एके दिवशीं पाटलिपुत्रांत फिरत असतां, नवा राजा नियडण्यासाठीं पट्ट-हस्ती नियाला होता. त्या हत्तीनें नंदिवर्धनाच्या छत्रधराच्या ( नोकराच्या ) गळ्यांत माळ घातली ! पण नोकरानें यजमानाचें यजमानत्व स्मरून नंदि-वर्धनासच राजा ठरविलें—व स्वतः त्याचा दास म्हणवूं लागला. याप्रमाणें नंदिवर्धन व त्याचा दास ( यासच बौद्धांनीं नागदासक म्हटलें आहे, व पुराणांनीं दर्शक म्हटलें आहे ) या दोघांनीं मिळूनच राज्य केलें ![*]

यानंतर महानंदि—त्याचा पुत्र राज्यावर आला. त्याचा पुत्र शूद्रेच्या ठाई महापद्मनंद झाला. महानंद ( दि ) च बौद्धांचा कालाशोक होय हें मागें दाखविलेलें आहे. कालाशोक ऊर्फ महानंद याचे १० वे वर्षी गौत-माच्या निर्वाणापासून १०० वर्षे झालीं. भारतीय युद्धापासून याच्या अभि-षेकापर्यंत ८३६ वर्षे गेलीं ! हाच मगध देशचा शेवटचा क्षत्रिय राजा होय ! यालाच उद्देशून पूर्वीच्या पुराणांनीं ' नंदांतं क्षत्रियकुलं ' म्हटलें असावें; कारण यानें ' ज्या नंदानें क्षत्रियकुल संपलें तो शेवटचा राजा क्षत्रियच असावा,' असा बोध होतो ! असो.

महानंद ऊर्फ कालाशोक याचा शूद्रेच्या पोटीं झालेला पुत्र महापद्मनंद होय ! हा शूद्र म्हणून त्या वेळच्या अस्सल क्षत्रिय राजांनीं यास भरदरबा-रांत मुजरा करण्याचें नाकारिलें ! तेव्हां सर्व क्षत्रियांचा यानें फन्ना उड-वून दुसरा परशुराम—क्षत्रियांतकर अशी पदवी मिळविली. ही गोष्ट इ. पू. ३८४ सालीं घडली हें मागें दाखविलेलेंच आहे.

याच्याविषयीं पुराणांनीं म्हटलें आहे कीं:—

> महानंदिसुतश्चापि शूद्रायां कलिकांशजः ।
> उत्पत्स्यते महापद्मः सर्वक्षत्रांतको नृपः ।

---

[*] ही हकीकत प्रबंधचिंतामणींत आहे. नंदिवर्धन हा उदायीचा पुत्र नसून प्रद्योतवंशांतील राजपुत्र ( उज्जनीचा ) दिसतो ! !

ततः प्रभृति राजानो भविष्याः शूद्रयोनयः ।
एकराट् स महापद्म एकच्छत्रो भविष्यति ।
अष्टाविंशति* वर्षाणि पृथिव्यां तु भविष्यति ॥
सर्वक्षत्रानथोत्साद्य भाविनार्थेन चोदितः ।

यानें सर्व क्षत्रियाचा नाश केला तेव्हां भारतीय युद्धापासून त्या त्या राजाच्या किती पिढ्या झालेल्या होत्या हें मात्स्यानें देऊन ठेविलेलें आहेः—

चतुर्विंशत्तथैक्ष्वाकाः पांचालाः सप्तविंशतिः ।
काशेयास्तु चतुर्विंशदष्टाविंशत्तु हैहयाः ॥ १४ ॥
कलिंगाश्चैव द्वात्रिंशदश्मकाः पंचविंशतिः ।
कुरवश्चापि षड्विंशदष्टाविंशास्तु मैथिलाः ॥ १५ ॥
शूरसेनास्त्रयोविंशद्वीतिहोत्राश्च विंशतिः ।
एते सर्वे भविष्यंति एककालं महीक्षितः ॥ १६ ॥

मत्स्यपुराण, अ २७२

बाकीच्या वंशाच्या राजांचीं आतां नावें मिळतच नाहींत. मगधराजाच्या पिढ्या सांगण्याचें एथें कारण नव्हतें; पण कुरूंच्या २६ व इक्ष्वाकुकुळांतील राजाच्या २४ पिढ्या अनुक्रमें क्षेमक व सुमित्र याच्यापर्यंत झाल्या ही परंपरा अतिशय महत्त्वाची होय !!!

महापद्मादि नवनंदांनीं मिळून ( २८ + २२ + २२ = ) ७२ वर्षें राज्य केलें म्हणून मागें दाखविलेंच आहे. याच्या कारकीर्दींत विशेष महत्त्वाचें कांहीं घडलें नाहीं. अलेक्झांडरची हिंदुस्थानवर स्वारी याच्याच वेळीं इ. पू. ३२७ सालीं झाली. शेवटीं इ. पू. ३१२ सालीं नंदाचा निःपात करून चाणाक्यानें चंद्रगुप्तास राज्यावर बसविलें !

---

* ' अष्टाशीति तु ' पाठभेद

सूर्यवंश—कोसलदेशाची राजधानी बुद्धाच्या वेळीं श्रावस्ती होती. तेव्हां या नगरींत प्रसेनजित् राजा राज्य करीत होता; यास तक्षशिलेच्या युनिव्हर्सिटींत शिक्षण मिळालें होतें. हा उदारमनाचा व सज्जन होता. यानें ब्राह्मण, श्रमण व श्रावक या सर्वांसच उदार आश्रय दिलेला होता. हा स्वतः बुद्धाचा शिष्य झाला; याची बहीण कोसलदेवी. बिंबिसार राजास दिलेली होती. ( अजातशत्रु–बिंबिसाराचा पुत्र–या राणीचा नसून चेलना नांवाच्या विदेहराजपुत्रीचा मुलगा होता. तिलाच विदेहा किंवा विदेहदत्ता असेंही जैनांनीं म्हटलेले आहे. )

प्रसेनजित्चा पुत्र ' शूद्रक ' किंवा ' क्षुद्रक ' या नांवाचा होता. यासच बौद्ध ' विरुद्धक ' ही म्हणत. हा बौद्धांचा मोठा शत्रु होता; याचें कारण असें कीं, प्रसेनजित्नें शाक्यकुलाशीं संबंध करण्याच्या हेतूनें एका शाक्यकन्येस मागणी केली; पण शाक्यांनीं राजकन्येशीं त्याचा विवाह न करितां, वासवक्षत्रिया नांवाच्या दासीपुत्रीशीं—ती राजकन्या आहे असें सांगून—प्रसेनजित्चा विवाह करविला, ही गोष्ट प्रसेनजितास कांहीं कळली नाहीं. पुढें शूद्रकास आपली उत्पत्ति शूद्रकन्येपासून झालेली आहे हें कळून आल्यामुळे त्यानें ५०० शाक्यकन्यांची कत्तल केली ! हा शूद्रेचा पुत्र म्हणून ' शूद्रक '; ( अबलांना मारण्याचें ) क्षुद्रकर्म यानें केलें म्हणून. हा ' क्षुद्रक '; बौद्धांशीं यानें विरोध मांडला म्हणून ते यास ' विरुद्धक ' म्हणूं लागले ! ( शाक्यांचा व प्रसेनजिताचा संबंध झाल्याप्रमाणे मात्र दिसतो; कारण पुराणांमध्यें सूर्यवंशांत शाक्यांचा संबंध आणितात. ) गरुडपुराणांत याच प्रसेनजित् व शूद्रकाचा याप्रमाणें शुद्धोदनाबरोबर व राहुलाबरोबर उल्लेख आलेला आहे:—

शुद्धोदनो राहुलश्च* सेनजिच्छूद्रकस्तथा ॥

ग. पु. १४५—८.

हाच शूद्रक राजा मृच्छकटिकाचा कर्ता असावा. कारण, प्रद्योतानें पूर्वीच्या वीतिहोत्र कुळांतील अवंतीच्या राजास मारून याचेच वेळीं तेथें आपला मुलगा पालक यास गादीवर बसविलें ! याच राज्यक्रांतीचा उल्लेख मृच्छकटिकांत आहे. 'आर्यपालक' तो हाच पालक होय. शूद्रकाच्या समोर ताजी ताजी ही गोष्ट उज्जैनीस घडली असावी. यावरून वीतिहोत्र कुळींच्या राजांना मारून प्रद्योताने आपले राज्य उज्जैनीस स्थापिलें हें स्पष्ट दिसतें; याचाच पुत्र पालक ऊर्फ आर्यपालक होय ! याच वंशातील राजपुत्र नंदिवर्धन पुढें पाटलिपुत्रांत उदायीच्या मरणानंतर राजा झाला असावा; यामुळें हे समकालीन राजे ठरतात; जसें:—

| अवंति | मगध | कोसल |
|---|---|---|
| ( प्रद्योत ) | बिंबिसार | प्रसेनजित् |
| पालक | अजातशत्रु | शूद्रक |
| विशाखयूप | उदायी | रणक |
| अजक | | |
| { कीर्तिवर्धन | नंदिवर्धन | सुरथ |
| नंदिवर्धन } | महानंदि | सुमित्र |

यावरून बहुधा असें वाटतें कीं, प्रद्योत कुलांतील अजकाचा पुत्र कीर्तिवर्धन ऊर्फ नंदिवर्धन हाच उदायीच्या मरणानंतर पाटलिपुत्रांत गेला असावा;

* 'सेनजित्सांप्रतं राजा भविष्यति समा नृप' अशी एक ओळ वायुपुराणांतही आहे. यावरून इ. पू. ७०० पासूनच पुराणाला कालानुगामित्व आणण्याचा प्रयत्न चालला होता हें कळून येईल.

व तेथे तो राजा झाला असावा. सारांश, हेही प्रद्योतवंशीय व मागधवंशीय राजे समकालीन होते; प्रद्योतवंशानंतर शिशुनागवंश आला नाही.

सुमित्र हा शेवटचा इक्ष्वाकुकुळांतील राजा होय ! यास इ. पू. ३८४ साली महापद्मानें मारिलें !

याप्रकारें बौद्धकालीन क्षत्रियराजांचे निरीक्षण केले.

## मौर्यानंतरचे राजे.

चंद्रगुप्ताचा राज्याभिषेक भारतीय युद्धापासून ९५१ वर्षांनीं व इ. पू. ३१२ वर्षांनीं झाला हें आम्हीं पाहिलेंच; आतां पुराणांच्या अर्वाचीन स्वरूपकर्त्यांनीं महापद्मापासून आंध्रांच्या अंतापर्यंत ८३६ वर्षे झालीं असें कां म्हटलें आहे, हें आपण पाहूं.

कलिंगदेशचा राजा खारवेल यानें उदयगिरी येथे ( कटकपासून १९ मैल दक्षिणेस ) हस्तिगुंफेंत एक शिलालेख कोरवून त्यांत त्याने आपल्या राज्याची कारकीर्द दिलेली आहे. हा लेख त्यानें मौर्यकालाचीं १६४ वर्षे संपून १६५ वें वर्ष चालू असतां कोरविला. खारवेलानें आपल्या राज्याच्या बाराव्या वर्षी मगधदेशच्या त्यावेळच्या राजाचा पराभव केला. ( हा राजा बहुधा पुष्पमित्र शुंग असावा.* याने आपल्या मदतीस प्रतिष्ठानच्या शातकर्णी राजाचें सैन्य मागविलें होतें. यावरून ( ३१२ -- १६५ = )१४७ इ. पू. या वेळीं दक्षिणेंत कोणी तरी एक शातकर्णी राज्य करीत होता हें स्पष्ट दिसतें.

पुराणांतील राजे सर्वच कांहीं मगधदेशचे नाहींत. पुराणांच्या अर्वाचीन स्वरूपकारांस आपल्या वेळेपर्यंत जेवढे म्हणून राजे माहीत होते

---

* पुष्पमित्रानें ३६ वर्षे राज्य केलें असें म्हटलें आहे. म्हणजे त्यानें इ. पू. १५५–११९ पर्यंत राज्य केलें. तेव्हां इ. पू. १४७ वर्षी खारवेलानें पराभव केलेला असावा.

तेवढे सर्व त्यांनीं पुराणांत नमूद करून ठेविलेले आहेत. त्यांतील कांहीं राजे मगधदेशाचे कांहीं अवंतीचे, व कांहीं दक्षिणेंतील असा प्रकार आहे. यापैकीं कित्येक समकालीन होते. वरील खारवेलाच्या लेखावरूनच पहातां, दक्षिणेस शातकर्णी वंश इ. पू. १४८ च्या पूर्वीच चालू होता हें तत्कालीन प्रमाणांवरून ठरतें. मौर्यांचा काळ सर्वही पुराणांनीं १३७ वर्षे दिलेला आहे, हा काळ बरोबरच दिसतो. तेव्हां मौर्यांचें राज्य इ. पू. ३१२ ते १७५ पर्यंत होतें असें वाटतें; त्यानंतर शुंगवंशीय राजांचें ११२ वर्षे राज्य झालें असें म्हटलेलें आहे. नंतर काण्व किंवा काण्वायनांनीं ४५ वर्षे राज्य केलें; नंतर आंध्रभृत्य आले असें म्हटलें आहे. यांची बेरीज करिता ( १३७ + ११२ + ४५ = ) २९४ वर्षे होतात; म्हणजे पुराणांच्या मताने काळ व अनुक्रम बरोबर धरिला तर आंध्रभृत्यांचा प्रारंभकाळ इ. पू. १८ हा येतो; पण मागें आपण पाहिलेंच आहे कीं, इ. पू. १४८ या पूर्वीच त्या वंशाची सुरवात झालेली असावी. यावरून पुराणाच्या सद्यःस्वरूपकारांस समकालीन राजांची कल्पना नसून त्यांनीं भिन्न भिन्न स्थळींच्या राजांचा अनुक्रम जोडला ही चूक केली हें दिसून येतें. शुंग व काण्व हे मिळूनच राज्य करीत होते, हें डॉ. भांडारकर यांनीं दाखविलेलेंच आहे. तसेंच बृहद्रथवंशीय राजे मगधदेशांत राज्य करीत असतां प्रद्योत, पालकादि वीतिहोत्र कुळीचे राजे अवंतीस राज्य करीत होते हें आम्हीं वर दाखविलेलें आहे. असो. तूर्त आम्हास पुराणांनीं ( सद्यःस्वरूपकर्त्यांनीं ) महापद्मापासून आंध्रांतापर्यंत ८३६ वर्षे कसा काळ ठरविला हें आपणास पहावयाचें आहे. अर्वाचीन पौराणिकांनीं १००+ १३७ + ११२ + ४५ + आंध्रांचा काळ यांची बेरीज करून ८३६ही वर्षसंख्या वायु व मत्स्यांत दिली असावी हें उघड होतें. तेव्हां आपण आंध्रांचा काळ वायु व मत्स्याप्रमाणें पाहूंः—( डॉ. भांडारकरांचा दक्षिणचा इतिहास. )

| नांवें, मात्स्याप्र. | काळ. | वायूप्रमाणें नावें | काळ. | विष्णु. | भागवत. |
|---|---|---|---|---|---|
| शिशुक | २३ | सिंधुक | २३ | शिप्रक | ... ... |
| कृष्ण | १८ | कृष्ण | १० | कृष्ण | कृष्ण |
| मल्लकर्णि | १० | ... ... | ... | श्रीशातकर्ण | शांतकर्ण |
| पूर्णोत्संग | १८ | ... ... | ... | पूर्णोत्संग | पौर्णमास |
| स्कंधस्तंभी | १८ | ... ... | ... | ... ... | ... ... |
| **शातकर्णि** | ५६ | **शातकर्णि** | ५६ | शातकर्णि | ... ... |
| लंबोदर | १८ | ... ... | ... | लंबोदर | लंबोदर |
| अपीतक | १२ | अपीलव | १२ | इवीलक | हिविलक |
| मेघस्वाति | १८ | ... ... | ... | मेघस्वाती | मेघस्वामी |
| स्वाति | १८ | ... ... | ... | ... ... | ... ... |
| स्कंदस्वाति | ७ | ... ... | ... | ... ... | ... ... |
| मृगेंद्रस्वातिकर्ण | ३ | ... ... | ... | ... ... | ... ... |
| कुंतलस्वाति | ८ | ... ... | ... | ... ... | ... ... |
| स्वातिकर्ण | १ | ... ... | ... | ... ... | ... ... |
| **पुलोमावि** | ३६ | **पटिमावि** | २४ | पटुमत् | अटमान् |
| गौरकृष्ण,नौरिकृष्ण. | २५ | नेमिकृष्ण | २५ | अरिष्टकर्मन् | अरिष्टकर्मन्-हालेय ... |
| **हाल** | ५ | **हाल** | १ | हाल | ... ... |
| मङ्गलक | ५ | सपूक-मंडलक | ५ | पतलक | तलक |
| पुरींद्रसेन | ५ | पुरीकषेण | २१ | प्रविल्लसेन | पुरीषभीरु |
| सुंदरस्वातिकर्ण | १ | शातकर्णि | १ | सुंदर | सुनंदन |
| चकोरस्वातिकर्ण | १ | चकोरशातकार्णि | २ | चकोर | चकोर |
| **शिवस्वाति** | २८ | **शिवस्वाति** | २८ | शिवस्वाति | शिवस्वाती |
| गौतमीपुत्र | २१ | गौतमीपुत्र | २१ | गोमतीपुत्र | गोमतीपुत्र |
| पुलोमत् | २८ | ... ... | ... | पुलिमत् | पुरीमत् |
| शिवश्री | ७ | ... ... | ... | शिवश्री | वेदाशिरस् |
| शिवस्कंध | ७ | ... ... | ... | शिवस्कंध | शिवस्कंद |
| यज्ञश्रीशातकर्णी | २९ | यज्ञश्रीशातक. | २९ | यज्ञश्री | यज्ञश्री |
| विजय | ६ | विजय | ६ | विजय | विजय |
| चंद्रश्रीशातकर्णि | १० | दंडश्रीशातकार्णि | ३ | चंद्रश्री | चंद्रविज्ञ |
| पुलोमवित् | ७ | पुलोमवि | ७ | पुलोमार्चिः | सुलोमधी |
|  | ४४८३ |  | २७२३ |  |  |

यांत मत्स्यपुराणाप्रमाणें बेरीज ४४८½ वर्षे व वायूप्रमाणें बेरीज २७२½ वर्षे होते. महापद्मापासून आंध्रांपर्यंत ८३६ वर्षे बेरीज होते असें सांगणाऱ्याच्या पुढें मात्स्याची यादी होती असें दिसून येईल; कारण [illegible] १३७ + ११२ + ४५ + ४४८½ मिळून ८४२½ वर्षे होतात. पैकीं, *मात्स्याच्या यादींतील चंडश्री-शातकर्णीचा काळ १० वर्षे न धरितां ३ च* वर्षे वायूप्रमाणें धरिला ( असा पाठ बेरीज करणाऱ्याच्या काळीं असण्याचा संभव आहे ) तर मात्स्याच्या यादीची बेरीज होते. मग ४४१½ यांची बेरीज ८३५½ वर्षे होते; *ती स्थूल मानानें ८३६ वर्षे धरिलीं असावींत.*

याप्रमाणें पुराणांच्या अर्वाचीन भविष्यलेखकांनीं महापद्मापासून आंध्रांतापर्यंत ८३६ वर्षे ठरविलीं; पण यांत भिन्न भिन्न ठिकाणच्या समकालीन राजांनीं *एकामागून एक राज्य केलें असें भासवून* त्यांची बेरीज केलेली आहे हीच चूक आहे. वरील बेरजांत वायूची संख्या २७२½ धरिली तर आंध्रांचा अंत मौर्यानंतर १३७+११२+४५+२७२½ = ५६६½ वर्षांनीं म्हणजे इ. पू. ( ५६६ – ३१२ = ) २५४ या वर्षी येतो.

आंध्रांचा ऐतिहासिक दृष्ट्या खरा अंत याच सुमाराचा आहे.( Indian Review, July 1910) च्या अंकांत रा. आय्यर हे म्हणतात कीं आंध्रांचा अंत त्रैकूटक राजा ईश्वरदत्त यानें २४९ इ. स. *च्या सुमारास* केला! वरील काळांत व यांत अगदीं थोडे अंतर आहे.

## ऐतिहासिक दृष्ट्या आंध्रभृत्यांचा काळ.

हा मि. स्मिथ व रा. आय्यर यांच्या लेखांवरून व वरील मात्स्याच्या यादींवरून व इ.पू. १४८ *च्याही पूर्वी हा वंशांचा प्रारंभ झाला होता,* या माहितीवरुन, व ईश्वरदत्तानें इ. स. २५० च्या सुमारास या वंशाचा अंत केला या माहितीवरून ठरवितां येतो. मि. स्मिथचा Early History of India हा ग्रंथ व रा. आय्यर यांचा The Saka and Samvat

Eras, हा July जुलै १९१० च्या इंडियन रिव्यूमधील लेख, हे अत्यंत महत्त्वाचे आहेत. या योगें आंध्रभृत्यांचा काळ ठरवितां येतो. रा. आय्यरनीं ४५६३ वर्षे संपूर्ण काळ धरिला आहे; पण पूर्वीच्या पौराणिक प्रमाणांवरून पाहतां हा काल ४४२ वर्षे मात्स्यानें धरिला होता असें दिसतें.

मागें दिलेल्या यादीवरून कांहीं मुख्य मुख्य राजांचे काळ ठरवितों.

( १ ) पहिला राजा शिशुक-सिंधुक-शिप्रक यासच नानाघाट शिलालेखांत सिमुक सातवाहन म्हटलेलें आहे. (इ. पू. १९१-१६८)

( २ ) कृष्ण--याचा नाशिक गुहालेखांत उल्लेख आहे. (कारकीर्द इ. पू. १६८-१५० ).

( ३ ) मल्लकर्णि—श्रीशातकर्णि—( कारकीर्द इ. पू. १५०—१४० ) कलिंगदेशच्या खारवेल राजाकडे यानें मौर्यकाल १६५ (म्ह. इ. पू. १४७ ) मध्यें दूत पाठविले.

( ६ ) शातकर्णि–( कारकीर्द १०४—४८ इ. पू. ) काळकाचार्य, नागार्जुन, व उज्जैनीचा विक्रमादित्य यांचा समकालीन होता. विक्रमादित्यास यानें नर्मदेच्या दक्षिणेस येऊं दिलें नाहीं. यानेंच बहुधा शुंगांचा अवशेष व काण्वायनवंश याचा इ. पू. ६३ वें वर्षी उच्छेद केला.*

---

* आंध्रापैकीं एका राजानें शुंगांचा अवशेष व काण्व राजे यांचा उच्छेद केला, हें डॉ. भांडारकर यांनीं दाखविल्याप्रमाणें खालील वाक्यावरून खरें दिसतें; मात्र उच्छेद करणारा सिमुक-सिंधुक ( पहिला राजा ) नसून हा सहावा शातकर्णीच असावा. यानें पाटलीपुत्रांतील शुंगांच्या अवशेषाचा व ( बहुधा विदिशा नगरींत राज्य करीत असलेल्या ) शुंगांचे पेशवे काण्व यांचा पाडाव केला असावा; शुंग मूळचे विदिशा नगरीचे राजे असून त्यांनीं पाटलीपुत्रांत राज्य करावयास लागल्यानंतर पुढें काण्वांना आपले म्हाईसराय म्हणून आपल्या पूर्वीच्या विदिशा नगरांत नेमिलें असावें. या काण्वांनीं ४५ वर्षे राज्य केलें व यांचा अंत शुंगांबरोबरच शातकर्णीनें केला. यामुळें काण्वांची कारकीर्द

( १३ ) *कुंतल—वात्स्यायनाच्या कामसूत्रांत याचा उल्लेख आहे.*

( १७ ) हाल—सप्तशतीचा वर्ता– (कारकीर्द इ. स. ९९–१०२ ) याने विक्रमादित्य व शालिवाहन ( ६ वा ) याचा सप्तशतींत उल्लेख केलेला आहे.

( २३ ) **गौतमीपुत्र**–( कारकीर्द इ. स. १४२ – इ स. १६३ यानें शक, यवन व पल्लवांचा नाश करून पुनः आपला महाराष्ट्रा-

---

[ मागील पानावरून पुढें चालू. ]

( विदिशा नगरांत ) इ. पू १०८–६३ पर्यंत झाली असावी, व शुंगांची कारकीर्द पाटलिपुत्रात इ. पू. १७५ ते ६३ पर्यंत झाली असावी. वायुपुराणांतील वाक्य असें —( *मात्स्यांतही अशींच वाक्यें आहेत* ).

**काण्वायनं ततो भृत्यः सुशर्माणं प्रसह्य तम् ।**
**शुंगानां चैव यच्छेषं क्षपयित्वा बलं तदा ।**
**सिंधुको ह्यांध्रजातीयः प्राप्स्यतीमां वसुंधराम् ॥**

यावरून आंध्र पूर्वी मगध देशाचे मांडलिक असावेत; शुंगांकडे राज्य गेल्यानंतर *त्यांनीं विदिशेंत काण्वायनास आपले प्रतिनिधि नेमून आंध्रावर नजर ठेवण्यास* सांगितलें असावें, कारण, आंध्रांपैकीं तिसऱ्या राजानें कलिंग देशाच्या खारवेल राजास मगध देशच्या राजाविरुद्ध मदत केली होती. पुढें आंध्रच प्रबळ होऊन त्यांनीं विदिशेंतील काण्वाचाही पाडाव केला व पाटलीपुत्रांतील शुंगाचाही पाडाव केला. ही गोष्ट इ. पू. ६३ वर्षी झाली. यावरून आंध्रांपैकीं एकानें काण्व व शुंगाचा नाश केल्याचें खरें दिसतें; मात्र तो पहिला सिंधुक नसून सातवा शातकर्णि असावा. डॉ. भाऊ दाजींच्या लेखसंग्रहांत, जैन परंपरेप्रमाणे **एक शातकर्णी** नागार्जुन, खपुटाचार्य ऊर्फ पादलिप्ताचार्य. व कालकाचार्य–याचा समकालीन म्हणून दिलेला आहे. तो हाच सातवा राजा असावा. कालकाचार्याच्या सूरिपदाचा काळ महावीरानंतर ४५३ वर्षे म्ह. इ. पू. ७४ पादलिप्ताचार्यांचा काळ महावीरानंतर ४८० म्ह. इ. पू. ४७. पादलिप्तानें ध्वज उभारिला तेव्हां शातकर्णी हजर होता ! ( भाऊ दाजींचा लेखसंग्रह, पृष्ठ १२६–१३१ पहा ).

वर ताबा बसविला. याच्या पूर्वी अरिष्टकर्मन—नौरीकृष्ण—या वेळीं शकां-
नीं व क्षत्रपांनीं आंध्रांचा पराभव केला होता.

( ३० ) पुलोमत्—त्रैकूटक राजा ईश्वरदत्त यानें इ. स. २४९–५० साली याचा पाडाव केला. येथेंच वंश संपला.

| मौर्य | शुंग | काण्व | आंध्रभृत्य |
|---|---|---|---|
| पाटलीपुत्र | पाटलिपुत्र | ( विदिशा!) | प्रतिष्ठान |
| ३१२ इ. पू. | | | इ. पू. १९१ |
| | इ. पू. | | |
| १७५ | १७५ | इ. पू. १०८ | |
| १३७ | | | |
| | ६३ | ६३ | |
| | +११२ | +४५ | |
| | | | इ. स. २४९ |
| | | | +४४२ |

* मोठीं वर्षे धरून पौराणिकांनीं [ नंदांचीं १०० मिळवून ] महापद्मनंदापासून आंध्रभृत्यांपर्यंत ८३६ वर्षे दिलीं ! ! !

*१ उदीर्णलोकत्रयतापवन्हिनिर्वापना .... त .... .... ....
विप्रणम्य पूर्वं प्रवक्ष्ये क्षितिपानुपूर्वा [ न् ]

२ महाविमा ( नि ? ) प्वमिवृद्धशक्ति ( : ) कुद्धत्सुरेर ( स्य )....
.... .... धारणदानशक्तिः द्विजःप्रकाशो भुवि विंध्यशक्तिः

३ पुरंदरोपेंद्रसमप्रभावः स्वबाहुवीर्याजि .... काना
बभूव वाकाटकवंशकेस [ री ? ]

४ र.... [1]हर्म्येंद्रतरणजालसञ्छादितार्क ( स्य ? ) .... ....
राति कृतावबादप्रवणाश्चकार

५ जितारिम्नरराजकार्यश्चकार पुण्येषु परप्रयत्नं विद्वक्त ....
.... नरेंद्रमौलिविन्यस्तमाणिकिरणलीढक्तमांबुजः

६ प्रवरसेनः पुत्रोभूद्विकसत्सर्वेदीवरक्षमरविमयूख .... ....
.... शासनप्रवरसेनस्य जितसर्वसेनसूतोभवत्

७ तस्य पुत्रः पार्थिवेंद्र .... .... धर्मेण मेदिनीं कुंतल ....
.... सनृपस्य पुत्रोभूत प्रवरोर्जितोदारशासनप्रवर

८ .... .... .... तस्यात्मज .... .... ....
.... प्रवरसेनस्य राज्यमष्टाब्दको यः प्रशशाससम्यक्

९ तस्यात्मजोमू ( द्भू ) वि देवसेनः यस्योपमोगैर्ललितैर्विहर्ण
.... बोप्पस्व .... मुः पुण्यानुभावात् क्षितिपस्य

---

* हे आंकडे मूळलेखांतील ओळींचे आहेत.

१ येथें ' रथस्य हर्म्येंद्रतरेणुजालसंच्छादितार्कस्य ' असें असावें; म्हणजे अर्थ चांगला लागतो. वरील अशुद्ध पाठामुळें डॉ॰ भाऊ दाजींचा ह्या ओळीचा अर्थ चुकलेला आहे.

१० राजा .... मयगुणाधिवासो यशः प्रकाशो भुवि हस्ति-
भोजः प्रश .... सः पृथुपीनवक्षाः सरोरुहाक्षंक्षपि

११ .... .... ....दिगंतहस्तिप्रतिमोऽयमूतः हितो विनी-
तः प्रणयप्र .... मनोनुकूलोनुविधानवर्ती निरत्यय

१२ .... .... कश्चत .... लोकस्य हिताशयत्वात् सुखेन
सम्यक्परिपालना....मातेव सखेव नित्यप्रियोभिगम्यश्च बभूव

१३ .... '.... त्पस्वस्थः समावेश्य स तत्र राजा ससर्ज
भोगेषु यथेष्टचेष्टः अथ तस्य सुतो बभूव

१४ व .... .... हर .... न्विहारिपाणाहरिविक्रमप्रतापः
स कुंतलावंतिकलिंगकोसलत्रिकूटलान्ध्र

१५ .... .... पिस्य निर्दोषगुणानिष्टिप्रथितो भुविहस्तिभोज-
सूनुः सचिवस्तस्य महीपतेर्बभूव क्षिति

१६ .... .... स्थिरधीरचेतास्त्यागक्षमौदार्यगुणैरुपेतः धर्मेण
धर्मप्रवणः शशास देशं यशः पुण्यगुणांशू

१७ .... शह .... .... प्रतिपुण्योपचयं परं चकार यत्....
.... सार्द्धम् .... सुनदाधिक .... चकारकारान् आयुर्व-
योवित्तसखानि

१८ .... .... पितरावुदारान्यर्वीविशद्धेश्यय .... ....
.... रुद्धताम्रभुजगेंद्राध्युषिते महीधरेंद्रे

१९ .... प .... गरानिकुञ्जे गवाक्षानि .... वीथिवेदिक ....
न्द्रकुप्रमयश्च .... तम् मनोहरस्तंभविभङ्ग

२० .... शोत .... .... तलसन्नीति .... मनोभिराम ....

महानिधाननागेन्द्रवेश्मादिभिर

२१ .... स्मरणास .... .... किरणा....वितसर्वगु (ण) प्रथित-सुखोपभोगयोगम्

२२ .... रेन्द्रमंदिराणां रुचिमंदरकन्द .... .... यथेप्सित .... समव्यतिरोचने गिरोर्वीक

२३ .... रत्नम .... क .... निदेह .... यस्य जननाम प्रीतिप्रसादविकचभणयो नवक्त्राचिताः

२४ .... ल्यसुरेंद्र मौलिप्रभाप .... .... बन्धवशात् स वराहदेवनृदेवसौख्यान्यनुभूव

२५ .... शासासुगतप्रशस्तः सान्द्रांबुदभुजंगभोग .... .... .... शीलकपिलैर्यावरकरैर्भास्वरतावच्छा

२६ .... सेव्यतामंतर्मंडप .... ल्रल्लय .... पूविम विविध-लयनसानुः सेव्यमानो महद्भिर्गिरिरय

२७ .... .... घ जगदपि च समस्तव्यस्तदोपप्रहाणान् विशतु पदमशोकं निर्ज्वरं शांतमार्य्य

या लेखाविषयीं डॉ॰ भाऊ दाजींचे उद्गार असे आहेतः—

" The inscription in its present imperfect condition would have almost failed to give us any valuable information: but taken in connection with the contents of the Seoni Copper plate grants ( Bengal Asiatic Society's Journal. vol. V. p. 729 ), and with certain passages in the Puranas, I am enabled to point out a dynasty of यवन's or Greeks in central of India, taking the lead in the performance of Vedic sacrifices, as well as executing the most substantial and costly works for the encouragement of Buddhism. The Seoni

Copper grants mention a dynasty of kings of the वाकाटक race or वाकाटक country.

The name of विंध्यशक्ति is not given in the Seoni copperplates as the poet commences his account from प्रवरसेन, but विंध्यशक्ति is stated in the विष्णु and some of the other पुराण's to have been the chief of the कैल्किल यवन's The passages in the विष्णु, वायु, मात्स्य and भागवतपुराण s are too corrupt to be annexed

The वायुपुराण makes प्रवरसेन the son of विंध्यशक्ति and describes the performance of the same sacrifices by प्रवरसेन as are noted in the Seoni plates The incription clearly describes the king विंध्यशक्ति as belonging to the वाकाटक race, whilst the Seoni grants mention प्रवरसेन as the ornament of the race—(p 68)

In the Seoni plates we have the following geneology —

प्रवरसेन.

रुद्रसेन.

पृथ्वीसेन.

प्रवरसेन.

In the inscription, I recognize, in adition to विंध्यशक्ति the 1st and 2nd प्रवरसेन, and his son देवसेन, the three intervening names being lost viz रुद्रसेन, पृथ्वीसेन and रुद्रसेन

हस्तिभोज and his son do not belong to a royal dynasty In the 15th line the son, whose name is lost, is said to have become the minister of "that king" by which I presume one of the वाकाटक dynasty was intended

What is the meaning of कैलकिल or कैलकिल ? Sir W Jones's pundit thought that there was a country of this name in the south of India and that the name of a fort called किलकिलदुर्ग in a copprplate grant was supposed to be conformatory of the Pundit's guess

Whether there was a country so named in southern India or not, the resemblance of the word to Ghulghuleh, an ancient city near Bamian, is striking. If विंध्यशक्ति was a यवन or only the chief of कैलकिल्यवन's, it is not too much to suppose that they came from Gh'ul gh'uleh, and brought with them the art of excavating caves and also of adorning them with sculptures and paintings. (p. 68, 69).

"The Ajınta inscriptions enable me to trace a dynasty of Kailakila यवन's in वाकाटक, a province between the Bay of Bengal and the श्रीशैल hills south of Hydrabad in the Deccan They appear to have ruled in eastern and central India, Shortly after the शाह or to be precise सेन kings, the successors of रुद्रदाम.* The dynasty of विंध्यशक्ति, the chief of the कैल. किल यवन's, according to some पुराण's, may be now classified as follows:—

विंध्यशक्ति.

प्रवरसेन.

रुद्रसेन, Grandson of गोतमी Daughter of the King भवनाग.

पृथ्वीसेन.

रुद्रसेन II.

प्रवरसेन II Son of प्रभावती गुप्ता, Daughter of महाराजाधिराज, श्रीदेवगुप्त.

देवसेन.

The connection of this family with the गुप्त and नाग kings is worthy of note. (p. 117)

दुसरा प्रवरसेन हा श्रीदेवगुप्ताची मुलगी जी प्रभावती गुप्ता तिचा मुलगा होता, असें सेवनी येथील ताम्रपटांत लिहिलें आहे. याकरितां

* या शाह राजांचा अगदीं अर्वाकच्या काल म्हणजे २९८ हा आहे. त्यांत २९८ + ७८ मिळविले (कारण ते शककाल योजीत) म्हणजे इ. स. ३७६ हा त्यांचा काल येतो.

आपण या गुप्तांचे काल व वंशावळी पाहूं. इसवी सनाचे ३१९ साली गुप्तकाल सुरू झाला असें इतिहासज्ञांचें मत आहे. यावरून पहातां समुद्रगुप्त ४०१ च्या सुमारास होऊन गेला असावा, व बुद्धगुप्त हा ४८४–४९९ पर्यंत राज्यावर असावा. या राजांपैकीं समुद्रगुप्ताचा लेख प्रयाग येथील एका स्तंभावर

| | |
|---|---|
| चंद्रगुप्त (I) (गुप्तकाल) | |
| समुद्रगुप्त | |
| चंद्रगुप्त II | ८२–९३ |
| कुमारगुप्त | ९०+!–१२१ |
| स्कंदगुप्त | १३८–१४१ |
| पुरुगुप्त | ... ... |
| देवगुप्त | ... ... |
| बुद्धगुप्त | १६५–१८० |

आहे. त्यानें आपल्या वेळेच्या आर्यावर्तांतील व दक्षिणपथांतील समकालीन राजांची एक यादी दिलेली आहे:—

दक्षिणापथांतील राजे.

- कोशलदेशाचा महेंद्र.
- महाकांटारकदेशाचा व्याघ्रराज.
- महेंद्रगिरी व कोट्टरकाचा स्वामिदत्त.
- ऐरंडपल्लाचा कात्यायन.
- कांचीचा विष्णु शापावमुक्त.
- नीलराजवंशाचा हस्तिवर्मा.
- Valaka वा ( व )लक देशाचा उग्रसेन.
- देवरांध्र देशाचा कुबेर.
- कोष्टलपुराचा धनंजय.

आर्यावर्तांतील राजे.

- रुद्रदत्त.
- मतिल.
- नागदत्त.
- चंद्रवर्मा.
- गणपति.
- नाग.
- नागसेन.
- अच्युतनंदी.
- बलवर्मा.

हे सर्व राजे उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांत इ० स० ४०० च्या सुमारास राज्य करीत होते. नाग, वाकाटक व गुप्त राजांचा क्रम नीट कळण्यासाठीं खालील कोष्टक देतों:—

| नाग. | वाकाटक. | गुप्त. | गुप्तकाल. | इ० स० |
|---|---|---|---|---|
| ... | | चंद्रगुप्त | | |
| (नागसेन) | | समुद्रगुप्त | | |
| भवनाग. | | चंद्रगुप्त | ८२– ९३ | ४०१–४१२ |
| गोतमी × | विंध्यशक्ति | कुमारगुप्त | ९३–१२१ | ४१२–४४० |
| | प्रवरसेन | स्कंदगुप्त | १३८–१४१ | ४५७–४६० |
| .) | रुद्रसेन | शकगुप्त | | |
| | पृथ्वीसेन | देवगुप्त | | |
| | रुद्रसेन × | प्रभावती; बुद्धगुप्त | १६५–१८० | ४८४–४९९ |
| | \| | | | |
| | प्रवरसेन | | | |
| | देवसेन | | | |

सेवनीचा ताम्रपट दुसऱ्या प्रवरसेनानें दिलेला आहे; व अजंटा येथील लेख देवसेनाचा मंत्री ( ह )* यानें लिहिलेला आहे. हा 'ह' हस्तिभोज नामक ( मंत्र्याचा ) मुलगा होता. हस्तिभोज, प्रवरसेन व रुद्रसेनांच्या वेळेस होऊन गेलेला असावा, व तो बहुधा प्रवरसेनाचा मंत्री असावा.*

* याचें नांव राहिलें नाहीं.

* The Benares copperplate grants of श्रीहस्तिनाथ are dated in the 163 ed year of the गुप्तकाल. Princep's Indian Antiquities, Vol. II. P. 251.) हा श्री हस्तिनाथ व देवसेनाच्या मंत्र्याचा बाप हस्तिभोज हे एकच असण्याचा बराच संभव आहे. १६१ गुप्तकास म्हणजे ४८२ इ. स. होय. तसेंच समुद्रगुप्ताच्या बंदी दक्षिणापथांत जो नलराजवंशांतला हस्तिवर्मा सांगितला आहे, तो बहुधा पुढील हस्तिभोजाचा पूर्वज असावा. या नलराजाच्या भेजराजांना, वाकाटक वंशाच्यांनी येऊन जिंकल्यामुळें दिलें, त्यांना जिंकून त्यांनी आपलें मंत्रिपद दिलें असावें. हे हस्तिवर्म्यापासून चालत आलें असावें.

तसेंच गोतमीचा बाप जो भवनाग तो बहुधा समुद्रगुप्ताच्या लेखात आलेल्या नागसेनाचा पुत्र असावा. नऊ नाग राजे पद्मावती, कांतिपुरी व मथुरा या शहरात व मगधदेशाचे गुप्त गंगेच्या काठानें प्रयागापर्यंत राज्य करितील असें विष्णुपुराणात म्हटलें आहे. तेव्हा समुद्रगुप्ताच्या वेळचा नागसेन याचाच पुत्र भवनाग असावा. भवनागाची मुलगी गोतमी ही बहुधा विंध्यशक्तीला दिलेली असावी, व प्रवरसेन हा गौतमी व विंध्यशक्तीचा पुत्र, व रुद्रसेन हा त्याचा पुत्र म्हणून तो गोतमीचा पौत्र होय. याच इ० स० ४०० च्या सुमाराला होऊन गेलेल्या नागसेनाचा हर्षचरितातही उल्लेख आहे. ' नागवंशाच्या नागसेनाचा घात त्याची मसलत बाहेर पडल्यामुळें, पद्मावतींत झाला ' असें हर्षचरितात म्हटलें आहे तेव्हा, समुद्रगुप्तानें जिंकिलेला नागसेन व विष्णुपुराणातील पद्मावतींतील नागराजे, व हर्षचरितातील नागवंशाचा, व पद्मावती नगराचा हा नागसेन यावरून पहाता हे सर्व एकच दिसतात. तेव्हा हर्षचरितात ज्याचा मनसोटामुळें पद्मावतीनगरींत घात झाला म्हणून सांगितल आहे, तो समुद्रगुप्ताच्या वेळचाच नागसेन असावा, व विष्णुपुराणावरून पहाता पद्मावतींतील नागराजेच श्रेष्ठ असावे समुद्रगुप्ताच्या लेखात नाग व नागदत्त असे आणखी दोन नागवंशीय राजे आहेत, ते बहुधा विष्णुपुराणात सांगितल्याप्रमाणें कांतिपुरी व मथुरा येथील नागवंशापैकीं असावेत. एकून समुद्रगुप्ताच्या वेळेसही आर्यावर्तात तीन ठाई नाग वंशीय राजे होते, व हें विष्णुपुराणाच्या वर्णनाशीं जुळतें. सेवुनीच्या ताम्रपत्रातील भवनाग हा बहुधा पद्मावतीच्या नागवंशापैकीं जो समुद्रगुप्ताचा समकालीन नागसेन त्याचाच पुत्र असावा, कारण वाकाटकवंशाचा अप्रकेसरी विंध्यशक्ति हा भलत्यासलत्या किरकोळवंशाच्या राजाची मुलगी करणार नाहीं. विष्णुपुराणावरून पहाता, व हर्षचरितावरून पहाता, पद्मावतीचे नागराजेच विशेष प्रसिद्ध होते असें दिसून येतें. असो.

याप्रकारें इ० स० ५०० च्या नतर ५०।६० वर्षेपर्यंत हा वाकाटक-वंश राहिला असावा.

या कैलकिल किंवा कैनकिल यवनानतरच्या राजाचें वर्णन कांहीं

पुराणांत आढळत नाहीं. यावरून इ० स० ५६०—६०० पर्यंत वायु, मत्स्य, विष्णु व भागवत यांना सद्य:स्वरूप आलेलें असावें. इ० स० ७०० च्या पूर्वीतर तें खात्रीनेंच आलें असावें. यास प्रमाण त्या वेळच्या समजुतीवरूनच मिळतें. पहा. या पुराणांच्या सद्यस्वरूपकर्त्यांची समजूत, तेव्हां भारतीय युद्धापासून कैलकिल यवनांच्या अखेरपर्यंत अगर आपल्या वेळेपर्यंत किती वर्षे झालीं असावींत अशी समजूत होती, हें आपण पाहूं. याच सद्य:स्वरूपकर्त्यांच्या वेळीं मागची सर्व पौराणिक कालगणना बदलून आपल्या कल्पनेप्रमाणें ती जुळविण्यासाठीं मोडी केलेली असावी, हें कळून येईल. याच वेळीं ही संख्या अशी ठरविण्यांत आली असावी:—

| | |
|---|---|
| बार्हद्रथ | १००० |
| प्रद्योत | १३८ |
| शिशुनाग | ३६२ |
| नंद | १०० |
| मौर्य | १३७ |
| शुंग | ११२ |
| काण्व | ४५ |
| आंध्र | ४५६—(४११वायु) |
| मधील राजे | १२९९ |
| | ३७४९ |
| कैलकिल | १०६ |
| | ३८५५ |

याप्रमाणें वरील पुराणांच्या सद्य:स्वरूपकर्त्यां वेळीं भारतीय युद्धापासून आपल्या वेळेपर्यंत ३७५५ वर्षे गेलीं, अशी समजूत असावी. म्हणजे तेव्हां इ०स० ७५३ चा काळ येतो. मधील राजांचा काळ कदाचित् १०९९* असेल तर मात्र ही एकंदर वर्षे ३५५५ होतात; व या बेरजेनें इ० स० ४५३ च्या सुमारचा काळ येतो. कांहीं असो. पुराणांतील कैल-

* मत्स्यपुराणांतील यामधील राजांच्या संख्यांची बेरीज केली तर ती १०५९ होते. जसें ८७ + ५४ + ३८० + १०८ + ३११ + ५२ + ६७ = १०५९ व यांत आणखी ४० वर्षे राहिलीं असतील ( एखाद्या कारकीर्दीची). यावरून १०९९ व बरोबर दिसतें; मौर्यांचे २०० सोडून दिले तर वायुप्रमाणें १२९९ वर्षे होतात !

किल यवनांवरून व त्यांच्या वाकाटकवंशीय राजांच्या ऐक्यावरून एवढें म्हणतां येईल कीं, या पुराणांस सद्यःस्वरूप इ० स० ६०० ते ७०० च्या मध्यंतरीं किंवा थोडेंसें नंतर मिळालेलें असावें. विष्णु व भागवत यांस तर ७०० च्या आंतच हें स्वरूप मिळालेलें आहे. वायु व मत्स्य यांस मात्र याहूनही थोडेसें पूर्वी म्हणजे इ० स० ४०० ते ५०० च्या दरम्यान मिळालें असावें. याचीं कारणें त्या त्या पुराणांच्या विवेचनांत दाखविण्यांत आलीं आहेत.

## पुराणांवर किती संस्कार झाले ?

हा प्रश्न अतिशय महत्त्वाचा असून, याचा उलगडा एकंदर भविष्यकालीन राजांच्या घोटाळ्यांच्या हकीकतीवरून होण्यासारखा आहे; तो असाः—

( १ ) व्यासांनीं एका पुराणाचीं अठरा पुराणें बनविलीं ! त्या वेळच्या पांडवांच्या व श्रीकृष्णांच्या हकीकती त्यांत त्यांनीं घालून कालानुगामित्व आणिलें !

( २ ) कालानुगामित्व आणण्याच्या सद्हेतूनेंच विक्रमादित्यानंतर थोड्याच काळानें सर्व पुराणें कोणीं एका सूतानें पुनरुक्त केलीं ! तेव्हां बहुधा त्यांत ' नंदांतं क्षत्रियकुलं ' व ' परिक्षितीपासून नंदाच्या ( म्ह० महानंदाच्या)अभिषेकापर्यंत ८३६ वर्षें व चंद्रगुप्त ऊर्फ महादेव यापर्यंत ९५१ वर्षें झालीं ' अशी परंपरा असावी. या वेळच्या लेखकाच्या मनांत बेरजांचा घोटाळाच नसावा. चंद्रगुप्तापर्यंतच्या परंपरेचा काळ त्यानें देऊन ठेविला असावा. त्यास नवनंदांचा काळ ७२ वर्षें हें पक्कें माहीत असलें पाहिजे; पण त्यानें तसें स्पष्ट लिहून ठेविलें नाहीं—त्यास त्याचें महत्त्व

वाटलें नाहीं ! यांच्या वेळीं कसलाच घोटाळा नव्हता. ही परंपरा बरीच प्राचीन असून-तिचा हल्लीं* मागमूसही नाहीं. ( इ० स० चा सुमार )

( ३ ) वायुपुराणास ४०० इ० स० च्या सुमारास तिसरा संस्कार घडला. हा संस्कार करणारानें वरील ८३६ वर्षे परिक्षितीपासून म्हणजे त्याच्या जन्मापासून न घेतां. त्याच्या अभिषेकापासून नंदापर्यंत म्हणजे महापद्मापर्यंत घेतलीं ! त्यामुळें त्यानें नवनंदाचा काळ असा काढला:–

९५१ पूर्वपरंपरेप्रमाणें परिक्षित् ते महादेव यांमधील काळ यातून
८५१ परिक्षितीच्या जन्मापासून अभिषेकापर्यंत १५ + व तेथून
१०० महापद्मापर्यंत ८३६ मिळून = ८५१ वर्षे वजा केलीं—व राहिलेला काळ १०० वर्षे तो नंदाचा—असा या संस्कार-

---

* विक्रमादित्याच्या वेळीं जो पुराणांवर संस्कार झाला त्यांत चंद्रसूर्यवंशाच्या यादी क्षेमक व सुमित्रांपर्यंत आणून तसेंच मगधवंशाच्या यादी महानंदिन् येच-ट्या क्षत्रिय राजा–येथपर्यंत आणून–पुढें नवनंद झाले व त्यानंतर चंद्रगुप्त झाला, एवढीच माहिती असावी; या वेळीं कालगणनेच्या परंपरा मात्र वर सांगितल्याप्रमाणें असाव्यात. या वेळच्या पौराणिकास क्षत्रियेतर राजांची हकीगत सांगण्यांत मोठासा [ interest ] हितसंबंध वाटला नसावा. फक्त त्यानें नंदा-नंतरच्या चंद्रगुप्ताचा काळ मात्र ९५१ वर्षे हा देऊन ठेविला असावा. या वेळीं पुराणांत चंद्रगुप्तानंतरच्या यादी जोडण्यांत बहुधा आल्या नसाव्यात. त्या आंध्रां-नंतर मत्स्यपुराणांत कोणीतरी जोडल्या व नंतर कांहीं काळानें वायूंतही स्वतंत्र-पणें दुसऱ्यानें जोडल्या. त्या जोडणाऱ्यानें परीक्षितीपासून नंदापर्यंत ८३६ व नंदापासून आपल्या वेळेपर्यंत प्रत्येक वंशाचीं वर्षे मोजून ८३६ वर्षे दिलीं, असें लिहून ठेविलें. हा संस्कर्ता आंध्रांनंतरचा दिसतो. यानें चंद्रगुप्तापासून तों आंध्रा-तापर्यंत यादी पुराणांत जोडल्या असाव्यात. ( सुमारें इ. स. १००– १५० ) प्रत्येक वेळीं ' पुराणसंस्था ' कायम ठेवण्याची इच्छा स्पष्टतेस देते.

कर्त्यानें हिशेब केला. यामुळें, त्यानें नवनंदांस १०० वर्षें ठरविलीं ! म्हणजे पूर्वीच्या खालील परंपरेच्या जागीं हल्लींची दुसरी अशी परंपरा आली:—

| | | | |
|---|---|---|---|
| महानंदाप. | ८३६ | १५ | परिक्षितजन्म ते अभिषेक |
| महानंद | ४३ | ८३६ | अभिषेकापासून महापद्म |
| नवनंद | ७२ | १०० | इ० स० नवनंद |
| ( इ०स० ) | ९५१ | ९५१ | ४०० |

या संस्कारकर्त्यानें लिहिलें कीं:—

*महादेवाभिषेकात्तु जन्म यावत्परीक्षितः ।*
एकवर्षसहस्रं तु ज्ञेयं पंचाशदुत्तरम् ॥
प्रमाणं वै तथा प्रोक्तं महापद्मांतरं च यत् ।
अंतरं तच्छतान्यष्टौ षट्त्रिंशच्चासमाः स्मृताः ॥

याच संस्कारकर्त्यानें बहुधा १०० + १३७ + ११२ + ४५ + ४४२ यांची बेरीज ८३६ वर्षें करून लिहिलें कीं:—

*एतत्कालांतरं भाव्या आंध्रांता ये प्रकीर्तिताः ।*
*भविष्यज्ञैश्च संख्याताः पुराणज्ञैः श्रुतर्षिभिः ॥*

यावरून, याचे काळीं चंद्रगुप्तापासून पुढील राजाचीं वर्षें पूर्वीच्या पौराणिकांनीं बरोबर देऊन ठेविलीं होतीं असें दिसतें. तसेच यावरून, मत्स्यपुराणाचें आंध्रांच्या ४४२–४४८½ वर्षांच्या तपशिलाचें स्वरूप *वायुपुराणाच्या* या सुमारच्या ( ४०० इ० स० ) स्वरूपाहून प्राचीनतर दिसतें. ( ४ ) नंतर मत्स्यपुराणाच्या उपान्त्य संस्कर्त्यानें वरील ' महादेवाभिषेकात्तु ' इ० श्लोक वायुपुराणांत पाहून त्याचा अर्थ ' महापद्माभिषेकात्तु ' असा करून खालील श्लोक लिहिला:—

व यानें वरील लेखकापासून ' महापद्मापासून आंध्रांच्या अंतापर्यंत ८३६ वर्षें झालीं, ' हें विधान चुकीच्या भाषांतररूपानें उतरून घेतलें !

' महापद्माभिषेकात्तु जन्म यावत्परीक्षितः ।
एकवर्षसहस्रं तु ज्ञेयं पंचाशदुत्तरम् । '

( ५ ) नंतर विष्णुपुराणानें ' एकवर्षसहस्रं तु ज्ञेयं पंचाशदुत्तरम् ' याचा अर्थ १०५० किंवा पाठभेदानें १०१५ घेऊन ' परीक्षितीच्या जन्मापासून नंदांच्या अभिषेकापर्यंत १०१५– किंवा १०५० वर्षें झालीं, १५०० कांहीं नाहींत असें सप्तर्षिपरिगणनेच्या भाषांतरद्वारें ठरविलें !

( ६ ) भागवतानें याचीच कॉपी केली व १०० वर्षें वाढविलीं तीं कां हें मात्र बरोबर समजत नाहीं ! हा नुसता लेखक-प्रमादही असेल !

( ७ ) त्यानंतर इ० स० ५५०–७०० च्या सुमारास सर्वही पुराणांस कैनकिलयवनांनंतर सद्यःस्वरूप मिळून त्या वेळच्या ३६००–३७०० वर्षांतून आंध्रांतापर्यंतचा २३५० वर्षांचा* ( सर्व बेरजा करून आलेला ) काळ वजा करून आंध्रांतापासून या यवनांपर्यंत १३९९ वर्षें ठरविण्यांत आलीं ! या वेळीं, ' कलिप्रारंभ इ० स० ३१०२ साली सुरू झाला ' अशी कल्पना प्ररूढमूळ झाली होती. म्हणून या वेळच्या संस्कर्त्यांनें सर्व पर्यांच्या बेरजा करून त्याच्या वेळीं प्रचलित काळीं आंध्रांअखेरपर्यंतचीं २३५० वर्षें वजा करून–मधील राजांना काळ १३९९ वर्षें ठरविण्यांत आला !

* ' आंध्रांच्या अंतापर्यंत सप्तर्षि २४ वें नक्षत्रानें येतील ' या परंपरेचें हें चुकीचें भाषांतर होय ! २३०० हून अधिक व २४०० हून कमी इतका काळ बेरजा करून ठरविण्यांत आला ! ! ८३६ + ८३६ = १६७२ ये ऐवजीं बेरजांनीं आंध्रांतापर्यंत २३५० वर्षें या संस्कर्त्यांनें ठरविलीं ! ! ! मागाहून [illegible] ! ! !

या संस्कर्त्यानें वायु व मात्स्य यांतील खालील श्लोक* पाहून त्याचा अर्थ " २३०० वर व २४०० च्या आंत " पांडवांपासून आंध्रांच्या अखेरपर्यंत वर्षे झालीं " असा घेऊन, नंदांपासून आंध्रांपर्यंतचीं त्यास ठाऊक असलेलीं ८३६ वर्षे २३५० मधून ( ही २३००—२४००मधील संख्या घेऊन ) वजा केलीं ! ! एवढा काळ यानें भारतीय युद्धापासून नंदांच्या प्रारंभापर्यंत ठरविला असावा; जसें २३५०–८३६ = १५१४ वर्षे—यानें महापद्मनंदापर्यंत ठरविलीं ! पण याच वेळच्या मनुष्यानें आंध्रांची एकंदर बेरीज ४६० वर्षे दिली आहेत ! ८३६ ही रकम आध्रांचा काळ ४४२ वर्षे धरून आलेली आहे. यानें ४६० आंध्र, + ४५ काण्व, + ११२ शुंग, + १३७ मौर्य + १०० नंद अशीं वर्षे धरून ८५४ वर्षे धरिलीं असावीं अगर कांहीं किंवा बहुतेक पुराणांनीं ४५६ वर्षे आध्रांचीं धरिलीं आहेत तशीं धरिलीं तर बरोबर ८५० च वर्षे होतात, तीं त्यांनीं २३५० तून वजा करून १५०० वर्षे बरोबर परिक्षितीपासून नंदांपर्यंत ठरविलीं ! ! ! मग त्याचे १००0+ १३८ + ३६२ ( = १५०० ) असे विभाग पाडिले ! भिन्न ठिकाणच्या समकालीन राजांच्या बेरजा केल्या ! ! ! याचे वेळीं नंदापासून आंध्रांतांपर्यंतचा काळ ८३६ – ८५० किंवा ८५४ हा ठरलेलाच होता. तो या संस्कर्त्यास बदलणें शक्य नव्हता ! मग त्यानें मागच्या राजाचे काळ वाढवून देऊन १५०० वर्षे केलीं ! ! !

> सप्तर्षयो मघायुक्ता काले पारीक्षिते शतम् ।
> ब्राह्मणास्तु चतुर्विंशो भविष्यंति शतं समाः ॥ मत्स्य.

---

*सप्तर्षयो मघायुक्ता काले पारीक्षितेऽभवन् ।
आंध्रांते च चतुर्विंशे भविष्यंति मते मम ॥ वायु.

## भारतीय युद्धाचा काळ.

भारतीय युद्धाचा वर ठरविलेला काळ ( इ. पू. १२६३ ) खरा आहे याबद्दल नवीनच कांहीं प्रमाणेंही उपलब्ध झालेलीं आहेत. पृथ्वीराजरासो या ऐतिहासिक काव्याचा कर्ता चंदबरदाई यानें पृथ्वीराजाविषयीं अनेक हकीकती दिलेल्या आहेत; यांतच त्यानें पृथ्वीराजाविषयीं काळही दिलेले आहेत. चंद कवीच्या या काळांविषयीं व त्या वेळच्या इतर कालगणना दर्शविणाऱ्या ताम्रपटादि लेखांविषयीं हिंदी हस्तलिखित प्रतींच्या शोधाबद्दल ( १९०० सालचा ) रिपोर्ट करणारे पंडित श्यामसुंदरदास बी. ए. यांनीं चर्चा केलेली आहे. चंदानें पृथ्वीराजाच्या चरित्रांतील काळ असे दिलेले आहेत:—

| गोष्टी | रासोचे काळ | पृथ्वीराजाचें वय. | खरे काळ विक्रम संवत् | अंतर |
|---|---|---|---|---|
| जन्म | १११५–१६ | | १२०५ - ६ | ९०–९१ |
| दत्तक | ११२२–२३ | ७ | १२१२–१३ | ९०–९१ |
| कनोजला जाणें | ११५१–५२ | ३६ | १२४१–४२ | ९०–९१ |
| शेवटचें युद्ध | ११५८–५९ | ४३ | १२४८–४९ | ९०–९१ |

याप्रमाणें या चारी गोष्टींच्या काळाविषयीं प्रचलित विक्रम संवताशीं नेमानें ९०—९१ वर्षांनीं कमी असा काळ चंदानें रासोमध्यें दिलेला आहे. हें ९०–९१ वर्षांचें अंतर नियमितपणें कां पडावें, याविषयीं शोध करीत असतां पंडित श्यामसुंदर यांस आढळून आलें कीं त्या काळच्या इतर ताम्रपटादि लेखांतील काळांतही विक्रमसंवताशीं ९०–९१ वर्षांचें अंतर पडतें. चंदाच्या व या ताम्रपटांच्या काळांवरून वरील लेखक म्हणतात कीं:—

"From what has been stated above, it is clear that the dates as assigned by chance in his Râso to the occurrence of different events are not wrong, but are strictly in accord with the dates of the era which was then current in the court papers and which was antedated by 90-91 years from the current era of Vikrama. This new era, then, is the only thing which can explain the *uniform* difference of 90-91 years between the dates of inscriptions which are in accordance with the current era and the dates of the Râso and the parvans and pattas which are 90-91 years behind the era of Vikrama." Report on the search of Hindi Mss, p. 9.

या नव्या काळाची गुरुकिल्ली पं. मोहनलाल विष्णुपाल पांड्ये व पं. श्यामसुंदर यांच्या मतें चंदाच्या ग्रंथाच्या पहिल्या पुस्तकांतील ३५६ व्या रूपकांत आहे. हें रूपक असें.

एकादस सै पंच दह । विक्रम जिम ध्रम सुत्त ।
त्रतिय साक प्रथिराज कौ । लिष्यौ विप्रगुन गुत्त ॥

"युधिष्ठिराच्या नंतर १११५ वर्षांनीं ज्याप्रमाणें विक्रम संवत् प्रचलित झाला, त्याचप्रमाणें विक्रमानंतर तितक्याच वर्षांनीं मी पृथ्वीराजाचा काळ प्रचलित करितो. पृथ्वीराजाचा काळ चंदाच्यामतें, अनंद विक्रमसंवतप्रमाणें १११५ च आहे. हा अनंद-विक्रम-संवत् नव्यानें बनविलेला आहे. चंद म्हणतोः—

एकादस सै पंच दह । विक्रम साक अ-नंद ।
तिह रिपुजय पुरहरनकौ । भय प्रिथिराज नरिंदा ॥

आनंद याच्या अर्थाबद्दल वाद होता; पण वरील पंडितद्वयांच्या मतें याचा अर्थ असा आहेः—

या श्लोकांचा खरा अर्थ काय आहे हें आम्हीं मागें दाखविलेलेंच आहे. सप्तर्षि मघांत भारतकाळीं होते ! म्हणजे १० वे नक्षत्रांत होते ते आंध्रां-अखेर २४ वे नक्षत्रीं येतील ! ! ! म्हणजे ( २४–९ = १५ ) सुमारें १५०० वर्षें मध्यंतरीं जातील. हा अर्थ सोडून देऊन 'चतुर्विंशे' याचा अर्थ २३०० वर व २४०० पेक्षां कमी–अत एव २३५०' असा करून त्यांतून ८५० वर्षें वजा करून १५०० वर्षें हा काळ नंदांपर्यंत ठरविण्यांत आला ! ! ! असो.

पुराणांतून एकंदर तीन परंपरा आढळतातः—

( १ ) परिक्षितापासून नंदांपर्यंत ८३६ वर्षें व तेथून आंध्रांतापर्यंत ८३६ वर्षें मिळून आंध्रांतापर्यंत १६७२ वर्षें.

( २ ) पुराणांत बार्हद्रथवंशास १००० वर्षें + प्रद्योतवंशास १३८+ शिशुनागवंशास ३६२ वर्षें अशी मिळून नंदांपर्यंत १५०० व तेथून आंध्रांतांपर्यंत ८५० वर्षें याप्रमाणें २३५० आंध्रांतापर्यंत ठरविण्यांत आलीं ! तीं वरील श्लोकाच्या चुकीच्या अर्थामुळें होय.

( ३ ) कैनकिलयवनांनंतर त्या वेळच्या लेखकाच्या वेळीं कलीचीं जवळ जवळ ३७००–३८०० वर्षें झालीं अशी समजूत असावी. तेव्हां त्यानें ३७००–३८०० मधून २३५० वर्षें वजा करून १३५०–१४५० वर्षें मधील राजांस दिलीं ! मधील राजांस १३९९ व कैनकिलांस १०६ वर्षें याप्रमाणें ( २३५० + १३९९ + १०६ = ) ३८४५ वर्षें त्यानें दिलीं आहेत–त्यावरून हा लेखक इ० स० ( ३८४५ – ३१०२ =) ७४३ च्या सुमाराचा असावा. हाच पुराणाचा शेवटचा संस्कार ! कोणी मधील काळ १०९९ धरितात; तर त्या वेळचा लेखक ( १३५० + १०९९ + १०६ = ) ३५४५ कलिकालचा ठरतो. म्हणजे तो ४४३ इ० स० च्या सुमारचा असावा. हाच दुसऱ्या संस्कारांचा काळ असावा.

सारांश, इ० स० ४५० ते ७५० पर्यंत पुराणांस हल्लींचें स्वरूप मिळालें आहे. कैनकिल खरोखर ५५० च्या सुमारास संपले. त्यानंतर ५०–६० वर्षांनीं म्हणजे ६०० च्या सुमारास शेवटच्या भविष्याचा संस्कार झाला ! ! !

यावरून, तीनचार भिन्नभिन्न पुराणसंस्कर्त्यांच्या मतानें पौराणिक कालगणना तीनचार भिन्नभिन्न तऱ्हेची व कोणकोणत्या चुकीच्या समजांनीं झाली हे नीट कळून येईल अशी आशा आहे. हीं सर्व घोटाळ्यांचीं भविष्यें एकाच व्यासांचीं असणें शक्य नाहीं ! ! !

आंध्रांचा अंत २५० इ० स० व यवनांचा प्रारंभ ( सुमारें ४५० इ० स० ) यांत खरोखर २००–२५० वर्षांचें अंतर आहे; पण एवढा मध्यंतरीं जो कालावकाश देण्यांत आला तो या संस्कारकर्त्यांचा वेळीं प्रचलित कलीचीं ३७००–३८०० वर्षे झालीं होतीं–त्यांशीं वरील सर्व रकमांचा मेळ घालण्यासाठीं होय ! ! !

**यावरून, पुराणांत भिन्नभिन्न काळच्या व समजुतींच्या व्यक्तींनीं कशीं भविष्यें जोडून तीं वाढविलीं आहेत, हें कळलें !** पण, या भविष्यभागांखेरीज सर्व भाग जुनेच आहेत; फक्त कांहीं पुराणांत मतप्रावल्याच्या वेळीं कांहीं भाग मात्र जोडण्यात आले असावेत. हें भविष्याचें प्रकरण इ० स० ४०० सुमारास ब्रह्मांडपुराण वालीद्वीपास गेले तेव्हां त्यांत नव्हतें ! यावरून, हीं भविष्यें व्यासांचीं नसून भिन्नभिन्न समजुतींच्या व काळांच्या अर्वाचीन लेखकांचीं आहेत, हे निःसंशय सिद्ध होते.

—

"Anand means one hundred *Minus* nine *i. e.* ninety one or ninety, the deduction of which numbers from the Vikrama era justifies chand'sa chronology."

अद्यापि मेवाडमध्यें पूर्वी तेथें दोन विक्रम संवत् चालू असल्याविषयींच्या परंपरा आहेत. टॉडनें ही गोष्ट द्वारावतीच्या हकीकतींत दिलेली आहे; पण तेथें या दोन संवतमधील अंतर त्यानें ९० वर्षे दिलेलें नसून १०० वर्षे दिलेलें आहे.

चंदानें रासोमध्यें दिलेले काळ काल्पनिक नसून अ-नंद विक्रम-संवत-चे आहेत; अनंद-विक्रम संवत् चंदानें प्रवृत्त केल्यासारखा दिसतो. इ. स. च्या बाराव्या शतकांत राजपुतान्यांत दोन विक्रमसंवत् चालू होते. एक सनंद विक्रमसंवत्, ज्याचा प्रारंभ इ. पु.५७ हा होता तो; व दुसरा अ-नंद विक्रमसंवत्-ज्याचा प्रारंभ पहिल्याहून ९०–९१ वर्षांनीं अर्वाचीन तर ठरविण्यांत आला. तो ( Athenaeum, June 9 th, 1888 पहा ). चंद कवि पृथ्वीराज ज्या वर्षी जन्मला त्याच वर्षी जन्मून तो मेला त्याच वर्षी मेला असें म्हणतात. चंदानें दिलेले काळ चुकीचे व काल्पनिक नसून ते अनंद विक्रम संवतचे आहेत. असो.

चंदाच्या ग्रंथांतील पहिल्या पुस्तकांतील ३५६ व्या रूपकावरून एक गोष्ट लक्षांत येते; ती ही की युधिष्ठिरापासून ( विक्रमापूर्वीच्या अनंद ) विक्रमापर्यंत १११५ वर्षे झालीं; त्यांत ९०+९१ वर्षे मिळविलीं तर १२०५–६ हा विक्रमसंवत् होय ! यांत ५७ इ. पु. असल्यामुळें तीं वर्षे मिळविलीं तर इ. पु. १२६२+६३ हाच युधिष्ठिराचा म्हणजे भारतीय युद्धाचा काळ येतो. चंदाची भाषा मला नीट कळली नाहीं; तात्पर्य हेंच दिसतें.

सिपार, मिभरत शाहनामा नांवाचा एक ग्रंथ आहे. तो हिंदींत असून त्यांत युधिष्ठिरापासून शाहआलमपर्यंत राज्यपरंपरा व राज्यकाळ दि-

लेला आहे. या मिश्रानें या परंपरा कोठून घेतल्या हें मात्र कळत नाहीं. पण यावरून उत्तरहिंदुस्थानांत चंद, मिश्र वगैरे कवींच्या काळीं भारतीय युद्ध होऊन किती काळ झाला याविषयीं सच्या ऐतिहासिक परंपरा असाव्यात असें दिसतें.

मिश्रानें अशी परंपरा दिलेली आहे कीं युधिष्ठिरापासून ( भारतीय युद्धापासून ) पृथ्वीराजाच्या अंतापर्यंत ( सं. १२४८ ) एकंदर २४५४ वर्षें झालीं होतीं ! ही परंपरा अत्यंत महत्त्वाची होय !

" कलजुगसे राजा जुधीष्ठलमे अवतारात खुद तीश पुस्त ३० बरीस २४५४ महिना ६ रोज १५ राजकिया जुदोष्ठलकी अवलादनें !"*

यात युधिष्ठिराच्या वंशाने २४५४ वर्षें राज्य केल्याचा उल्लेख आहे. नंतर मुसलमानी राज्य दिल्लीस झाले ! पृथ्वीराज चव्हाण हा संवत १२४८ म्हणजे इ. स. ११९१ सालीं पतन पावला, नंतर दिल्लीस मुसलमानी राज्य झालें ! यावरून २४५४—११९१ =) १२६३ इ पू. च भारतीय युद्ध झालें असें सिद्ध होते !

या मिश्राच्या परंपरेवरून असें दिसतें कीं, चंदानें विक्रम पूर्वीचा व नंतरचा असे दोन अनंद विक्रमसवत् कल्पिले असावेत; व त्या दोहोंपासून युधिष्ठिर व पृथ्वीराज १११५ वर्षांच्या अंतरावर होते. जसें:—

| | | |
|---|---|---|
| ( १ ) भारतीय युद्धापासून विक्रमपूर्व अनंद सवत् | १११५ | १२०५ ६ |
| ( २ ) अनंदापासून खरा विक्रम | ९० ९१ | ( ५७ इ. पू. ) |
| ( ३ ) विक्रमानंतरचा अनंदसंवत् | ९० ९१ | |
| ( ४ ) त्यापासून पृथ्वीराजाचा जन्म | १११५ | |
| | १२०५ ६ | |

* Annual Report on the search of Hindi Mss. for the year 1904 p 76, Ms. No 117.

सारांश चंदाचा अर्थ असा दिसतो की युधिष्ठिरापासून सध्या विक्रमापर्यंत जितका ( ११९५ + ९० -- ९१ ) काळ गेला, तितकाच काळ, विक्रमापासून पृथ्वीराजाच्या जन्मापर्यंत ( ११९५ + ९०-९१ ) गेला. असो. या दोन्ही परंपरावरून इ. पू. १२६३ हाच भारतीय युद्धाचा काळ ठरतो.

*मिश्र याच्या शाहानाम्यात जी २४५४ वर्षांची परंपरा दिलेली आहे* तिलाच जुळती अशी दुसरी एक परंपरा -पण चुकीनें दिलेली- कै. गोडबोलें यांच्या ' अर्वाचीन कोशा ' त दिलेली आहे:—

पृ. २२० " युधिष्ठिरापासून पृथुराजापर्यंत हिंदु राजाची बादशाही ४२९४ वर्षेपर्यंत भरतखंडात निर्वेध चालली होती " ( हिंदुस्थानचा हस्तलिखित इतिहास. )

ही ४२९४ वर्षांची परंपरा कलीपासून अगर युधिष्ठिरापासून पृथुराजापर्यंत जी धरिली आहे ती तशी न धरिता, ती कल्पापासून धरिली म्हणजे ही परंपरा मिश्राच्या शाहानाम्याच्या परंपरेशी जुळते. पृथुराजाच्या अंतापर्यंत ४२९३ वर्षे संपून ४२९४ वें सुरु होतें एवढें खरें; पण ही वर्षे *कल्पाच्या प्रारंभापासून झाली, कलीच्या प्रारंभापासून नव्हे.*

४२९३ कल्पापासून पृथुराजा अखेर.
१८३९ कल्पापासून भारतीय युद्धापर्यंत.
२४५४ भारतीय युद्धापासून पृथुराजाच्या अंतापर्यंत(११९१इ.स.)

सारांश, ४२९३ वर्षे संपून ४२९४ वें वर्ष जें इ. स, ११९१ मध्यें चालू होतें तें कल्पारंभापासून होय. *याविषयी पुढें खुलासा होईल.*

## राजतरंगिणीचें प्रमाण.

राजतरंगिणीमध्यें गोनर्दादि राजांनीं कलींत १२६८ वर्षे राज्य केलें असें म्हटलें आहे:—

> अष्टषष्ट्यधिकामब्दशतद्वाविंशतिं नृपा. ।
> अर्पीपलस्ते काश्मीरान्गोनर्दाद्या कलौ नृपा ॥ १–४८ ॥

कल्हणानें या गोनर्दादि कलियुगीय राजाविषयीं प्रस्तावनेंत लिहिलें आहे कीं.—

| | | | |
|---|---|---|---|
| गोनर्दादि | ४ | राजे | ( नीलमतावरून ) घेतले. |
| मधील | ३५ | | ( याची हकीकत मिळत नाहीं ) |
| लवादि | ८ | ,, | पद्ममिहिराच्या ग्रंथावरून. |
| अशोकादि | ५ | ,, | छविल्लाकराच्या ग्रंथावरून. |
| एकूण | ५२ | राजे. | |

कल्हणाच्या काळीं कलिप्रारंभ इ. पू. ३१०२ सालीं झाला ही समजूत होती, तसेंच, पांडवांचा व त्यांचा समकालीन पहिला गोनंद यांचा काळ ठरवितेवेळीं, कल्हणानें गर्गाच्या ' आसन्मघासु मुनय ' या श्लोकावरून, तो काळ ( ३१७९–२५२६ = ) ६५३ कलि असा ठरविला. याच्या काळीं दोन परंपरा कालमानाविषयीं मागील ग्रंथांत नमूद होत्या, एक वर सांगितलेली गोनर्दादि ५२ राजांना कलींत १२६८ वर्षे राज्य केलें ही व दुसरी गोनर्दापासून शके १०७० पर्यंत सुमारें २३३० वर्षे गेलीं ।

> प्रायस्तृतीयगोनर्दादारभ्य शरदा तदा ।
> द्वे सहस्रे गते त्रिंशदधिकं च शतत्रयम् ॥ १–५३ ॥

## कल्हण कालानुक्रम असा:—

| | | |
|---|---|---|
| | ३१७९ | कलिप्रारंभ. |
| शकपूर्व | २५२६ | ६५३ कलि, पांडव व पहिला गोनर्द. |
| ,, | १२६० | १२६६ वर्षे दिलीं आहेत. (पहिल्या गोनर्दा- |
| ,, | १२६० | पासून तिसऱ्या गोनर्दापर्यंत ).* |
| ,, | ते शक १०७० | तिसऱ्या गोनर्दापासून शक १०७० पर्यंत २३३० वर्षे. |

' कोणत्या तरी एका ' गोनर्दापासून शके १०७० च्या सुमारास प्रायः-२३३० वर्षे गेलीं, ही एक परंपरा, व दुसरी गोनर्दादि राजे कलींत १२६८ वर्षे राज्य करीत होते ही एक परंपरा—अशा दोन परंपरा कल्हणाच्या वेळीं होत्या. वर लिहिलेल्या ५२ राजांपैकीं अशोकादि ५ राजांत अशोक, जलौक, दामोदर, हुष्क, जुष्क, कनिष्क, व अभिमन्यु हे आहेत. शेवटच्या अभिमन्यूच्या वेळीं चंद्राचार्यांनें महाभाष्याचा काश्मीरांत प्रचार करून स्वतःचें चंद्रव्याकरणही केलें. यामुळें महाभाष्यानंतरच( इ. पू. १४४ ) अभिमन्यु झाला हें कळतें. तसेंच अभिमन्यूच्या वेळीं नागार्जुन बोधिसत्व होऊन गेला. त्याचा काळ जैनप्रमाणांवरून इ. पू. पहिलें शतक क ठरविलें येतें; शिवाय कनिष्कादिकांचे काळही कोणी कोणी इ. पू. पहिलें शतकच धरितात. या सर्व पुराव्यावरून एवढें सिद्ध होतें कीं अभिमन्यु हा. इ. पू. ४०—ते इ. स. २०—४० वर्षे पर्यंत केव्हां तरी

* वर्षाणां द्वादशशती षष्टिः षड्भिश्च संयुता ।
भुभूजां कालसंख्यां तद्द्वापंचाशतो मताः ॥ १—५४
प्रायस्तीयगोनर्दात् आरम्भ शरदां तदा ।
द्वे सहस्रे गते त्रिंशदधिकं च शतत्रयम् ॥ १—५३

होऊन गेला असावा; व पहिल्या गोनर्दापासून याच्या अखेरपर्यंत कल्हणानें दिलेल्या पहिल्या जुन्या परंपरेप्रमाणें १२६८ वर्षे गेलीं ! या प्रमाणानेंही भारतीय युद्धाचा, पांडवांचा व पहिल्या गोनर्दाचा काळ इ. पू. १२६३ असण्यास कांहींच हरकत नाहीं.

कल्हणानें पांडव गतकालि ६५३ वर्षी मानलेले आहेत व यास 'आसन्मघासु मुनयः' याचा चुकीचा आधार दिलेला आहे. तिसऱ्या गोनर्दापासून तों शके १०७० पर्यंत प्रायः २३३० वर्षे असें जें कल्हणानें म्हटलें आहे, तें बहुधा तिसऱ्या गोनर्दापासून नसून दुसऱ्या किंवा पहिल्या गोनर्दापासूनच असावें; असें धरिल्यासही पांडवांचा काळ [ २३३० — ( १०७० + ७८ ) म्हणजे ] इ. पू. ११८२ येतो. हा काळ दुसऱ्या गोनर्दापासून धरिल्यास व पहिल्या ते दुसऱ्या गोनर्दापर्यंतचीं ७१ वर्षे यांत मिळविलीं तर इ. पू. १२५३ हा पहिल्या गोनर्दाचा काळ येतो. २३३० वर्षे हीं बरोबर नसून प्रायः असल्यामुळें व यशोवतीच्या राज्यवर्षांची संख्या दिलेली नसल्यामुळें इ. पू. १२५३ हा पहिल्या गोनर्दाचा काळ येतो. तिचा कांहीं काळ मिळविला तर पहिल्या गोनर्दाचा आम्हीं ठरविलेला इ. पू. १२६३ हाच काळ येईल. पण यास २३३० वर्षे सुमारें दुसऱ्या गोनर्दापासून शके १०७० म्ह. इ. स. ११४८ पर्यंत गेलीं असें मानावें लागतें, व हेंच संभवनीय आहे. यास पुढेंही कारणें दिलेलीं आहेत. कल्हणानें काश्मीरी इतिहासाच्या काळगणनेंत भारीच गोंधळ उडवून दिलेला आहे. त्याच्यापुढें, मागें सांगितलेल्या दोन परंपरा होत्या; पैकीं दुसरी परंपरा कल्हणमतें जरा विपर्यस्त केलेली असावी. या दोन्ही परंपरा मीं काढलेल्या भारतीय युद्धाच्या काळाला ( इ. पू. १२६३ ) कशा पोषक आहेत हें वर दाखविलेंच आहे. या दृष्टीनें काश्मीरी काळ असें ठरविणें जरूर आहे.

गोनर्दीय

५ पहिला गोनर्द — सुमारें १२६३ इ. पू.

दामोदर +

यशोवती

दुसरा गोनर्द — ,, ११८२–९२ इ. पू.

मधील ३५ राजे—यांपैकींच २१ राजे बहुधा कल्हणानें किंवा त्या पूर्वींच्या एकाद्यानें अभिमन्यूनंतरचे म्हणून दिलेले असावेत. त्याशिवाय, द्वितिय तरंगाच्या प्रारंभीचा प्रतापादित्य शकारि विक्रमादित्याचा समकालीन अशी पुर्वीची परंपरा नसती.* कल्हणानें स्वतः घोटाळा करून उगीच दुसऱ्यांना दोष दिलेला आहे असे स्पष्ट दिसतें. त्यानें दिलेले तिसऱ्या गोनर्दापासूनचे २१ राजे हे बहुधा दुसऱ्या गोनर्दापुढील ३५ विस्मृत राजांपैकींच असावेत यानंतर

लवादि ८ राजे झाले; व नंतर

अशोकादि ५ राजे झाले; यांचा अनुक्रम असाः—

१ अशोक — कनिष्काचा काळ इ. स. पू. पहिले शतक

२ जलौक* — कित्येक समजतात; व अभिमन्यु इ. पू.४०

---

* अथप्रतापादित्याख्यःतैरानीयदिगंतरात् ।
विक्रमादित्यभुभर्तुर्ज्ञातिरत्राभ्यषिच्यत ॥ २–५,
शकारिर्विक्रमादित्य इति संभ्रममाश्रितैः ॥
अन्यैरथान्यथाऽलेखि विसंवादि कदर्थितम् ॥ २–६

यावरून, कल्हणापूर्वींच्या कित्येक लेखकांचे मत, प्रतापादित्यराजा हा शकारि विक्रमाचा संबंधिक होता, असें असल्याचें कळून येईल.

* या ( दुसऱ्या ) जलौकाचा उल्लेख पतंजलीनें महाभाष्यांत केलेला आहे; यामुळें पतंजलीचे महाभाष्य यानंतरचें असावें. ( जालूकाः श्लोकाः ) अभिमन्यूच्या वेळीं महाभाष्य काश्मीरांत चंद्राचार्यांनें प्रवृत्त केलें. यावरून जलौक व अभिमन्यु यांच्या दरम्यान इ. पू. १४४ च्या सुमारास महाभाष्य लिहिलेंलें असावे

३ दामोदर ( दुसरा ) ते इ. स. ३०-४० पर्यंत केव्हां तरी होऊन
४ हुष्क-जुष्क कनिष्क गेला असावा हें आम्हीं वर दाखविलेलेंच आहे;
५ अभिमन्यु यावरून माझें असें मत आहे कीं गोनर्दादि
प्रतापादित्य इत्यादि ( ४ + ३५ + ८ + ५ मिळून ) बावन्न
( ५२ ) राजे काश्मीरावर राज्य केल्यानंतर इ. स. च्या सुमारास प्रतापादित्य काश्मीराच्या गादीवर बसला. हा कल्हणाच्या पूर्वींच्या लोकांच्या मताप्रमाणें शकारी विक्रमादित्याचा संबंधिक असू शकेल. साराश, प्रतापादित्य इ. स. च्या सुमारास काश्मीरच्या गादीवर बसला असावा; व तो अभिमन्यूनंतर लगेच आला असावा. असो. आपणास काश्मीरी इतिहासाच्या कालानुक्रमाशीं विशेष संबंध नाहीं. फक्त भारतीय युद्धाचा काळ इ. पू. १२६३ वर्षे असूं शकेल कीं नाहीं येवढेंच काश्मीरी इतिहासावरून बघावयाचें आहे, व त्याची शक्यता कल्हणाच्या दोन्ही प्राचीन परंपरावरून शाबीत होते.

## युगें व मन्वतरें.

याची मूळची आपल्या लोकांत काय कल्पना होती, ती पुढे कसकशी बदलत गेली, व त्यामुळें कालगणनापद्धतींत काय काय घोटाळे उत्पन्न झाले व एकंदरींत विचार करिता आपली कालगणनापद्धति बुडवायाला कोण कारणीभूत झाले—याचा विशेषेंकरून यापुढें विचार कर्तव्य आहे.

महाभारतांत कोठेंही अनुक्रमें करून ४०००, ३०००, २०००, व १००० वर्षांच्यापेक्षा अधिक वर्षांच्या युगाचें वर्णन आलेलें नाहीं. क्वाचित् ठाई संध्या व सध्यांश मिळून २००० वर्षे अधिक म्हणजे चारी युगें मिळून १२,००० वर्षांचीं धरिलीं आहेत.

अर्वाचीन पौराणिक लेखकानीं हीं साधीं मनुष्याचीं वर्षें ' देवाचीं वर्षें ' बनविलीं व चारी युगाची संख्या अनुक्रमें याप्रमाणें ठरविलीः—

कृतयुग = ( ४००० × ८०० ) × ३६०
त्रेतायुग = ( ३००० × ६०० ) × ३६०
द्वापरयुग = ( २००० × ४०० ) × ३६०
कलियुग = ( १००० × २०० ) × ३६०

महाभारताचें सद्यःस्वरूप इ. पू. १०० च्या सुमारास प्राप्त झालें असें रा. ब. वैद्यांचें मत आहे; व पाश्चात्यांचें ही मत अलीकडे असें झालें आहे कीं, खिस्ती शकाच्या प्रारंभापासून किंवा त्याही पूर्वींच भारताला सद्यःस्वरूप प्राप्त झालेलें होतें. तेव्हां इ. पू. १०० च्या सुमारास 'दैवी वर्षांची' पद्धति व १००० वर्षांच्या पेक्षां अधिक मोठें कलियुग प्रचलित नव्हतें. कारण, कोठेंही महाभारतांत तसा उल्लेख नाहीं. ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे. महाभारताच्या सद्यःस्वरूपकर्त्यांस फक्त 'मानवी वर्षे' च माहीत होतीं, व ते कलियुग १००० किंवा १२०० मानवी वर्षांचेंच मानीत होते. यावरून असें सिद्ध होतें कीं भारतीय युद्धापासून १०००—१२०० वर्षांनंतर महाभारताला सद्यःस्वरूप मिळालें; व सद्यःस्वरूपकर्त्यांच्या पुढें, भारतीय युद्धापासून आपल्या वेळेपर्यंत १००० —१२०० वर्षे झालीं अशी परंपरा आलेली असावी. भारतीय युद्ध झालें तेव्हां नुकतेंच कलियुग लागलें असा भारतांत ( मूळचा ) उल्लेख पाहून त्या ( भारताच्या व पुराणांच्या ) अर्वाचीन लेखकांनीं ठरविलें कीं तोच कलि अद्यापि चालू असेल. याविषयीं पुढें अधिक विचार करूं. चंद्रगुप्ताच्या वेळेस भारतीय युद्धापासून ९५१ वर्षे झालीं होतीं अशी परंपरा पुराणांवरूनच कशी निष्पन्न होते हें दाखविलेलेंच आहे. त्यानंतर ५०-७५ वर्षांनीं, म्हणजे भारतीय युद्धानंतर १००० वर्षे झाल्यानंतर १००० वर्षांच्या कलियुगाची पद्धति ठरली असावी, किंवा त्यादीनंतर १५०-२०० वर्षांनीं शर्म पतंजलि काळीं ही पद्धति ठरली असावी. सारांश, १२६३ इ.

पू. पासून १०००-१२०० वर्षांनीं म्हणजे खिस्तीशकाच्या प्रारंभापर्यंत ही ' मानवी वर्षांची ' व ' १००० मानवी वर्षांच्या कलीची ' पद्धति ठरली व प्रचालित झाली असावी.

महाभारत व पुराणें यांच्यामधून जरी ' हजारों वर्षांच्या ' युगांचा कित्येक भागांतून उल्लेख आहे, तथापि, त्याच ग्रंथांच्या कित्येक भागांत असे कांहीं उल्लेख आहेत कीं, त्यावरून मूळचीं युगें—भारतकाळीं–फारच थोड्या अवकाशाचीं असावींत, असें अनुमान काढणें भाग पडतें.

## पांच वर्षांचें युग.

मद्रासचे प्रो. रंगाचार्य-ज्यांनीं युगांचा उत्तम प्रकारें अभ्यास केलेला आहे त्यांनीं Indian Review मा. पु. च्या १९०० सालच्या अंकांत ( पृ. ४५१ ) असें लिहिलेलें आहे कीं—

" माझ्या युगांच्या अभ्यासावरून मला असें दिसून आलेलें आहे कीं चतुर्युगाच्या कल्पनेला ज्योतिःशास्त्राचा व इतिहासाचा आधार आहे; व ऐतिहासिक युगें हीं अर्वाचीन ज्योतिःशास्त्रीय दीर्घ युगापेक्षां बरींच प्राचीन असून, ऐतिहासिक युगाचा उगम ज्योतिःशास्त्रीय युगांच्या उगमाहून अगदीं भिन्न आहे. * * * ऐतिहासिक युगें हीं केवळ काल्पनिक नाहींत. तीं युगें प्राचीन संस्कृत वाङ्मयाच्या सूक्ष्मावलोकनानें उत्पन्न झालेलीं असावींत असें मला वाटतें. हें संस्कृत वाङ्मयाचें अवलोकन भारतीय युद्धाच्या वेळीं कृष्णद्वैपायन व्यासानें केलेलें असावें. "

प्रो. रंगाचार्य हे पंचवर्षांच्या युगाविषयीं लिहितात कीं:—

" In ancient days they used to adjust the solar and the Lunar measurements of time by means of the device of a In-trum of five years known al-o by the name of a Yoga The data required for the formation of this Instrum are the durations of the Solar year and of the

lunar month, and a knowledge of them is clearly implied in the Rigveda."

सारांश, सूर्यमान व चांद्रमान यांची संगति करण्यासाठीं पूर्वी पांच वर्षांची गणना करुन त्यास युग म्हणत. हें पांच वर्षांचे युग ३६६ दिवसांच्या ५ नाक्षत्र वर्षांचें बनलेले असे. वेदांगज्योतिषकाळीं हे पंचसंवत्सरमय युगच होतें. वेदांगज्योतिषाचा काळ प्रो. आर्च डीकन प्रॅट् व बेंटले यांच्या मतें इ. पू. ११८१ च्या सुमारचा आहे. बौधायन, गर्ग व वेदांगज्योतिषकार यांनीं दक्षिणोत्तरायणांची स्थिति सारखीच दिली आहे. तेव्हां हे सारे इ. पू. ११८१ च्या सुमारचे होत.

वेदांगज्योतिषांत ' माघशुक्लप्रवृत्तस्य पौषकृष्णसमापिनः । युगस्य पंचवर्षस्य कालज्ञानं प्रचक्षते ॥ ' असें म्हटलें आहे. यावरून इ. पू. ११८१ च्या सुमारास पांच वर्षांचें युग चालू होतें हें कळतें. ब्रह्मगुप्तानें या पंचवर्षात्मक युगाचा याप्रकारें उल्लेख केलेला आहेः—

> युगमाहुः पंचाब्दं रविशशिनोः संहितांशकारा ये ।
> अधिमासावमरात्रस्फुटतिथ्यज्ञानतस्तदसत् ॥ २ ॥

ब्रह्मसिद्धांत, अ. ११.

प्राचीन ज्योतिषसंहिताकार व वेदांगकार यांनीं पांच वर्षांचें युग सांगितलें आहे असें ब्रह्मगुप्त म्हणतो. प्राचीन काळीं गर्गपराशरादि १८ ज्योतिषसंहिता होत्या. गर्गानें पांच वर्षांचेंच युग धरिलें आहे. पंचसिद्धांतिकेंत वराहमिहिरानें ज्या पैतामह सिद्धांताचीं मतें दिलीं आहेत, तो पैतामह सिद्धांतही पांच वर्षांचेंच युग देतोः—

> रविशशिनोः पंचयुगं वर्षाणि पितामहोपदिष्टानि ।
> अधिमासस्त्रिंशद्भिर्मासैरवमः स्विषड्घन्हाम् ॥

याप्रमाणे पहातां, इ. पू. ११८१ च्या सुमाराच्या अनेक ज्योतिष-ग्रंथांत पांच वर्षांचें युग दिसून येतें, पण या युगपद्धतीच्या गणितांत फार मोठी चूक असल्यामुळें ही पंचवर्षात्मक युगपद्धति बुडून गेली. पंचवर्षात्मक युगांच्या विषयीं लिहितेवेळीं गर्गानें ( सोमाकराची वेदांगज्योतिषाची टीका पहा ) कोणकोणत्या वर्षास काय काय नांवें होतीं हे दिलेलें आहे.

| | | |
|---|---|---|
| वर्ष १ लें— | संवत्सर | मिळून पंचवर्षात्मक युग. |
| ,, २ रें— | परिवत्सर | |
| ,, ३ रें— | इदावत्सर | |
| ,, ४ थें— | अनुवत्सर | |
| ,, ५ वें— | इद्वत्सर | |

या प्राचीन संहितांत हजारों वर्षांच्या युगांची पद्धत मुळींच नाहीं हें आश्चर्य होय. युग फक्त पांचच वर्षांचें आहे; ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. अर्वाचीन ज्योतिषग्रंथांत मात्र हजारों व लाखों वर्षांचीं युगें बनलीं !

वेदांगज्योतिष सर्व वैदिक वाङ्मयानंतर निपजलेलें असल्यामुळें, त्या काळीं वैदिक वाङ्मय सद्यःस्वरूप पावलें होतें असें अनुमान निघतें.

## चार वर्षांचें युग व गवामयनंची कल्पना.

इ. पू. बाराव्या शतकापूर्वी इकडे चार वर्षांचीं युगें रूढ. चतुर्युगें ( चौकड्या ) चालू असल्याबद्दलचीं प्रत्यंतरें कोठें कोठें आढळून येतात. या चौकडींतील प्रत्येक वर्षास युगाचेंच नांव होतें, जसें:—

वर्ष १ लें—कृतयुग.
,, २ रें—त्रेतायुग.
,, ३ रें—द्वापरयुग.
,, ४ थें—कलियुग.

ही चतुर्वर्षात्मक युगपद्धति नीट कळण्यासाठीं प. रुद्रपट्टणस्याम शास्त्री यांनीं काढिलेली गवामयनची कल्पना थोडीशी समजून घेतली पाहिजे. ती मी येथें थोडक्यात देतों ––

वैदिक ऋषींना ३६५¼ दिवसांचें वर्ष माहीत होतें, व त्यानीं ३६० दिवसाच्या व्यावहारिक वर्षाचा स्वीकार केला होता. प्रत्येक वर्षाच्या अखेरीस १६ अक्षराच्या १० बृहतीछंदाच्या कविता ते रचून ठेवीत, व येणेंवरून त्यास किती वर्षे झालीं हें कळून येई. ३६० नंतरचे पाच दिवस मलदिवस समजले जात. ¼ दिवसाची ते अशी व्यवस्था लावीत कीं, प्रत्येक चार वर्षाच्या अखेरीस ते १ दिवस मिळवीत. या एका दिवसास ते गो, प्रजापति, सुपर्ण वगैरे म्हणत. गवामयन म्ह. या चार वर्षांच्या अखेरीस येणाऱ्या या एकेक दिवसाची गति होय! एका दिवसाचें गवामयन म्ह. ४ वर्षे, २ दिवसाचें म्हणजे ८ वर्षे, ३० दिवसाचें म्हणजे १२० वर्षे इत्यादि ३६० दिवसाचें गवामयन म्हणजे १४४० वर्षे होत.

गवामयनाच्या कालगणनेनें केलेले यज्ञ शतपथ ब्राह्मण, गोपथ ब्राह्मण इ० तून लिहून ठेविलेले आहेत. जसें —३६२ दिवसाच्या गवामयनात वैदिक ऋषींनीं १०६ अग्निष्टोम व २४० उक्थ्य झाले असें लिहून ठेविलें आहे. अग्निष्टोम यज्ञ प्रत्येक १३ वर्षाला वैदिकऋषि करीत, व उक्थ्य ६–६ वर्षांनी करीत.

बृहदुक्थसामध्ये ४६० गाव्या अयनाचा लेख आहे. यात १८४० वर गेल्याचा बोध होतो. सारांश, वैदिक काळ–गुराचानिगूढ १८४० वर्षे पर्यंत चालू होता, असें मानण्यास येतें. वेदांगज्योतिषकार व बौधायनाचा काळ सुमारें इ० पू० १२०० (११८१) हा लगध्यावरून वर निश्चितच आहे. वैदिक कवींनीं एका कालगणनेची १८४० वर्षे आखून

पांचविलीं आहेत. तीं सुमारें इ० पू० १२०० वर्षी संपलीं. तेव्हां १८४० + १२०० + अलीकडचीं १९१० हीं सारीं वर्षे मिळविलीं तर ४९५० वर्षे होतात व हीं कलीच्या वर्षापेक्षां ६० वर्षांनीच कमी आहेत. हा ६० वर्षांचा काळ--ब्राह्मण काळाचा अंत व इ० स० १२०० हा बौधायनाचा काळ--यांमधील अंतर असावा.

गवामयनं हें चार वर्षांच्या युगाचें दर्शक आहे. हे चतुर्युग किंवा नुसतें युग होय. पंडित रुद्रपट्टण शामशास्त्री यांच्या ' गवामयनं ' या पुस्तकांत असें मत आहे कीं, ही वैदिक कालगणना नाभानेदिष्ट यानें सुरू केली. आपण सध्या ज्यास कलियुग म्हणतों ती खरोखर वैदिक कालगणनाच आहे, असें त्यांचे मत आहे.

पौराणिक ग्रंथांतून या चार वर्षांच्या युगाचा उल्लेख कोठकोठे आहे असें मला वाटतें. सुमारें १८४० वर्षांत १५ दिवसाची चूक पडल्यामुळे वेदांगकाळीं ४ वर्षांच्या युगांची पद्धति सोडून पांच वर्षांच्या युगांची पद्धति सुरू झाली असावी.

व्यासांच्या वेळीं चार वर्षांचीं युगें चालू होतीं व प्रत्येक वर्षास ( मागें दिल्याप्रमाणें ) युगाचें नांव होतें, असें दाखविता येतें. त्या वेळचें कोष्टक असें होतेः—

४ वर्षे = १ युग = १ चतुर्युग.
७२ युगें म्ह. चतुर्युगें = १ मन्वंतर = २८८ वर्षे.
१४ मन्वंतरें = १ कल्प = ४०३२ वर्षे.

## मन्वंतरें.

मन्वंतरें हीं कालगणनेचीं द्योतक असून तीं ४ वर्षांच्या ७२ युगांचीं म्हणजे २८८ वर्षांचीं असलीं पाहिजेत.

पौराणिक मन्वंतरांचा क्रम असाः—

१ लेंः—स्वायंभुव
२ रेंः—स्वारोचिष
३ रेंः—औत्तमि
४ थेंः—तामस
५ वेंः—रैवत
६ वेंः—चाक्षुष
} भारतापूर्वी गेलेलीं मन्वंतरें. (अतीत)

७ वेंः—वैवस्वत—भारतकाळीं चालू असलेलें.

८ वें—तें १४—

८ सावर्णिक
९ दक्षसावर्णिक
१० ब्रह्म ,,
११ धर्म ,,
१२ रुद्र ,,
१३ रौच्य ,,
१४ भौत्य ,,
} अनागत मन्वंतरें.

याप्रमाणें चालू कल्पांतील सहा मन्वंतरें गेल्यानंतर सातव्या वैवस्वत मन्वंतरांत पांडव होते व तेव्हां भारतीय युद्ध झालें ! याबद्दल पुष्कळ प्रमाणें आहेत.

> षडेते मनवोऽतीताः सांप्रतं तु रवेः सुतः ।
> वैवस्वतोऽयं यस्यैतत् सप्तमं वर्ततेऽन्तरम् ॥
> विष्णुपुराण–३–१–७.

> वैवस्वतेऽन्तरे प्राप्ते यादवान्वयसंभवः ।
> रामो नाम यदा मर्त्यो मत्सत्त्वबलमाश्रितः ॥ १७ ॥
> अवनीयासुरध्वंसी द्वारकानधिवत्स्यति ।
> तद्भ्रातुस्तस्य स्वं तदा पुत्रत्वमेष्यसि ॥ १८ ॥
> मत्स्यपुराण, अ. ४.

या उताऱ्यांत पराशर, बळराम, कृष्ण वगैरे सातव्या वैवस्वत मन्वंतरांत असल्याचा उल्लेख आहे.

भविष्यपुराणानें भारतीय युद्ध कोणत्या वर्षी झालें हें स्पष्टपद्धतींत दिलेलें आहे. पद्यः—

> भविष्याख्ये महाकल्पे प्राप्ते वैवस्वतेंतरे ।
> अष्टाविंशे, द्वापरांते, कुरुक्षेत्रे रणोऽभवत् ॥ ४
>
> प्रतिसर्ग पर्व, खंड ३, अ. १ ला.

भविष्य कल्पात, वैवस्वत मन्वंतरात, २८ व्या चतुर्युगांतं यांच्या अंतीं कुरुक्षेत्रीं रण झालें ! भविष्यकल्प म्ह. वराहकल्प

यावरून कल्पारंभापासून किती वर्षांनंतर भारतीय युद्ध विता येतें. पद्यः—

६ मन्वंतरें = २८८ × ६ = १७२८ वर्षे.
२७ चतुर्युगें = २७ × ४ = १०८ ,,
द्वापार = ३ रें वर्ष ३ ,,
१८३९ ,,

कल्पापासून १८३९ व्या वर्षी भारतीय युद्ध झालें ! ही महत्त्वाची गोष्ट होय !

वेदसंहिता व्यासाने केव्हा रचिल्या हें विष्णुपुराणानें दिलेलें आहेः—

> ततोऽत्र, मत्सुतो व्यासोऽष्टाविंशतिमेंतरे ।
> वेदमेकं चतुष्पादं चतुर्धा व्यभजत् प्रभुः ।

या म्ह. वैवस्वत मन्वंतरांत, अठ्ठाविसाव्या चतुर्युगात व्यासानें वेदांच्या संहिता रचिल्या. म्ह. कल्पानंतर १८३६–१८४० च्या दरम्यान वेदसंहिता रचल्या गेल्या !

आर्यभट्टानें युगाच्या पद्धतींत भारतीय युद्धाचा काळ दिलेला आहे. भाषा संकेताची आहे:—

काहो मनवो ढ मनुयुगाश्खगतास्ते च मनुयुगछ्ना च ।
कल्पादेर्युगपादा गच गुरुदिवसाच्च भारतात्पूर्वम् ॥

अर्थ.—" एका ब्रह्मदिवसांत १४ मन्वंतरें असतात. एका मन्वंतरांत ७२ युगें असतात. कल्पारंभापासून भारतीय युद्धाच्या गुरुवारापर्यंत सहा मन्वंतरें, २७ युगें व $\frac{3}{4}$ युग इतका काळ गेला होता."

या परंपरेवरून पाहतां हीः—

६ मन्वंतरें = ६× २८८ = १७२८ वर्षे.
२७$\frac{3}{4}$ युग= १०८ + ३ = १११ ,,
१८३९

कल्पारंभापासून भारतीय युद्धापर्यंत १८३९ वर्षें गेलीं होतीं हें कळून येतें.

भारतीय युद्ध कल्पापासून १८३९ वर्षी झालें.
व तें इ. पू. १२६३ ,, झालें.
३१०२

यावरून यांची बेरीज करितां इ. पू. ३१०२ हा कल्पारंभाचा काळ ठरतो.

यावरून येवढें उघड होतें कीं आपण तूर्त जो कल्यारंभ ( कलीचा आरंभ ) म्हणून समजतों, तो खरोखर पूर्वीचा कल्पारंभ ( कल्पाचा आरंभ) आहे! कल्यारंभ व कल्पारंभ यांच्या लेखनसादृश्यावरून ही चूक झाली असावी. यामुळें भारतीय युद्धाचा खरा ऐतिहासिक काळ लोपून, कल्पारंभ भारतीय युद्धापासूनच समजण्यांत येऊन, भारतीय युद्धाचा काळ इ. ३१०२ हा समजण्यांत आला! या प्रमादपरंपरेचें खापर आर्यभट्टादि ज्योतिष्यांच्या डोक्यावरच फोडलें पाहिजे. कल्पाचा आरंभ खरोखर इ. पू. ३१०२ झाली होऊन ही वैदिक कालगणना नाभानेदिष्टापासून

१८३९ वर्षांपर्यंत सुरू होती. पुढें भारतीय युद्धानंतर ही कल्पाची गणना-पद्धति विसरून जाऊन फक्त भारतकालापासून चंद्रगुप्तापर्यंत ९५१ वर्षें झालीं एवढीच परंपरा राहिली ! नंतर ५०-६० वर्षांनीं पौराणिकांनीं पाहिलें कीं ' द्वापरांते रणोऽभवत् ' असा उल्लेख आहे. यावरून त्यांनीं अनुमान काढिलें कीं भारतीय युद्धाच्या नंतर लगेच कलियुग सुरू झालें. मग तेव्हांपासून त्यांच्या वेळेपर्यंत जवळ जवळ १००० वर्षें झालींच होतीं. यावरून कलियुग १००० वर्षांचें ठरविण्यांत आलें! नंतर आणखीं २०० वर्षांनीं कलि १२०० वर्षांचा ठरविण्यांत आला ! याप्रमाणे ख्रिस्ती शकापर्यंत कांहीं ' दिव्य वर्षें ' नव्हतीं; व कलि कांहीं ३६० × १२०० = ४३२००० वर्षांचा झाला नव्हता ! ही व्यवस्था पुढील आर्यभटादि ज्योतिष्यांनीं व ५व्या ६व्या शतकांतील पौराणिकांनीं केली ! सारांश, भारतीय युद्धाच्या वेळीं द्वापर व कलि हीं वर्षांचीं नांवें होतीं. तेव्हा १००० वर्षांचा कलि नव्हताच. ज्या ' द्वापरांतीं ' युद्ध झालें तो २००० वर्षांचा नसून ' एकच वर्षाचा ' होता ! असो. या उलगड्यांवरून १०००।१२०० वर्षांचें कलियुग भारतीय युद्धानंतर ( म्ह. १२६३ इ० पू० नंतर ) १०००।१२०० वर्षांनंतरच निघालें असावें हें उघड होतें ! व ४३२००० वर्षांचा कलि तर आर्यभट्टाच्या वेळींच तयार झाला ! सारांश, मूळच्या युगांच्या विपरीतार्थानें, व कल्पा-रंभास कल्यारंभ समजण्यानें, भारतीय युद्धाचा खरा ऐतिहासिक काळ विसरून जाऊन त्यास कल्पारंभाचाच काळ ( इ० स० ३१०२ ) हा लावण्यांत आला ! ही चुकीची समजूत शके ५५६ (इ०स० ६३४) मधील एका शिलालेखांतही आहे ! हा ऐहोळे येथील सत्याश्रय पुलुके-शाच्या वेळच्या रविकीर्तीचा शिलालेख आहे. शिलालेखाची नक्कल ही:—

त्रिंशत्सु त्रिसहस्रेषु भारतादाहवादितः ।
सप्ताब्दशतयुक्तेषु गतेष्वब्देषु पंचसु ।·

पंचाशत्सु कलौ काले षट्सु पंचशतेष्वपि ।
समासु समतीतासु शकानामपि भूभुजाम् ।
सत्याश्रयस्य परमाप्तवता प्रसादम् ।
निर्मापितं मतिमता रविकीर्तिनेदम् ॥

हा लेख शके ५५६ ऊर्फ इ० स० ६३४ मधील आहे. या वेळीं, कलिप्रारंभ भारतीय युद्धापासूनच झाला व तेव्हांपासून गतकलि ३७३५ वर्षे झालीं व चालू कलीचें ३७३६ वें वर्ष होतें, अशी समजूत होती, हें कळून येतें. पण ह्या समजुतीचा घोंटाळा आहे. इ० स० ६३४ मध्यें कल्पाचें ३७३६ वें वर्ष चालू होतें; तें कलीचें समजण्यांत आलें; व कलिप्रारंभ व भारतीय युद्ध एकच समजून भारतीय युद्धापासून ३७३५ वर्षांचा काळ सांगण्यांत आला. हाच ३७३६ कल्पाचा काळ धरिला तर बरोबर भारतीय युद्धाचा, मीं मागें काढलेला काळच मिळतो. पहाः—

| | | |
|---|---|---|
| | २७३६ | कल्पाचें चालू वर्ष ( इ० स० ६३४ वर्षी ) |
| पैकीं | १८३९ | वर्षे कल्पापासून भारतीय युद्धापर्यंतचीं वजा केलीं, |
| | १८९७ | तर १८९७ वर्षे भारतीय युद्धापासून इ० स० |
| | ६३४ | ६३४ पर्यंत राहतात. यांत ६३४ वर्षे वजा केलीं, |
| | १२६३ | तर इ० पू० १२६३ हाच भारतीय युद्धाचा |

काळ येतो.

## लहान युगांच्या अस्तित्वाचीं प्रमाणें !

वरील विवेचनांत युग म्हणजे एकच वर्ष असावें व चार युगें मिळून चतुर्युग किंवा नुसतें ' युग ' होत असावें असें नुसतें तुम्ही गृहीत धरून चालला आहां; त्याला प्रमाण काय ? असा कोणीही आम्हांस प्रश्न करील. याकरितां या हजारों व लाखों वर्षांच्या युगांमधून आम्हीं ४।५ वर्षांच्या युगांकडे कशी वाट काढिली, हें सविस्तरपणें सांगतों.

वनवासात असता पाडवानीं तीर्थें केलीं आहेत, तेव्हा लोमशऋषि बरोबर होते, सर्व वनवास १२ वर्षांचा होता हें तर उघडच आहे एके ठाई लोमशऋषि युधिष्ठिरास म्हणतात, कीं —

सधिरेष नरश्रेष्ठ ! त्रेताया द्वापरस्य च ।

वनपर्व, १२१-१९

दुसऱ्या एका तीर्थात लोमश म्हणतात, कीं —

सधिर्द्वयोर्नरश्रेष्ठ ! त्रेताया द्वापरस्य च ॥

वन०, १२५-१४

याप्रमाणे पाडव तीर्थयात्रेत असता दोन स्थळीं त्रेता व द्वापराचा सधि होता पुढे याच वनवासात भीमाची व हनुमानाची गाठ पडता म्हटलें आहे कीं —

एतत्कलियुग नाम अचिराद्यत्प्रवर्तते ।

वन०, १४९-३७

म्हणजे वनवासाच्या १२ वर्षांच्या अवधींत एकदा त्रेताद्वापराचा सधि होता व एकदा द्वापरकलींचा सधि होता ! मग हीं युगें होतीं तरी केवढीं ? तीं चार युगाचीं म्हणजे वर्षांचीं चतुर्युगें होतीं असें मानल्या शिवाय गत्यतरच नाहा

पुन भारतीय युद्धानतर २६ किंवा ३६ वर्षांनीं श्रीकृष्ण निजधामास गेला, तेव्हा लगेच कलि सुरू झाला " यदा मुकुदो भगवानिमा मही जहौ स्वतन्वा श्रवणायसत्कथ ॥ तदाहरेवाप्रतिबुद्धचेतसा अधमहेतु कलिरन्ववर्तत ॥ " भागवत, १-१८-३६

भारतीय युद्ध झालें तेव्हा ' द्वापरात ' होता म्हणजे तो ' द्वापर व कलि ' याचा सधि होता

आता प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, वनवासात त्रेता, द्वापर, व कलि आले आहेत, भारतीय युद्धात द्वापर व कलि आहेत, व युद्धानतर

पुनः कलि आहेच. हा असा कलि आहे तरी कसचा ? जो कलि भीम-हनुमत्संवादांत ' अचिरात् ' प्रवृत्त होणार होता, तो पुढें युद्धानंतर काहीं काळानें प्रवृत्त झाला, व श्रीकृष्ण निजधामास गेल्या दिवशीं, प्रवृत्त झाला ! हे सारे कलि एकच असेंही कोणी म्हणेल तेंही आम्ही कबूल करूं. पण वनवासांत मग त्रेता व द्वापरांचा संधि कसा ? एवढाच प्रश्न आहे. द्वापर कमींत कमी २००० वर्षांचें ना ? मग १२ वर्षांच्या अवधींत त्रेता व द्वापर कसे आले ? गदायुद्धाचे वेळीं ' नुकतेंच ' कलियुग लागणार होते ! ( प्राप्तं कलियुगं विद्धि ! ) व तें श्रीकृष्णाच्या निर्गमनाच्या दिवशींच सुरू झालें ! म्हणजे सुरू झालें म्हणतां म्हणतां २६ किंवा ३६ वर्षे गेलीं कीं काय ? हा कलि १०००।१२०० वर्षांचा खास नव्हे. हा वारंवार लवकर येणारा कलि असावा. भागवता ( २–१–८ ) मध्येंही शुकाचार्य व्यासांपासून भागवत ' द्वापाराच्या आरंभीं ' शिकल्याचा उल्लेख आहेः—

इदं भागवतं नाम पुराणं ब्रह्मसंमितम् ।
अधीतवान् द्वापरादौ पितुर्द्वैपायनादहम् ॥

येथें ' द्वापर ' २००० वर्षांचा घेतला तर मत्स्यकन्येच्या ठाई पराशरापासून निर्माण झालेला व्यास व त्याचा पुत्र शुक हे दोघेही २००० वर्षे जगून होते असें गृहीत धरावें लागते; पण हे चमत्कारिक होय ! तेव्हां कलिद्वापरांचें वारंवार आगमन, त्रेताचें वनवासांत व द्वापरारंभाचें भागवतांत शुकाच्या वेळीं येणें, यावरून हीं युगें लवकर लवकर पालटणारीं असावींत असें म्हणणें भाग येतें. हा चार चार वर्षांचा युगपर्याय असावा.

' युग ' शब्द ' वर्ष ' हा अर्थी कोठें कोठें सुचून आढळतो. कलियुगाचें वर्णन " सहस्रमेकं वर्षाणां तथा कलियुगं स्मृतम् । तस्य वर्षांत

संधिः संध्यंशश्च ततः परम् " असें प्रथम करून वार्कीच्या युगांचीही वर्षसंख्या देऊन, एकंदर १२००० वर्षांचा समारोप करिते वेळीं ' एषा द्वादशसाहस्री युगाख्या परिकीर्तिता ' असें म्हटलें आहे ! पण येथें ' युग' संदिग्धार्थी आहे ! पण पुढें १००० वर्षांच्या कलीच्या अंताचें वर्णन करीत असतां, चुकून म्हटलें आहे कीं,

तस्मिन्युगसहस्रांते संप्राप्ते चायुषः क्षये ।
अनावृष्टिर्महाराज जायते बहुवार्षिकी ॥

वनपर्व, १८८–६५.

येथें ' युगसहस्रांते ' हा शब्द ' वर्षसहस्रांते ' याच अर्थी योजिला आहे. युग हा शब्द वर्षाच्या अर्थी योजिलेला येथेंच प्रथम आढळतो. असो.

यावरून भारतकाळीं ( इ० पू० १२६३ ) चार वर्षांचें युग चालू होतें व तें वेदांग ज्यो. काळीं ५ वर्षांचें झालें असें वाटते.

मागील विवेचनावरून कल्पानंतर १८३६–४० पर्यंत व्यासांनीं वेद रचिले.

,, १८३९ वर्षी भारतीय युद्ध झालें.

,, १८६५ वर्षी श्रीकृष्ण निजधामास गेले.

ह्या गोष्टी कळून येतात.

कल्पापासून भारतीय युद्धापर्यंत ६ मन्वंतरें व २७¾ युगें झालीं होतीं, असें आर्यभटास प्राचीन ग्रंथांत आढळून आलें ! पण आर्यभटानें स्वतःची अशी समजूत करून घेतली कीं, २८ व्या युगांतील ¾ युग जाऊन दोवटच्या युगपादांत ३६०० वर्षे गेल्यानंतर आपल्या वयास २३ वर्षे झालीं !* यावरून कोणत्या तरी प्रारंभापासून ३६०० वर्षे आपल्या वेळेपर्यंत झालीं, अशी परंपरा आर्यभटाचे वेळीं असावी. याचा

* षष्ट्यब्दानां षष्टिर्यदा व्यतीतास्त्रयश्च युगपादाः ।
त्र्यधिका विंशतिरब्दास्तदेह मम जन्मनोऽतीताः ॥

प्रारंभ युद्धाला लावण्यांत आला तो चुकून होय ! हा खरोखर कल्पाचा प्रारंभच होय ! आर्यभटाच्या वेळीं कल्पापासून ३६०० वर्षे झालीं होतीं; तेव्हां इ० स० ( ३६००–१८३९ + १२६३ = ) ५०८ हा काळ होता !

आर्यभटानें असा विचार केला असावा कीं, कलि जर १२०० वर्षांचा तर कल्पारंभापासून आपल्या वेळेपर्यंत ३६०० वर्षे होऊनही अद्यापि कलिच कसा राहिला ! तेव्हां १२०० हीं ' मानवी ' वर्षे नसून ' दैवी ' असावींत असें त्यानें ठरवून कलि १२०० × ३६० = ४३२००० वर्षांचा केला असावा. यावरून सूर्यसिद्धांत, विष्णुपुराणादि ४३२००० वर्षांचें कलियुग सांगणारे ग्रंथ आर्यभटानंतरचे होत हें स्वतएव सिद्ध होतें ! व हे विद्वानांस इतर प्रमाणांवरूनही मान्य आहे. आतां,—

> आसन् मघासु मुनयः शासति पृथ्वीं युधिष्ठिरे नृपतौ ।
> षड्द्विकपंचद्वियुतः शककालस्तस्य राज्ञश्च ॥

हा श्लोक गर्गाचा म्हणून देतात. हा गर्ग इ० स० २ऱ्या शतकांतला असें कोणी म्हणतात. यांत ' शककाला 'च्या ठाईं ' शाक्यकाल ' घ्यावा, असें रा. अय्यर सुचवितात. जर अय्यर यांची सूचना पसंत केली, तर बुद्धाच्या निर्वाणाच्या काळापर्यंत २५२६–किंवा २५६६ वर्षांचा काळ गेला होता, असें गर्गास माहीत होतें; पण हा काळ युधिष्ठिरापासून ' शाक्यकाला ' पर्यंत असें त्यानें दर्शविलेलें आहे; पण २५२६ किंवा २५६६ हा बुद्धनिर्वाणापर्यंतचा काळ—जर बुद्धकाळीं तशी खरोखर एखादी परंपरा असेल तर—कल्पारंभापासूनचाच असला पाहिजे. कसा तो पहाः—

२५६६ ( च अधिक जुळते ) कल्पापासून गौतम बुद्धाच्या निर्वाणापर्यंतचा काळ.

१८३९ कल्पापासून भारतीय युद्ध.

७२७ भारतीय युद्धापासून निर्वाणापर्यंत.

आतां यावरून १२६३–७३७ = ५३६ इ० पू० हा निर्वाणकाल येतो. हा नेहमींच्या बुद्धाच्या निर्वाण काळाशीं ( इ० पू० ५४३ ) जवळच आहे ! पण गर्गाच्या मनांत 'शाक्यकाल' नसून 'शककाल' च असावा, असें मला वाटतें.

भारतकाळीं एक वर्षाचे युग होते, यास उत्तम उदाहरण याच गर्गाच्या बृहद्गार्गीयसंहितेमध्यें मिळते. ( Deccan Co, Mss No 345 of 1879–80 )

> ततो नरक्षये वृत्ते सुशाते नृपमंडले ।
> भविष्याति कलिर्नाम चतुर्थं पश्चिमं युगम् ।
> ततः कलियुगस्यांते परीक्षित् जनमेजय ! ॥
> पृथिव्यां प्रथितः श्रीमानुत्पत्स्यति न संशयः ।

येथे भारतीय युद्धाचेंच वर्णन आहे. युद्ध झाल्यानंतर 'कलियुग' लागलें. नंतर त्या 'कलियुगाच्या शेवटीं' परीक्षित् जन्मला ! हे कसें ! उत्तरा युद्धकाळीं गरोदर होती. ती पुढें कांहीं महिन्यांनीं प्रसूत झाली. इतक्यात कलियुग संपत आलें असावें ! म्हणजे हें अर्थात् एका वर्षाचेंच कलियुग होय !

सारांश, भारतीय युद्ध झालें तें वर्ष द्वापरयुग असून त्याचा अखेर होता, मग कलियुग लागून त्या वर्षाच्या अखेरच्या मागास परीक्षित् जन्मला.

## मन्वंतर–पद्धतींतील काळ.

युगें व मन्वंतरें या पद्धतींत जसा वेदसंहितारचनेचा व भारतीय युद्धाचा काळ दिलेला आहे तद्वतच इतर कांहीं गोष्टींचा काळ कांहीं तरी पुराणांतून दिलेला आहे कीं काय, असा आतां प्रश्न उपस्थित होतो; याचा आतां विचार करूं:—

मत्स्यपुराणांत असे कांहीं महत्त्वाचे काळ दिलेले आहेत:—

त्रेतायुगे तु प्रथमे दत्तात्रेयो* बभूव ह ।
नष्टे धर्मे चतुर्थांशे मार्कंडेयपुरःसरः ॥ २४२ ॥
पंचमे पंचदश्यां च त्रेतायां संबभूव ह ।
मांधाता चक्रवर्ती तु तदोतंकपुरःसरः ॥ २४३ ॥
एकोनविंश्यां त्रेतायां सर्वक्षत्रांतकृद्विभुः ॥
जामदग्न्यस्तथा षष्ठे विश्वामित्रपुरःसरः ॥ २४४ ॥
चतुर्विंशे युगे रामो वसिष्ठेन पुरोधसा ।
सप्तमे रावणस्यार्थे जज्ञे दशरथात्मजः ॥ २४५ ॥
अष्टमे द्वापरे विष्णुऽरष्टाविंशे पराशरात् ।
वेदव्यासस्तथा जज्ञे जातूकर्ण्यपुरःसरः ॥ २४६ ॥
बुद्धो नवमके जज्ञे तपसा पुष्करेक्षणः ।

---

* हा अत्रि ऋग्वेदांतील ग्रहणाचें अवलोकन करणारा व स्मृतिकार असावा. त्याचा पुत्र दत्त असावा.

' कृते त्वात्रिः समाख्यातो त्रेतायां गौतमोऽपि च ।
द्वापरे शंखलिखितौ कलौ पाराशरी स्मृतिः ॥ "

याप्रमाणें स्मृतिकार सांगितलेले आहेत. ' शूद्रावेदी पतत्यत्रेः ' ( ३–१६ ) असा मनूंत याचा उल्लेख आहे.

देवसुंदररूपेण द्वैपायनपुरःसरः ॥ २४७ ॥
तस्मिन्नेव युगे क्षीणे संध्याविष्टे भविष्यति ।
कल्की तु विष्णुयशसः पाराशर्यपुरःसरः ॥ २४८ ॥
दशमे भाव्यसंभूतो याज्ञवल्क्यपुरःसरः ॥
अध्याय ४७.

यांत खालील काळ आहेत: —

| नांवें. | या कल्पाचें मन्वंतर. | युग. | वर्ष. |
|---|---|---|---|
| दत्तात्रेय. | १ लें | ४ थें | त्रेता. |
| मांधातृ. | ५ वें (!) | १५ वें | त्रेता. |
| राम जामदग्न्य. | ६ वें | १९ वें | त्रेता. |
| राम दाशरथि. | ७ वे (!) | २४ वें | ,, |
| वेदव्यास. | ८ वें (!) | २८ वें | द्वापर. |
| गौतमबुद्ध. | ९ वें | ... | ... |
| कल्की. | १० वें | ... | ... |

यातील मांधातृ, राम दाशरथि व व्यास याचा काळ मन्वंतरात चुकला आहे असें दिसतें. व्यास ७ वे मन्वंतरांत होते हें तर निर्विवादच आहे. तेव्हां, पूर्वलेखावरून मन्वंतराची नीट कल्पना नसलेल्या माणसानें हा घोंटाळा केला असावा.* ' सप्तमे ' याचा अर्थ कोणीं तरी ' सात उलटून आठव्यांत ' असा केला असावा. याप्रमाणें रामाचाही काळ ७ व्या मन्वंतरांत न येतां ६ वे मन्वंतरांत येईल. मांधात्याचा काळही तसाच चुकला असावा. तो ४ थ्या मन्वंतरांत असावा. राम दाशरथि व पांडव यांच्यांत

* यावरूनही पुराणें ' पुनरुक्त ' झालीं आहेत हें सिद्ध होतें !!!

सुमारे ३०० वर्षांनें तरी अंतर असावें. सारांश, राम दाशरथि, व राम जामदग्न्य हे दोघेही साहव्या मन्वंतरांतले, व्यास ७ व्या मन्वंतरांतले, व गौतमबुद्ध ९ व्या मन्वंतरांतले, व मांधाता चौथ्या मन्वंतरांतला असे खरे काळ दिसतात.

याप्रमाणें पहातां मांधात्याचा काळ हा:—

३ मनु = ३ × २८८ = ८६४ वर्षें.<br>
१४ युगें = १४ × ४ = ५६ वर्षें.<br>
त्रेता = २ वर्षें.<br>
एकूण ९२२ ,,

(१) मांधात्याचा जन्म कल्पारंभापासून ९२२ वर्षी झाला !

राम जामदग्न्याचा काळ हा:—

५ मनु = ५ × २८८ = १४४०<br>
१८ युगें = १८ × ४ = ७२<br>
लेता = २<br>
१५१४

( २ ) राम जामदग्न्याचा कल्पापासून १५१४ वर्षी झाला.

राम दाशरथीचा काळ हा:—

५ मनु = ५ × २८८ = १४४० वर्षें.<br>
२३ युगें = २३ × ४ = ९२ ,,<br>
त्रेता = २ ,,<br>
१५३४

(३) राम दाशरथि कल्पापासून १५३४ त जन्मला.

दाशरथि राम व परशुराम हे समकालीनच होते. परशुरामानें हैहय कुलांतील सहस्रार्जुनास जिंकिलें होतें. या अर्जुनानें रामकालीन रावणाला कैदेत ठेविलें होतें. यावरून परशुराम व दाशरथि राम हे मूळचे समका-

लीन होत. गौतमबुद्ध ९ व्या मन्वंतरात म्ह. कल्पानंतर २३०४—२५९२ च्या दरम्यान जन्मला.

हेच काळ कल्प व इ. स. त सांगतोः—

| कल्पकाळ. | इ. पू. | काय झालें ते. |
|---|---|---|
| ९२२ | २१८० | मांधात्याचा जन्म. |
| १५१४ | १५८८ | परशुरामाचा जन्म. |
| १५३४ | १५६८ | रामाचा जन्म. |
| १८३६—४० | १२६६—६२ | व्यासांनीं वेदसंहिता रचिल्या. |
| २३०४ नंतर<br>२५९२ पर्यंत | ७९४ नंतर<br>५१० पर्यंत | बुद्धाचा प्रादुर्भाव. |

या बुद्धाचा प्रादुर्भाव ९ वे मन्वंतराच्या अखेरीस झाला असें वाटतें. सारांश, बुद्धानंतर बहुधा विक्रमापर्यंत या युग मन्वंतर पद्धतीची थोडीशी पुसट कल्पना होती. अर्वाचीन पौराणिक लेखकांनीं मन्वंतर ४—५—६—७—८—९—१० असे क्रमानें आणिले आहेत, त्यामुळें मन्वंतरात चूक आहे. ती दुरुस्त करण्यासारखीच आहे. व्यास ८ व्या मनूंत असणें अगदीं चुकीचेच आहे. ते सातव्यांतच पाहिजेत. सारांश, कल्पकाळांत मांधातृ, परशुराम, राम व व्यास याचे काळ दिलेले आपणास आढळतात. कल्पाचा प्रारंभ इ. पू. ३१०२ वर्षी झाला व कल्पाच्या मूळच्या कल्पने-प्रमाण त्याचा अवकाश ४०३२ वर्षांचा होता. तेव्हा सध्याचा वाराहकल्प खरोखर ४०३२ — ३१०२ = इ. स. ९३० च्या सुमारासच संपला! पण त्या अवधींत ४३२००० वर्षांचा कलि निर्माण झालेला असल्यामुळें, व कल्पारंभासच कल्यारंभ समजल्यामुळें, अद्यापि कल्प चालून आहे!! एकून, या कल्पाचा शोध हें कल्प ९३० इ. स. मध्यें संपल्यानंतर सुमारें १० ० हजार वर्षांनीं लागला म्हणावयाचा! दैवगति विचित्र आहे!

# प्रकरण ४ थें.



## पौराणिक इतिहास.



पौराणिक कालगणनेविषयीं केलेल्या विवेचनावरून कळून येईल कीं, व्यासांच्या आदिपुराणांत कांहीं तरी व्यवस्थित कालगणना होती व त्यामुळें इतिहास उत्तम रीत्या समजत असे; पण विक्रमाच्या वेळच्या व पुढील पौराणिकांनीं सर्वच घोटाळा माजवून पौराणिक इतिहास अत्यंत गढूळ केला. पुनः आतां या गढूळ पाण्यांत ज्ञानाच्या निवळीचें चीं उगाळून घालून या कल्पाचा भारतीय इतिहास विशद करण्याचा माझा प्रयत्न आहे.

हल्लींचा कल्प स्वायंभुव मनूपासून सुरू झालेला आहे. यामुळें स्वायंभुव मनूपासून इतिहासाचें अवलोकन करूं. स्वायंभुव मनूपासून पृथुवैन्यापर्यंत आपल्यांत राजसंस्था नव्हती; पेट्रिआर्क (प्रजापतिअंमलाची) पद्धति होती. पृथुवैन्य हा भारतीयांचा पहिला राजा होय! स्वायंभुव मनूपासून वैवस्वत मनूपर्यंत १९ पिढ्या पुराणांनीं दिलेल्या आहेत; आपण वैवस्वतमनूपासून सूर्यवंशाची तपासणी करूं.

वैवस्वत मनूचा पुत्र इक्ष्वाकु यानेंच प्रथम आर्यावर्तांत येऊन राजधानी स्थापिली.—

> क्षुवतस्तु मनोर्जज्ञे इक्ष्वाकुर्घ्राणतः सुतः ।
> तस्य पुत्रशतज्येष्ठाः विकुक्षिनिमिदंडकाः ॥ ४ ॥

तेषां पुरस्तादभवन् ्र्थ्यार्यावर्ते नृपा नृप ।
पंचविंशति पश्चाच्च त्रयो मध्ये परेऽन्यतः ॥ ५ ॥

भागवत ११—६.

इक्ष्वाकूनें प्रथम येऊन आपली राजधानी अयोध्या शहरीं स्थापिली ! त्यापासून पुढील राजे असेः—

| | | |
|---|---|---|
| १ इक्ष्वाकु | १५ संहताश्व | तूर्त रोहिताश्वापर्यंतच |
| २ विकुक्षि ( शशाद ) | १६ कृशाश्व | पाहूं.नववा जो श्रावस्त |
| ३ ककुत्स्थ (पुरंजय) | १७ प्रसेनजित् | याने श्रावस्ती नगरी |
| ४ अनेनस् | १८ युवनाश्व | स्थापिली. कुवलयाश्व |
| ५ पृथु | १९ माधातृ | ( ११ ) यानें मरुधन्व |
| ६ विश्वगश्व | २० पुरुकुत्स | देशांतील धुंधुमार रा- |
| ७ आर्द्र | २१ त्रसद्दस्यु ( संभूत ) | क्षसास मारिलें. युव- |
| ८ युवनाश्व | २२ अनरण्य | नाश्वाचा पुत्र मांधा- |
| ९ श्रावस्त | २३ पृषदश्व ( हर्यश्व ) | ता (१९वा) यानें चै- |
| १० बृहदश्व | २४ वसुमना | त्ररथीं कन्या विंदुम- |
| ११ कुवलयाश्व(धुंधुमार) | २५ त्रिधन्वा(त्रैय्यारुण) | ती इजशीं विवाह |
| १२ दृढाश्व | २६ सत्यव्रत( त्रिशंकु ) | केला. ही शशबिंदूची |
| १३ हर्यश्व | २७ हरिश्चंद्र | मुलगी होय. |
| १४ निकुंभ | २८ रोहिताश्व | |

चैत्ररथ उपवन हें मध्य एशियांत वाल्हीक देशांत होतें. यौवनाश्व मांधाता हा मोठा चक्रवर्ती होता. यानें गांधारदेशच्या अंगारकेतु राजास ठार केलें. ( हरिवंश, १–३२ पहा. ) मतिनाराची मुलगी गौरी ही युवनाश्वास दिली होती; तिचा हा मुलगा होय. ( हरिवंश १–३२–५ ). हरिवंश ( २–३७ ) मध्यें या मांधात्याच्या भावानें मधुदैत्याची मुलगी मधुमती इजशीं लग्न केल्यामुळे, मांधात्यानें त्यास मान्य मानिलें ! यामुळें मधुदैत्याचा बंधु लवण यानें मांधात्यास अयोध्येंत मारिलें !




उद्योगपर्वातील गालवाख्यानावरून याच सुमारच्या राजाविषयीं आणखीही माहिती मिळते. ( अ. पु. १३–१६ ) विश्वामित्राचा एक शिष्य गालव हा प्रतिष्ठान ( प्रयाग ) येथें राज्य करीत असलेल्या इदुवंशीय राजा ययाति याजकडे आला व त्यास पैसा मागितला, पण त्याजवळ पैसा नसल्यामुळें त्यानें आपली मुलगी माधवी ईस त्याजवळ पुरेसा पैसा उत्पन्न करण्यास दिली ! ! ! नतर गालवानें तिला इक्ष्वाकुवंशीय हर्यश्वराजाकडे नेली, त्यास तिच्या ठाई वसुमान नामक मुलगा झाला ! नतर त्यानें तीस भीमसेनाचा पुत्र दिवोदास—जो काशींत राज्य करीत होता—याजकडे नेली, तेथें तिला त्याच्यापासून प्रतर्दन नावाचा मुलगा झाला ! हर्यश्व व दिवोदास यानीं गालवास पैसे दिले नतर गालवानें तिला भोजनगरच्या उशीनराकडे नेलें तेथें तिला त्यापासून शिबि नावाचा मुलगा झाला नतर त्यानें तीस आपल्या गुरूंजीकडे म्हणजे विश्वामित्राकडेच नेल व त्यापासून तिला अष्टक हा पुत्र झाला , याप्रमाणे रकमेची पूर्ति झाली ! असो याप्रकारें प्रतर्दन, वसुमना, शिबि व अष्टक हे इदुवंशीय ययातीचे नातू होत ! प्रतर्दन, वसुमना, व शिबि हे अष्टकाच्या वाजपेय यज्ञास (नैमिषारण्यातील) आले होते. (वन पर्व अ. १९७ ) आदिपर्वातील उत्तर ययातिआख्यानात हे ययातीचे नातू असल्याचा उल्लेख आहे.

यावरून इल हा किंपुरुषवर्षातील बाल्हीक शहरीं राज्य करीत होता असें दिसतें. तसेंच, इला ही या इलाचीच कन्या असावी. तिनें बुधाशीं लग्न केलें. इल यास शशबिंदु नांवाचा एक पुत्र होता.

सुतो धर्मपरो ब्रह्मन् ज्येष्ठो मम महायशाः ।
शशबिंदुरिति ख्यातः स मे राज्यं प्रपत्स्यते ॥

यावरून बाल्हीक ऐल राजे व इंदुवंशीय राजे यांचा संबंध याप्रमाणें दिसतोः—




बाल्हीकदेशच्या इल राजवंशाचा संबंध एकेच काळीं चंद्रसूर्यवंशांशीं याप्रमाणें घडले. इलापति बुध यानें आंगिरस् कुलांतील संवर्तास आपला पुरोहित केला. इल कार्दमेयानें अश्वमेध यज्ञ केला, त्याची तयारी संवर्तांचा शिष्य मरुत्त यानें केली:—

संवर्तस्य तु राजर्षिः शिष्यः परपुरंजयः ।
मरुत्त इति विख्यातस्तं यज्ञं समुपाहरत् ॥

रामायण,७–९०.

नंतर इंदुवंशांतील बुध ह्यानें आर्यावर्तांत येऊन प्रतिष्ठान ऊर्फ प्रयाग

एथें आपली राजधानी स्थापिली ! हा इंदुवंशाचा आर्यावर्तातील प्रारंभ होय. इक्ष्वाकूबरोबरच कांहीं बुधाचा वंश सुरू होत नाहीं. शशबिंदु बाल्हीक देशांतच राज्य करीत असे.

> राजा तु बाल्हिमुत्सृज्य तथा देशं ह्यनुत्तमम् ।
> निवेशयामास पुरं प्रतिष्ठानं यशस्करम् ॥
> शशबिंदुस्तु राजाऽसीद्बाल्ह्यां पुरपुरंजयः ।
> प्रतिष्ठाने इलो राजा प्रजापतिसुतो बली ॥

* * * *

> ऐलः पुरूरवा राजा प्रतिष्ठानमवाप्तवान् ॥
>
> रामायण, ७–९०.

बुध किंवा ऐल पुरूरवा हा प्रयागांतील पहिला इंदुवंशीय राजा होय. इलाचा पुत्र शशबिंदु याची कन्या बिंदुमती इजशींच मांधात्यानें लग्न केलें. इलावर्त हा बाल्हीकाजवळचा प्रदेश दिसतो. आर्यावर्ताप्रमाणेंच इलावर्त शब्दही झालेला आहे. बाल्हीक देशाच्या या राजवंशाचा संबंध अयोध्येच्या सूर्यवंशाशीं व प्रयागच्या चंद्रवंशाशीं कोणत्या प्रकारें झाला हें वर दाखविलेलेंच आहे. वनपर्वाच्या १२६ अध्यायांत यौवनाश्व मांधाता हा सौद्युम्नी ( शशबिंदू )चा समकालीन म्हणून सांगितलेलें आहे. येथेही या मांधात्याकडून गांधारदेशचा इंदुवंशीय राजा ( अंगारकेतु ) मारला गेला असें म्हटलें आहे. याला-शशबिंदूची पुत्री जी बिंदुमती तिच्या पोटीं पुरुकुत्स–अंबरीष व मुचकुंद असे तीन पुत्र झाले. ( भागवत, ९–६ ).

आतां आपण मरुत्ताचे पूर्वज पाहूं:—

| | विष्णुपुराण | भारत-अश्वमेध. |
|---|---|---|
| | मनु | मनु |
| | ... ... | प्रसंधि |
| १ | नाभाग | क्षुप |
| २ | भलंदन | इक्ष्वाकु |
| ३ | वत्सप्रि * | ... ... |
| ४ | प्रांशु | ... ... |
| ५ | प्रजाति | ... ... |
| ६ | खनित्र | ... ... |
| ७ | क्षुप | ... ... |
| ८ | विंश | विंश |
| ९ | विविंश | विविंश |
| १० | खनीनेत्र | खनीनेत्र |
| ११ | अंतिभूति | सुवर्चस् |
| १२ | करंधम | करंधम |
| १३ | अविक्षित् | अविक्षित् |
| १४ | मरुत्त आविक्षित | मरुत्त |

मरुत्त हा संवर्त व क्षुप यांचा समकालीन होता. इक्ष्वाकूपासून मांधाता १९ वा आहे; पण विष्णुपुराणाच्या मोठ्या यादीप्रमाणेंही मरुत्त हा नाभागापासून १४ वा येतो. यावरून मनु व नाभाग यांत कांहीं पिढ्या लोटल्या आहेत असें वाटतें. याच मरुत्त आविक्षिताचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत आलेला आहे.

याप्रमाणें खालील राजांचें समकालीनत्व सिद्ध होतें:—

* हा भलंदन वात्सप्रीची ऋग्वेदांत कांहीं सूक्तें आहेत.

| सूर्यवंश | ऐलवंश | | सूर्यवंश |
|---|---|---|---|
| प्रसेनजित् | इल ( सुद्युम्न ) | | करंधम |
| युवनाश्व | | | अविक्षित् |
| | शशबिंदु | इला × बुध | मरुत्त |
| मांधाता—लग्न केलें | बिंदुमती | ऐलपुरूरवस् | |
| पुरुकुत्स | | आयु | |
| त्रसदस्यु | | नहुष | |
| अनरण्य | | नाहुष ययाति | |
| हर्यश्व—पृषदश्व यानें | लग्न केलें— | माधवी | १००० वर्ष |
| वसुमना | | | |
| त्रय्यारुण | | | |
| सत्यव्रत ( त्रिशंकु ) | | | |
| हरिश्चंद्र | | | |
| रोहित | | | |

चंद्रवंशाचा प्रारंभ याप्रकारें मांधाता—युवनाश्व याच्या वेळीं होत असून मनूच्या वेळीं होत नाहीं म्हणून या वंशाच्या पिढ्या थोड्या भरतात. असो. नहुषपुत्र ययातीनें सहस्रवार्षिक सत्र केल्याचा बृहद्देवतेंत याप्रमाणें उल्लेख आहे. हें सहस्रवर्ष म्हणजे कल्पारंभापासून १००० वें वर्ष होय!!!

राजा वर्षसहस्राय दीक्षिष्यन्नाहुषः पुरा ।
चचारैकरथेनेमां कुर्वन्सर्वाः समुद्रगाः ॥ २० ॥
यक्ष्ये वहत भाग मे द्वद्वशो वाथ वैकशः ।
प्रत्यूचुस्त नृपं नद्यः स्वल्पवीर्याः कथं वयम् ॥ २१ ॥

वहेम भागान्सर्वांस्ते सत्रे वार्षसहस्रिके ॥
सरस्वती प्रपद्यस्व सा ते वक्ष्यति नाहुष ॥

बृहद्देवता ६-२०.

याप्रमाणें, ययातीनें कल्पाचे हजारावे वर्षाचें सत्र केलें. कल्पाचे हजारावे वर्षांचाच उल्लेख खालील भारतलेखांत असावाः—

ततो वर्षसहस्रांते ययातिरपराजितः ।
स्थितः स नृपशार्दूलः शार्दूलसमविक्रमः ॥ ४६ ॥

भारत, आदिपर्व, अ. ७५.

येथें 'हजार वर्षांनीं' ययातीची तृप्ति झाली नाहीं असा बहुधा अर्थ घेतात; पण यानें ययाति १००० वर्षें जगला असा अर्थ होईल.

इक्ष्वाकुवंशीय पृषदश्व राजानें १००० वर्षांनंतर अरण्यवास पत्करिला असा मैत्र्युपनिषदांत उल्लेख आहेः—

" बृहद्रथो वै राजा विराज्ये पुत्रं निधापयित्वा । इदमशाश्वतं मन्यमानः शरीरं वैराग्यमुपेतोऽरण्यं निर्जगाम । अन्ते सहस्रस्य मुनेरंतिकमाजगाम ॥ .... .... आत्मविद्भगवान् शाकायन्यः महाराज बृहद्रथेक्ष्वाकुवंशज शीघ्रमात्मज्ञः कृतकृत्यस्त्वं; मरुन्नाम्नोति विश्रुतोऽसीति ॥ "

यावर टीकाकार म्हणतोः—

" मरुतो वायोर्नाम पृषदश्व इति तेन नाम्ना विश्रुतोऽसीति "

( आनंदाश्रम ग्रंथांक २९, मैत्र्युपनिषद्, पृ. ३५३ ). हा इक्ष्वाकुवंशीय राजा पृषदश्व कल्पाच्या १००० वे वर्षाच्या अखेरीस वनास निघून गेला ! एरव्हीं 'अन्ते सहस्रस्य' याचा अर्थ काय ?

याप्रकारें ययाति व पृषदश्व यांचे वेळीं कल्पाचें १००० वें वर्ष गेलें ! ! ही गोष्ट मागें आम्हीं मांधात्याचा काळ जो कल्प ९२२ ठरवि-

लेला आहे; त्यांशीं जुळते !!! ऐल पुरूरवा मांधात्याचा समकालीन होता. त्याचाही काळ कल्प ९२५ चा सुमारचा असावा. वैशंपायन जनमेजयास म्हणतात कीं:—

पुरोस्तु पौरवो वंशो; यत्र जातोऽसि पार्थिव ।
इदं वर्षसहस्राणि राज्यं कारयितुं वशी ॥

भारत, १–८५–३५.

मत्स्यपुराणांत ( अ. ३४ ) याच श्लोकाचा पाठ असा आहे कीं:—

पुरोस्तु पौरवो वंशो; यत्र जातोऽसि पार्थिव ।
इदं वर्षसहस्रातु राज्यं कारयितुं वशी ॥

या श्लोकांवरून पौरववंशस्थापकापासून जनमेजयाच्या अभिषेकापर्यंत सुमारें एक हजार वर्षे गेलीं असें म्हणण्याचा कवीचा रोख दिसतो. ऐल पुरूरवा हा या वंशाचा स्थापक; त्याचा काळ सुमारें कल्प ९२५. आतां जनमेजयाचा राज्याभिषेक केव्हां झाला तें पाहूं. भारतीययुद्ध कल्प १८३९ मध्यें झालें. पंधरा वर्षांनीं परीक्षित् राज्यावर बसला; नंतर त्यानें ६० वर्षें राज्य केलें; मग जनमेजय राज्यारूढ झाला. तेव्हां, जनमेजय राज्यारूढ झाला त्यावेळीं कल्याचीं (१८३९ + १५ + ६० =)१९१४ वर्षें त्याच्या वेळेपर्यंत झालेलीं होतीं; म्हणजे ऐल पुरूरव्यापासून सुमारें १००० च ( १९१४ – ९२५ = ९८९ ) वर्षें झालीं !!! ऐलाचा राज्यप्रारंभ ९२५ च्याही पूर्वी १०।१२ वर्षें झालेला असणें संभवनीय आहे. याप्रमाणें, चंद्रवंशाचा प्रारंभ सुमारें कल्प ९१४–९१५ स झालेला असावा !

## जनकवंशाचा प्रारंभ.

निमीचा वंशही चंद्रवंशाप्रमाणेंच इक्ष्वाकूपासून लगेच सुरू झाला नसावा. निमि हा इक्ष्वाकूचा वंशज असला तरी पुत्र नसावा. कारण,

यानेंही ययातीप्रमाणेंच हजार वर्षांचे सत्र केलें असें विष्णुपुराणांत म्हटलें आहे:—

इक्ष्वाकुतनयो योऽसौ निमिर्नाम स तु सहस्रसंवत्सरं सत्रमारेभे ४-४-५

यावरून निमि * कल्प १००० च्या वेळीं झाला हे कळेल; यामुळें हा निमि इक्ष्वाकुकुलांतील असला तरी त्याचा पुत्र दिसत नाहीं. या कल्पाचे १८२९ वे वर्षी भारतीय युद्ध झालें; याचे १९१४ चे सुमारास जनमेजय राज्यारूढ झाला. त्यानंतर शौनक नैमिषारण्यांत दीक्षित झाल्यावेळीं या कल्पाचें २००० वें वर्ष गेलें ! पहाः—

नैमिषे निमिषक्षेत्रे ऋषयः शौनकादयः ।
सत्रं स्वर्गाय लोकाय सहस्रसममासत ॥

भागवत १–१–४.

हें कल्पाचें दुसरें हजारावें वर्ष होय; म्हणजे ३१०२–२००० = इ. पू. ११०२ रें वर्ष होय. मूळ भागवत प्रथम सूतानें इ. पू. ११०२ वर्षी शौनकास सांगितलें ! ! !

यानंतर, बारा वर्षांनीं याच शौनकाला सौतीनें मूळ भारत ( द्वादशवार्षिक सत्र चालू असतां ) इ. पू. १०९० वर्षी सांगितलें ! ! !

यावरून सूर्यचंद्रवंशांचे वृक्ष याप्रमाणें कल्प काळांत दाखवितां येतातः—

* तसेंच, भारत, शांतिपर्व, यांत कपिलाच्या सांख्यशास्त्राचा प्रवर्तक पंचशिखाचार्य यानेंही ' सहस्रवार्षिक ' सत्र केल्याचा उल्लेख आहे. यावरून तो या निमीचाच समकालीन असावा; पंचशिखाचा काळ याप्रमाणें कल्प १००० म्हणजे इ. पू. २१०२ हा ठरतो.

तुलनात्मक वंशवृक्ष.

| | | | |
|---|---|---|---|
| स्वायभुव मनु | | | |
| ( कल्प १ ) | | | |
| ... ... | | | |
| वैवस्वत मनु | मनु | | |
| ( क. ४५० ) | ( ४५० ) | | |
| ( इ. पू. २५५० ) | क. सुमारें | चंद्रवंश | |
| यौवनाश्व | ... ... | ऐलपुरूरवा | |
| ( क. ९२२ ) | ... ... | ( ९१५ ) | |
| ( इ. पू. २१७० ) | ... ... | इ. पू. २१७७ | |
| पृषदश्व | निमि | ययाति | |
| ( क. १००० ) | ( १००० क.) | ( १००० क.) | |
| ( इ. पू. २१०२ ) | ( पंचशिख. ) | ... ... | |
| ... ... | ... ... | ... ... | |
| राम दाशरथि | सीरध्वज | ( अजमीढ ) | |
| क. ( १५३४ ) | ... ... | ... ... | |
| ... ... | ... ... | ... ... | मागध |
| वृहद्बल | बहुलाश्व | भारतीय युद्ध | जरासंध |
| क. ( १८३९ ) | | ( १८३९ ) | ... ... |
| ... ... | | ... ... | ... ... |
| ... ... | | शौनक | . ... |
| प्रसेनजित् | | ( २००० क.) | .. ... |
| ( इ. पू. ६०० ) | | ... ... | ... ... |
| ... ... | | उदयन | बिंबिसार |
| सुमित्र | | इ. पू. ६०० | (इ. पू. ६००) |
| ( इ. पू. ३८४ ) | | ... ... | ... ... |
| | | क्षेमक | महानंदि |
| | | ( इ. पू. ३८४) | (इ. पू. ३८४) |
| | | | चंद्रगुप्त |
| | | | इ. पू. ३१२ |

स्वायंभुवमनूपासून यौवनाश्वापर्यंत जवळ जवळ ( २० + १९ ) ४० पिढ्या गेल्या. पिढीस २२ ते २५ वर्षें धरिलीं तर तेवढ्या पिढ्यांची ८८० ते १०००च्या दरम्यान कांहीं वर्षें होतात; आपण मागच्या प्रकरणांत मांधात्याचा काळ ९२२ कल्प ठरविलेला आहे; तेव्हां तो बरोबरच दिसतोः—

चंद्रसूर्यवंशांचा आणखी संबंध दाखविणारा आणखी एक वंशवृक्ष* येथें देतोंः—

---

* युवनाश्वस्य पुत्रीं तु कावेरीं जन्हुरावहत् ॥ १९ ॥

\+ \+ \+ \+ \+

कुशिकस्तु तपस्तेपे पुत्रमिंद्रसमं प्रभुम् ॥ २४ ॥
लभतामिति तं शक्रः त्रासादभ्येत्य जज्ञिवान् ॥
पूर्णे वर्षसहस्रे वै ततः शक्रो ह्यपश्यत ॥ २५ ॥
पुत्रत्वं कल्पयामास देवेंद्रः सुरसत्तमः ॥
स गाधिरभवद्राजा मघवान् कौशिकः स्वयम् ॥
पौरुकुत्सा च तद्भार्या गाधिस्तस्यामजायत ॥

ब्र० पु० अ० ८.

हा कल्प १००० नंतरचा विश्वामित्र शकुंतलेचा बाप व कण्वमेधातिथींचा समकालीन होय. दीर्घतमा मामतेय याच शकुंतलेचा पुत्र जो भरत त्याचा पुरोहित झाला. ( तेव्हां तोही याच वेळचा होय. हा विश्वामित्र त्रिशंकूचा आश्रयदाता—रामकालीन विश्वामित्राहून भिन्न होय. एतेन ह्वा ऐंद्रेण महाभिषेकेण दीर्घतमा मामतेयो भरतं दौष्यंतिमभिषिषेच,(ऐतरेय ब्रा०पंचिका ८ ) हा ममता पुत्र दीर्घतमा कोण होता हें पाहूं—




दीर्घतमा जन्मांध होता; याचा लहान बंधु गौतम. यानें गौतमाच्या पत्नी वर हात टाकल्यामुळें उतथ्यानें यास नदींत फेंकून दिलें. पुढें हा नदींत वाहत असता **बलिराजानें** उचलून नेलें. त्यानें स्त्री सुदेष्णा इचे ठाईं यानें अंग, वंग कलिंगादि पुत्र उत्पन्न केले राणीनें द पाठविली होती तिच्या ठाईं यास काक्षीवान् झाला. बृहस्पतीचा मुलगा ाज हा **भरतास** मुलगा नव्हता म्हणून त्यास नेऊन दिला ! ! ! " वादोऽगिरस. सूनोरौरसस्तु बृहस्पते संक्रामितो भरद्वाजो महद्भिर्भरतम्प्रा ' बलि सुतपाचा पुत्र होय. येथें इतका विस्तार करण्याचें कारण हें कीं, उशिज, दीर्घतमा, काक्षीवान् हे वेदात येतात व हे ऋग्वेदातील सूक्तकार आहेत. गृत्समद व शौनक, दीर्घतमा, काक्षीवान्, कण्व, मेधातिथि, बालि, भरत, दुष्यंत हे कल्प १००० नतर लौकरच इ० पू० २००० च्या सुमारास होते ! भरताला कण्वानेंच वाढविलेलें आहे. तसंच याच सुमारच्या ( इ० पू० २००० ) विश्वामित्राच्या पुत्रानें ( सुश्रुतानें ) काशीस **दिवोदास** ( जो धन्वंतरीचा अवतार ) राजाजवळ आयुर्वेद मिळविला. भारत, अनुशासनपर्वांत सुश्रुत हा विश्वामित्राच्या पुत्रात आहे. तसेंच सुश्रुतसंहितेंत, सुश्रुत विश्वामित्रपुत्र असून दिवोदासाकडे शिकावयास गेला असें म्हटलेलें आहे. गालवाख्यानात,या वेळीं काशीस दिवोदासराजा होता, हें आम्हीं पाहिलें आहे.

याच कल्पाच्या **हजाराचें** स्मारक शुक्लयजुर्वेदात दोन ठाईं आलेलें आहे —( हाच मंत्र ऋग्वेदातही आहे ).

*याचा गौतमस्मृति नामक एक स्मृतिग्रंथही आहे, त्याचा हल्लींच्या भृगूक्त मानवसंहितेंत ( ३–१६ ) याप्रमाणें उल्लेख आहे —

**शूद्रावेदी पतत्यत्रेरुतथ्यतनयस्य च ।**
**शौनकस्य सुतोत्पत्त्या तदपत्यतया भृगोः ॥**

अयं सहस्रं ऋषिभिः सहस्कृतःसमुद्र इव पप्रथे ।
सत्यः सोऽस्य महिमा गृणेशवो यज्ञेषु विप्रराज्ये ॥

शुक्ल–यजुर्वेद, ३३–८३.

हा मंत्राचा द्रष्टा मेधातिथि कण्वाचा पुत्र आहे. ( सर्वानुक्रमणी, कात्यायनाची, पहा ). " ह्या हजाराचा सत्य महिमा Brahmanic-World ब्राह्मणसमुदायांत यज्ञांत फार गायिला जातो व तो ऋषींनीं जमून याची कल्पना केली आहे ! ! ! किंवा यास ठरविला आहे. " कण्व व मेधातिथि यांचे वेळीं कल्पाचें हजारावें वर्ष गेलें हें आम्हीं नुकतेंच वर पाहिलेलें आहे, तेव्हां मेधातिथीच्या वेळीं १००० वें वर्ष असल्यास नवल नाहीं. तसेंच,

सहस्रस्य प्रमाऽसि । सहस्रस्य प्रतिमासि ।
सहस्रस्योन्मासि । साहस्रोऽसि । सहस्राय त्वा ॥

शु० य० वे० १५–६५.

यांत ऋषि अग्नीला म्हणतो–तूं हजारांचें प्रमाण आहेस; तूं हजारांचा प्रतिनिधि आहेस; तूं हजार मोजणारा आहेस. तूं हजारांचा आहेस; तुला हजारांसाठीं मी ( प्रतिष्ठित करितों ) " यांत हें हजारावें वर्ष घेतल्यांखेरीज, व गयामयन कल्पनेमध्यें अग्नींच्या योगें ऋषि कालगणनापद्धति करीत असें पं० रसपरण श्यामशास्त्रीप्रमाणें मानल्याखेरीज, शब्दाचा निर्वाह लागणें शक्य दिसत नाहीं. नाहींतर अग्नीस असें म्हणणें याचा अर्थ काय ? हें कोण ऋषि अग्नीस म्हणतो, हें मात्र सर्वानुक्रमणीवरून कळलें नाहीं. मात्र आयूचें या अध्यायांत नांव आलेलें आहे. तेव्हां हा मंत्र रचणारा बहुतकरून आयूनंतरच्या असावा. आयूनंतर ययातीचे वेळीं कल्पाचें १००० वें वर्ष गेलें हें आम्हीं वर पाहिलेलेंच आहे. वैदिक ऋषींस कालगणना माहीत नव्हती असें आतां कोण म्हणूं शकेल ?




* याच मतिनारानें १०१२ वे वर्षाचें सत्र सरस्वतीवर केलें असा उल्लेख भारतांत आहेः—

" मतिनारःखलु सरस्वत्यां गुणसमन्वितम्।
द्वादशवार्षिकं सत्रमाहरत् । "

भारत १–९५–५.

हें पहिल्या हजारानंतरचें १२ वे वर्षाचें सत्र असावें. पुढे शौनकाच्या वेळीं सौतीनें भारत सांगितलें तेव्हा असेंच कल्पाच्या दुसऱ्या १००० वर्षानंतरही १२ वे वर्षाचें सत्र चाललें होतें !

यावरून, कल्प १००० च्या सुमारास असलेला मेनकावश होणारा शकुंतलेचा बाप–विश्वामित्र वेगळा व रामकालीन ( १५३५ ) विश्वामित्र वेगळा हें सिद्ध होतें.

रामाच्या वेळचा विश्वामित्र कदाचित् वरील विश्वामित्राचा वंशज असेल:—




भरत हा पहिल्या विश्वामित्राच्या पुत्रीचा म्ह० शकुंतलेचा पुत्र होय ! परशुराम रामाचा समकालीन. तसेंच जमदग्नीला ज्या सहस्रार्जुनानें मारिलें त्यानें रामायणकालीन रावणास माहिष्मतीस बंदिस्त करून ठेविलें होतें ! यावरून परशुराम–राम–जामदग्न्य, रावण, व सहस्रार्जुन, हे कल्प १५१५–३५ पर्यंत समकालीन दिसतात. पहिला विश्वामित्र बहुधा राजा असावा; व दुसरा रामाच्या काळचा बहुधा ब्राह्मण असावा. पुढें दोघांचाही घोंटाळा गाजविण्यांत आला. पहिल्या विश्वामित्रानें आपला पुत्र अजीगर्त यास पुरुषयज्ञार्थ हरिश्चंद्रास विकलें असावें !

## चातुर्वर्ण्याची स्थापना केव्हां झाली ?

आतां ओघानेंच वरील प्रश्नाची चौकशी करूं. विष्णु पुराणांत " गृत्समदस्य शौनकश्चातुर्वर्ण्यप्रवर्तयिता ऽ भूत् " असें म्हटलेलें आहे. [ ४-८-१ ]. याचा वंश असा दिलेला आहे:—




आपण मागें पाहिलेंच आहे कीं, ययातीच्या वेळीं कल्पाचे १०००वें वर्ष गेलें. त्यानंतर पुढच्याच पिढींत शौनक झाला. यावरून चातुर्वर्ण्याची प्रवृत्ति करणारा शौनक—कल्प १००० वर ५०—६० वर्षांनी म्हणजे इ० स० २०५० च्या सुमारास झाला असावा ! ! यानेंच चातुर्वर्ण्यसंस्था प्रवृत्त केली ! ! !

### एकंदर शौनक किती झाले.

( १ ) हा पहिला शौनक होय; याचींच श्रुतींत सूक्तें आढळतात; व यानेंच एकादें मंडळ तयार केलेलें असेल. हा कल्प १०५० म्हणजे इ. स.

---

* या गृत्समदाची ऋग्वेदांत उत्तम श्रुति आहे असें भारतांत व मत्स्यपुराणांत उल्लेख आहे.

२०५०च्या सुमारचा. गृत्समदाचा पुत्र. याविषयीं असें म्हटलें आहे कीं, ' य आंगिरसः शौनहोत्रो भूत्वा भार्गवः शौनकोऽभवत् ' स गृत्समदो द्वितीयं मंडळमपश्यत् ।' मंडलाची व्याख्या अशी दिलेली आहे:— " तत्तदृषिदृष्टानां बहूना सूक्तानामेकर्षिकर्तृको संग्रहो मंडलम् । " (शौनकाची सर्वानुक्रमणी.) सूक्ताची व्याख्या अशी आहे:—'संपूर्ण ऋषिवाक्यं तु सूक्तमित्यभिधीयते. ' यावरून हा स्वतः नवी सूक्तें करणारा व प्राचीन ऋषींच्या सूक्तांचा संग्रह करून त्यांचें मंडळ बनविणारा होता हे कळून येईल. एकून श्रुतींतील गृत्समदपुत्र शौनक–सूक्तमंडळद्रष्टा व विष्णुपुराणांतील चातुर्वर्ण्यप्रवर्तक–एकच शौनक होय. याचा काळ सुमारें इ. पू. २०५० वर्षे होय; याच्या सूक्तावरून याहीपूर्वीची माहिती काढता येईल.

( २ ) कल्पकृत्–शिक्षाकृत्–शाखाप्रवक्ता–आचार्य शौनक. हा वेदव्यासांनीं वेदसंहिता बनविल्यानंतर झाला असावा. शिक्षाकृत् शौनक पाणिनीपूर्वीचा होय (४ ३-१०६) "छंदसि किं, शौनकीया शिक्षा." या शौनकीय शिक्षेमध्यें कल्पकार शौनकाचा उल्लेख आहे. गंगाधरभट्टाचार्यांनीं व्याडीच्या विकृतिवल्लीवरील ' विकृतिकौमुदी ' टीकेंत म्हटलेलें आहे कीं:–

" शाकलाः शौनकाः सर्वे कल्पं शाखां प्रचक्षते । "

यावरून कल्पकृत्–शाखाकृत्–शौनक एकच होत हे कळेल; शिक्षाकारही हाच असावा. आश्वलायनगृह्यसूत्रांत याचाच उल्लेख आहे:—

औदवाहिं, महौदवाहिं, सौजामिं, शौनकं, आश्वलायनम् ॥ तसेंच वनपर्वाच्या प्रारंभीं पांडवास वनवासाचे वेळीं भेटणारा शौनक हाच असावा.

(३) व्यासांपासून भारत व भागवत ऐकणारा. याचा काळ कल्प२००० ते२०१२पर्यंत होय हें वर आलेलेंच आहे वर आलेलेंच आहे. म्हणजे हा इ.पू११०२ते१०९०पर्यंतचा होय; यानें दश ग्रंथ केल्याची प्रसिद्धि आहे. ते असे:—

( १ ) आर्ष्यानुक्रमणी, ( २ ) छंदोनुक्रमणी, ( ३ ) देवतानुक्रमणी ( ४ ) अनुवाकानुक्रमणी, ( ५ ) सूक्तानुक्रमणी, ( ६ ) ऋग्विधान, ( ७ ) पादविधान, ( ८ ) बृहद्देवता, ( ९ ) प्रातिशाख्य ( बह्वृच ), (१० ) स्मृति. *

हा शौनक आपल्या प्रातिशाख्यात नानाठाईं व्याडीचा उल्लेख करितो; जसें:—

उभे व्याडिः समस्वरे. ( ३–१३ ) व्याडिस्तौ चेत्परौ स्वरौ (३-८) व्याडिशाकल्यगार्ग्याः ( १३–३८ ) व्याडिर्नासिकानुनासिकं वा (१३–४४ ) या व्याडीनें ' विकृतिवल्ली' व ' संग्रह ' असे दोन ग्रंथ लिहिलेले आहेत. विकृतिवल्लींत व्याडि शौनकाचा उल्लेख करितोः—

उदात्तादिनिधानं तच्छौनकोक्तं भवेदिह ।

वि. व, १–१५.

यावरून, प्रातिशाख्यकार शौनक व वल्ली व संग्रहकार व्याडि हे दोघेही (व्याकरणावर लिहिणारे) समकालीन दिसतात, पण पुढील वाक्यावरून याविषयीं शंकाही राहत नाहीं, पहाः—

नत्वाऽदौ शौनकचार्यं गुरुं वेदमहानिधिम् ।
मुनीन्द्रं सर्ववेदज्ञं ब्रह्मज्ञं लोकविश्रुतम् ॥

व्याडीची विकृतिवल्ली १–२.

यावरून प्रातिशाख्यकार शौनक हे व्याडीचे गुरु होते हें कळून येईल.

---

* या शौनकस्मृतीचा हल्लींच्या भार्गवी मानवसंहितेंत उल्लेख आहे:—

शूद्रावेदी पतत्यत्रेःउतथ्यतनयस्य च ।
शौनकस्य सुतोत्पत्त्या तदपत्यतया भृगोः ॥ ३–१६

यावरून भृगूक्तमानवसंहिता शौनकोत्तर अत एव व्यासोत्तरकालीन आहे हें सिद्धच होतें ! ! !

याच व्याडीनें पाणीनीय व्याकरणावर लक्षश्लोकात्मक संग्रह नांवाचा ग्रंथ लिहिला आहे; त्याचा उल्लेख वृत्तींत असा आहे:—

ससंग्रहं व्याकरणमधीते । ६–३–३६ तसेंच ( २–३–६६ ) वरील वृत्तींत कात्यायन म्हणतो, कीं:—

शोभना खलु दाक्षायणस्य संग्रहस्य कृतिः । शोभना खलु दाक्षायणेन संग्रहस्य कृतिः । ( व्याडीसच दाक्षायण म्हणत असत ).

व्याडीच्या या संग्रह ग्रंथाचा पतंजलीनें महाभाष्यांत उल्लेख केलेला आहे:—

संग्रहे एतत्प्राधान्येन परीक्षितम् ।

यावर, संग्रहो व्याडिकृतो लक्षश्लोकसंख्यो ग्रंथ इति प्रसिद्धिः । असा नागेशभट्टानें कैय्यटव्याख्याविवरणांत खुलासा केलेला आहे; शिवाय भर्तृहरीच्या वाक्यप्रदीपांत या व्याडीच्या संग्रहाचा उल्लेख आहे:—

प्रायेण संक्षेपरुचीन् अल्पविद्यापरिग्रहान् ।
संप्राप्य वैयाकरणान् संग्रहेऽस्तमुपागते ।
कृतेऽथ पतंजलिना गुरुणा तीर्थदर्शिना ।
सर्वेषां न्यायबीजानां महाभाष्ये निबंधने ।

\+ \+ \+ \+

यः पतंजलिशिष्येभ्यो भ्रष्टो व्याकरणागमः ।
कालेन दाक्षिणात्येषु ग्रंथमात्रे व्यवस्थितः ।
पर्वतादागमं लब्ध्वा भाष्यबीजानुसारिभिः ।
स नीतो बहुशाखत्वं चंद्राचार्यादिभिः पुनः ।

हा भर्तृहरि महाभाष्य, *चंद्राचार्य व आचार्य वसुरात ( इ. स. ४८० ) यानंतरचा इ. स. ६०० च्या सुमारचा ( बौद्ध ) ग्रंथकार होय.

याप्रमाणें, संग्रह हा पाणिनीय व्याकरणावरील टीकारूप असा व्याडीचा ग्रंथ होय हें कळून येईल.

गरुडपुराणांत ह्याचा असा उल्लेख आहे:—

* याच चंद्राचार्याचा, तो अभिमन्युनामक काश्मीरराजाच्या नाचा समकालीन होता व त्यानें महाभाष्य काश्मीरदेशांत आपलेंही व्याकरण सुरू केलें असा उल्लेख आहे; पहा:—

चंद्राचार्यादिभिर्लब्ध्वा देशात्तस्मात्तदागमम् ।
प्रवर्तितं महाभाष्यं स्वं च व्याकरणं कृतम् ॥

राजतरंगणी १–१७६.

चंद्राचार्य व नागार्जुन भिक्षु काश्मीरच्या अभिमन्यूच्या वेळीं होते असें म्हटलेलें आहे. नागार्जुनाचा काळ मागें आम्हीं इ० पू० ७४–४० पर्यंत असलेला पाहिलेला आहे. त्यावरून चंद्राचार्य व अभिमन्यु यांचाही काळ इ० पू० पहिले शतक हाच ठरतो. यांहीपूर्वी पतंजलीचें भाष्य होतें ! त्याचा काळ इ० पू० १५० सामान्यत: धरितात. यानें काश्मीरच्या जलूक राजाचा उल्लेख केलेला आहे:—वाररुचं काव्यं, जालूकाः श्लोकाः ( ४–३–१ ). कित्येक हा जालूक म्हणजे चंद्रगुप्ताचा समकालीन यवनराजा ' सेल्यूकस् ' समजतात. असें असेल तर पतंजलीचा काळ इ० पू० ३००च्या नंतर ठरवावा लागेल. पुष्पमित्र व अग्निमित्र ( शुंगराजे ) यांचा व 'अरुणद्यवनः साकेतम्' या यवनांनीं साकेतास वेढलेल्या हकीकतीचा यानें उल्लेख केलेला असल्यामुळें याचा काळ सामान्यतें इ० स० १४४ नंतर धरितात. पुष्पमित्राचा काळ इ० पू० १७५–१३९ हा आहे. अग्निमित्र त्यानंतरचा. ( साकेतावरची ) मिनांडरची स्वारी इ० पू० १४४ च्या सुमारची. यामुळें इ० पू० १४० च्या सुमारचा पतंजलि धरणें जरूर पडतें. इ० पू० दुसरें शतक हा याचा काळ होय !

व्याडिर्जगाद जगतां हि महाप्रभावः
सिद्धो विदग्धहिततत्परया दयालुः ॥

रत्नप्रकरण.

हा प्रमाणभूत रससिद्ध होता अशी माहिती रत्नसमुच्चयांत मिळतेः—

व्याड्याचार्यश्चंद्रसेनो इ० ।

यावरून याचा रसविद्येवर तिसरा एकादा ग्रंथ असावा. असो.

याचा संग्रहग्रंथ पाणिनीय व्याकरणावर टीकारूप असल्यामुळें, अर्थात्च पाणिनि, शौनक व त्याचा शिष्य व्याडि—यांहून प्राचीनतर ठरेल ! म्हणजे कल्प २००० ऊर्फ इ० पू० ११०२ च्या पूर्वीच पाणिनीचा काळ येतो.

## पाणिनीचा काळ.

*पाणिनि हा पिंगलाचा बंधु होता, अशी षड्गुरुशिष्यानें एक परंपरा* दिलेली आहे. ती खरी असेल तर पाणिनीचा बरोबर काळ ठरेल. भारत *आदिपर्व, अ. ५३ मध्यें जनमेजयाच्या सर्पसत्रांत कोणकोण सदस्य होते* हें सांगितलें आहे; त्यात पिंगल, जैमिनी, व्यास, उद्दालक वगैरे नांवें आहेतः—

उद्गाता ब्राह्मणो वृद्धो विद्वान्कौत्सोऽथ जैमिनिः ।
ब्रह्माऽभवत्सार्ङ्गरवो अध्वर्युश्चापि पिंगलः ॥ ६ ॥
सदस्यश्चाभवद्व्यासः पुत्रशिष्यसहायवान् ॥
उद्दालकः प्रमतकः श्वेतकेतुश्च पिंगलः ॥ ७ ॥

सातव्या श्लोकांतील ' पिंगल ' श्वेतकेतूचें विशेषण आहे. साहव्यातील पिंगल हें अध्वर्यु पदावर असलेल्या ऋषीचें नांव आहे. पुढें समारोप करितेवेळीं ' एते चान्ये च बहवो ब्राह्मणा वेदपारगाः । सदस्याश्चऽ

भवंस्तत्र सत्रे पारीक्षितस्य हि ॥ ' असें म्हटलेलें आहे. या वेळीं विद्वान् कौत्स म्हातारा होता. याचा पाणिनि उल्लेख करतो. हा पिंगल वेदपारग आहे. याचा बंधु पाणिनि. यावरून जनमेजयाच्या हा समकालीन ठरतो.

जनमेजयाची कारकीर्द कल्य ( १८३९ + १५ + ६० =) १९२४ ला सुरू झाली. हा पाणिनि कल्य १९०० च्या सुमारचा असावा; म्हणजे इ० पू० १२०० च्या सुमारचा असावा. पाणिनीनें पाराशर्य, वासुदेव,

| परीक्षित् जन्म, कल्य १८३९ इ. पू. १२६३ | |
|---|---|
| जनमेजय | इ. पू. |
| पाणिनि पिंगल | १२००–११६० |
| शौनक व्याडि | ११०० सुमारें. |
| यास्क * | १००० ,, |
| कात्यायन § | ५००–४०० सुमारें. |
| पतंजलि | १४० इ. पू. |
| चंद्राचार्य ( अभिमन्यु ) नागार्जुन | ७५–४० इ. पू. |
| वसुरात | ४८० इ. स. |
| भर्तृहरि ( वाक्यपदीयाचा कर्ता ) | ६१० इ. स. सुमारें. |

* यास्क यास पाणिनि व शौनक याहून अर्वाचीन कां धरावें ? याविषयीं सविस्तर विवेचन पंडित सत्यव्रत सामश्रमि यानीं आपल्या **निरुक्तालोचनांत** केलेलें आहे.

§ या कात्यायनाचा शिष्य मगधदेशचा महानंदिराजा होता असें भविष्य पुराण म्हणतें:—

**पुनः क्षत्रत्वमगमन्मागधं स महीपति ॥ ५ ॥**
**महानंदीति विख्यातो राजनीतिपरायणः ।**
**कात्यायनस्य शिष्योऽभूत् महाशास्त्रस्य धीमतः ॥६॥**

भविष्य पु. प्रतिसर्गपर्व, खंड २, अ ३४.

अर्जुन, जनमेजय इत्यादिकांचा व कौत्साचा उल्लेख केलेला आहे. विद्वान् कौत्स याच्या वेळीं म्हातारा होता. यावरून या ग्रंथकारांचा काळानुक्रम मागील पानांत दिलेल्या कोष्टकाप्रमाणें लागतोः—

याप्रमाणे अर्वाचिन राजांच्या बरोबरच अर्वाचीन ग्रंथकाराचाही इतिहास व काळनिर्णय येथें सांगितलेला आहे. व्याडिशौनकांच्या शिष्य-गुरु संबंधामुळें व शौनकाचा काळ कल्प २०००—२०१२ हा ठरल्यामुळें पाणिनीस इ. पू. ११०० च्या अलीकडे आणतांच येत नाहीं. त्यानें जनमेजय व वैशंपायन यांचा उल्लेख केलेला असल्यामुळें त्यास त्यांच्यानंतर ठेवणें जरूर आहे. यावरून इ. पू. १२००—११६० हा त्याचा काळ अगदीं बरोबर दिसतो. असो.

> इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत् ।
> बिभेत्यल्पश्रुताद्वेदो मामयं प्रतरिष्यति ॥ भारत

या प्रकरणावरून, भारत ( इतिहास ) व पुराणें यांच्यायोगें वैदिक ऋषि व त्या काळची परिस्थिति यावर कसा प्रकाश पाडितां येईल—व भारतीय इतिहास काळपरिगणनेसह ( Chronology ) कसा लिहितां येईल याची वाचकास चांगलीच कल्पना आली असेल. मागचा इतिहास शोधून काढणें पुढील पिढीकडे सोंपविलें पाहिजे.

---

# प्रकरण ५ वें.



## पौराणिक भूगोल.

काहीं दिवसापूर्वी केसरींत रा. राजवाडे यानीं ' आमचीं पुराणें व असीरियातील नवे शोध ' म्हणून काहीं लेख छापले. त्यात पौराणिक भूगोल म्हणजे कविकल्पना नसून, त्यात प्राचीन काळच्या भूलोकावरील त्या त्या देशाचीं नावें आहेत असें त्यानीं दाखविलेलें आहे. मी त्याच माहितीचा सारांश, व इतर थोडी माहिती दिग्दर्शनार्थ येथें देतों. आपल्या पौराणिक भूगोलावर असीरियातील नव्या शोधाचा प्रकाश पडलेला आहे. तेथील इष्टिकालेखावरून आशियाखडाच्या प्राचीन इतिहासावर प्रकाश पडतो. तसेंच, पूर्वी एके काळीं ग्रीसपासून चीनपर्यंतचे सर्व देश चातुर्वर्ण्यविशिष्ट होते, पण हे चातुर्वर्ण्य त्यास न झेंपल्यामुळें आर्यावर्ताशिवाय बाकी सर्व आशियातील लोकानीं मनुसहितेंत सागितल्याप्रमाणे चातुर्वर्ण्य धर्म सोडून ते ( वृषल ) झाले, हेंही करून आलेलें आहे.

मद उर्फ मदग

भारताच्या भीष्मपर्वाच्या अकराव्या अध्यायात शाकद्वीपात मग, मशक, मानस, व मदग हे चार वर्ण असल्याबद्दल उल्लेख आहे मग हे शाकद्वीपीय ब्राह्मण होत, मशक हे क्षत्रिय, मानस हे वैश्य व मदग हे शूद्र होत. प्राचीन असीरियन् लोक आपणास ' अशूर ' ( असूर ) म्हणवीत, असीरियन हा अपभ्रष्ट उच्चार आहे. या असुर किंवा अशूर लोकाच्या इतिहासात मद ( उर्फ मदग ) याचा वारवार उल्लेख येतो ( Historians' His of the World, खड २ रा, पृ. ५९९ पहा ) त्यात मद लोकाची नरीच माहिती आहे. यात सिथियन म्हणजेच मद ( Manda ) होत असें म्हटलेलें आहे.

सिथियन हा अपभ्रष्ट उच्चार असून शकस्थानीय–सकस्थानीय–स्कथियन–Skythian—अशी उच्चारपरंपरा अपभ्रष्ट झाली! सिथियन तेच शक' होत. मंद हे शाकद्वीपांतील शक–शूद्र होते; हे मिडां-( Medes ) हून भिन्न होत. मंद नांवाच्या शक–शूद्रांनीं इ० पू०७०० ते ५५० पर्यंत ' असुर ' देशावर राज्य केलें; नंतर ' इलाम ' Elam प्रांतांतील Cyrus यानें आपलें राज्य सुरू करून असुरांचें राज्य बुडविलें, असुरांच्या लेखांतील मंद तेच आपल्या इतिहासपुराणांतील शक–शूद्र मंदग होत! भीष्माच्या वेळीं भारतीय आर्य या मंदगास शक–शूद्र समजत; पण असुरांच्या लेखांत त्यांना शक–शूद्र कोठेंही म्हटलेलें नाहीं. याचा अर्थ असा कीं, भीष्माच्या वेळीं शाकद्वीपीय लोकांत जें चातुर्वर्ण्य होतें, तें असुरहडन Esarhaddon ( असुरहयवदन ! ) याच्या वेळेपर्यंत पार मोडून जाऊन मंद म्हणजे शाकवंशीय एक कुळ एवढीच प्रसिद्धि इ० पू० ७०० च्या सुमारास होती.

श्रीकृष्णपुत्र सांब यानें शाकद्वीपाहून सूर्यप्रतिमास्थापनार्थ मग ब्राह्मण आणविले होते अशी भविष्यपुराणांत कथा आहे. ( ब्राह्मपर्व, अ. १३९ व पुढें पहा ). यावरून या वेळीं शकद्वीपांत चातुर्वर्ण्य अजून कायम होतें असें वाटतें; पण तेव्हा त्यांच्यांत धर्मभ्रष्टतेला सुरवात झालेली होती असें ' भोजक ' शब्दावरून दिसतें:—

अनुष्ठानविहीना ये न ते भोज्यास्तु भोजकाः ।

त्यांतील ' भोजक ' हे अनुष्ठानहीन असल्यामुळें अभोज्य–अपांक्त होत! सांबानंतर इ० पू० ७०० च्या मध्यंतरीं हे शाकद्वीपीय सर्वच शूद्रप्राय होऊन एकवर्णी मंद झाले व रानटी स्थितीस पोंचले ( वृषलत्वं गताः ) होते असें अनुमान होतें.

*Cyrus* हा Cambyses चा *मुलगा* कांबोज होतो. Cyrus हा अपभ्रष्ट उघार असून तो शब्द Kurus असा पाहिजे.

हा कुरुस् Cambyses Cyrus ( Kambujiya ) 'कांबुजीय' याचा मुलगा होता. यावरून कुरुस् हा कांबोज देशाच्या राजाचा मुलगा होय ! हें कुरुकुळ 'कांबोज' होतें. Kurus हा *Elamite* हा *नव्हता* व *Persian* ही *नव्हता* ! तर 'कंबोज' होता. हे कंबोज पुढें नृपलत्व पावले.

इलावृत्त ( *इलाम* व *इलिप्पि*–] *इलिपि* हा *मुख्य*देश *अ*सून *इलाम* हा एक त्याचा प्रांत होता. असीरिया व बाबिलोनिया यांच्या पूर्वेस कास्पीयन ( कश्यपीय ) समुद्रापर्यंत पसरलेला मुलूखच 'इलिपि' म्हणवीत असे. जंबुद्वीपांत आपले पौराणिक ग्रंथांत भारतवर्ष, किंपुरुष-वर्ष, हरिवर्ष, रम्यक, उत्तरकुरुवर्ष, हिरण्मयवर्ष, हिरण्मयवर्ष, इलावृत्त-वर्ष असे भाग सांगितलेले आहेत. इलावृत्त शब्दांतील 'त्त' चा 'प्प' होऊन 'इलाइप्प' असा अपभ्रंश होऊन 'इलिप्पि' हें नांव पडलें असावें. या 'इलिप्पि' ऊर्फ 'इलावृत्त' देशांत Medes मीढ लोक राहात. अजमीढ, पुरुमीढ वगैरे सर्व राजे मूळचे इलावृत्तवर्षांतूनच भारत वर्षांत आले असावेत असें वाटतें. हे Medes म्हणजे 'मीढ' च होत !

पर्शु—कांबुजीय याचा मुलगा कुरुस् ( Cyrus ) हा–'इलिप्पि' देशाच्या 'इष्टुवेगु' राजास *जिंकल्यानंतर तीन वर्षांनीं*, ख्रि० इ. पू. ५४६ मध्यें– आपणांस 'पर्शूंचा राजा' म्हणवूं लागला. पारसीक–पर्शु* पल्हव—हे एकच होत. इ. स. ५५० च्या पूर्वी या लोकांस पर्शु

* ऋग्वेद ८–६–४६ मध्यें पर्शु तिरिंदराचा उल्लेख आहे; तसेंच सांख्यायन श्रौतसूत्रातही 'तिरिंदिर पारशव्या' चा उल्लेख आहे. हा तिरिंदिर पर्शूंचा राजा असून, तो Tiridates असावा, असें वेबर म्हणतो; पण याचा काळ पाहिला पाहिजे.

किंवा पर्सु, म्हणत असत. हे 'इलिप्पि' देशांत 'मीद' लोकांच्या दक्षिणेस राहात असत. हे 'इलिप्पीच्या' राज्यांत इ. पू. ४००० वर्षापासून प्रसिद्ध होते. यांच्या वैदिकधर्मात झर्तुष्ट याच्या द्वारा बराच फरक झाला व हा विपर्यस्त धर्म व इ. पू. ५०० नंतर बरेच पारसिक लोकांनीं स्वीकारिला. *Parthians* हे 'पारद' होत; हे पारद गांधार देशाच्या शेजारीं राहात.

वर्बर—बर्बर—बब्बल—बाबल अशीं अपभ्रष्टरूपे झालीं असावींत, बौद्ध लोकांनीं बाबिलोनियाला 'बावेरु' म्हटलेलें आहे. त्यांचें एक 'बाबेरु' जातकच आहे. यांचा उल्लेख पहा:—

यावना ऽ किराता गांधाराश्चीनाः शबरबर्बराः
शकास्तुषाराः कंकाश्च पल्हवाश्चांध्रमद्रकाः ॥

शांतिपर्व १६५ अ.

इलावृत्त हा जो जंबूद्वीपाचा एक भाग, याच्यात असुरांच्या काळीं शकांनीं स्वाऱ्या करून राज्यें मिळविलीं होतीं. हे मूळचे शाकद्वीपांतले होत. तिकडून ते इलावृत्तांत आले होते ( इ. पू. ६०० ).

जंबूद्वीप—काश्मिराच्या उत्तरेस एका बिंदूपासून सहा पर्वतांच्या रांगा निघालेल्या आहेत. ( १ ) हिमालय, ( २ ) काराकोरम, ( ३ ) कुवेनलुन, ( ४ ) थियेनशान, ( ५ ) हिंदुकुश, ( ६ )सुलैमान. हे साहा पर्वत ज्या मध्यबिंदूपासून निघतात त्यास पुराणकार मेरुपर्वत म्हणतात. हा पर्वत भूपद्माच्या कर्णिकेसारखा आहे. याच्या दक्षिणेस हिमालय, हेमकूट व निषध असे तीन पर्वत आहेत. हेमकूट म्ह० हिंदुकुश. व निषध म्ह० सध्याचा सुलैमान, नील म्ह० काराकोरम, श्वेत म्ह० कुवेनलुन, व शृंगी म्ह० थियेनशान असे रा. राजवाड्यांचें मत आहे. हे सहा पर्वत ज्या द्वीपांत आहेत तें जंबूद्वीप होय. जम्बु हें जंबूचा अवशेष आहे. जंबू-

द्वीपात भारतवर्ष, किंपुरुषवर्ष, हरिवर्ष, रम्यकवर्ष, हिरण्मयवर्ष, उत्तरकुरुवर्ष, इलावृत्तवर्ष, भद्राश्व, व गंधमादन असे नऊ विभाग आहेत. पैकीं पहिले तीन मेरूच्या दक्षिणेस; व दुसरे तीन मेरूच्या उत्तरेस असून या सार्हींच्या मध्यभागीं विस्तृत असें पश्चिमेस इलावृत्तवर्ष आहे. पूर्वेस भद्राश्ववर्ष आहे व मध्यें गंधमादन आहे. पैकीं मानससरोवर ज्यात आहे तें भद्राश्व, आफगाणिस्तान व पर्शिया ज्या भागात आहेत तें इलावृत्त व मेरूच्या उत्तरेकडील तें उत्तर कुरुवर्ष होय, असे रा. राजवाडे म्हणतात. जंबूद्वीपाच्या मेरु ऊर्फ गंधमादन प्रदेशात प्राचीनकाळीं देव रहात असत.

## प्लक्षद्वीप.

सध्याचें आशियाटिक तुर्कस्थान, युरोपियन तुर्कस्थान व ग्रीस मिळून पूर्वीचें प्लक्षद्वीप होय. ग्रीकाच्या अतिप्राचीन इतिहासात Palasgie म्हणून नाव येतें ते 'प्लक्षा' चें अपभ्रष्ट रूपच होय. प्लक्षद्वीप क्षारोद समुद्राभोंवती आहे. क्षारोद म्ह० सध्याचा भूमध्यसमुद्र होय, असें रा० राजवाडे याचें मत आहे. प्लक्षद्वीपात आर्यक, कुरव, विविंश व भाविन असे चार वर्ण असत.

प्लक्षद्वीपादिषु ब्रह्मन् शाकद्वीपांतिकेषु च।

विष्णु पुराण.

## शाल्मलिद्वीप.

सध्याचा Black Sea म्हणजे इक्षुरसोद असून तो व कास्पीयन समुद्र यामधील प्रदेश शाल्मलिद्वीप होय, असें रा० राजवाडे म्हणतात.

## कुशद्वीप.

सध्याचा कास्पीयन समुद्र म्ह० सुरोद व अरल समुद्र म्हणजे घृतोद असून यामधील प्रदेशच कुशद्वीप होय, असें राजवाडे याचें मत आहे. कुशद्वीप हिंदुकुशाच्या उत्तरेस होतें. असुर व बर्बर लोक कुशद्वीपातील

लोकांस Kosseans म्हणत. इ. पू. १७८३च्या सुमारास इलाम प्रांताच्या पर्वतांमधून कोशिय येऊन बर्बर देशावर राज्य स्थापिलें." कडाफासिस व कनिष्क हे कुश उर्फ कूशन होते, हे कोशियन ( कूशन ) कोठें राहात असत याबद्दल लिहिलेलें आहे, कीः—"ग्रीसच्या पूर्वेस शॉग्रॉस पर्वताच्या बिनरस्त्याच्या प्रदेशांत, कोशियन लोक राहत असत." ( H. Hist of the world, Vol. I, P. 341.)

## क्रौंचद्वीप.

घृतोदाच्या पश्चिमेस क्रौंचद्वीप. सध्याचीं समरकंद व बुखारा शहरें असलेला टापू असें रा. राजवाडे यांचें मत आहे.

## शाकद्वीप.

क्रौंचद्वीपाच्या पूर्वेस उत्तर समुद्राच्या व अलताई पर्वताच्या दिशेनें शाकद्वीप होतें. या द्वीपांत मग, मशक, मानस व मदंग असे चार वर्ण असत. मागें यांविषयीं उल्लेख आलेलाच आहे.

## पुष्करद्वीप.

सध्याच्या चीनच्या उत्तरेकडील जो भाग तो पुष्करद्वीप होय, असें रा. राजवाडे यांचें मत आहे. मानसोत्तरपर्वत म्ह. कुएनलन असून त्यानें पुष्करद्वीपाचे दोन भाग होतात.

एकश्चात्र महाभाग प्रख्यातो वर्षपर्वतः।
मानसोत्तरसंज्ञो वै मध्यतो वलयाकृतिः ॥ ७५ ॥
पुष्करद्वीपवलयं मध्येन विभजन्निव।
स्थितोऽसौ तेन विच्छिन्नं जातं तद्वर्षकद्वयम् ॥ ७७ ॥

विष्णु पु. २।४.

जंबूद्वीपाच्या पश्चिमेस प्लक्षद्वीप व पूर्वेस पुष्करद्वीप, उत्तरेस शाल्मलिद्वीप, कुशद्वीप व शाकद्वीप; व या सर्वांमध्यें जंबूद्वीप, जंबूद्वीपाचा दक्षिण

भाग तो भारतवर्ष, पश्चिमभाग तो इलावर्ष; उत्तरभाग तो उत्तरकुरुवर्ष व पूर्वभाग तो भद्राश्ववर्ष, उत्तरकुरुवर्षाच्या उत्तरेस उत्तरसमुद्रापर्यंत जो प्रदेश तो शाकद्वीप.

रा. राजवाडे कांहीं स्थळांची अर्वाचीन नांवें व ऐक्यें ( Identifications ) देतात:—जम्मू=जंबू; हिंदुकुश=हेमकूट; इलाम=इलावृत्त; अश्शूर=असुर, बाबिलोन=बर्बर, बेलारन्न=लक्ष, कौशियन=कुश, सिकथियन=शाक; पर्शु=पल्हव. हीं नावांचीं साम्यें काल्पनिक किंवा आकस्मिक नाहींत; हें पुरातन भूवर्णन आहे.

तैग्रिस व बाबिलोनच्या उत्तरेस राहणारे लोक असुर होत. असुर व बर्बर लोकांचे इष्टिकालेख जसजसे प्रकाशांत येतील, तसतसा भारतवर्षाच्या प्राचीन इतिहास व भूगोल यावर प्रकाश पडेल अशी आशा वाटते. रा. राजवाडे यांनीं हिंदुस्थानांतील बकासुर, मयासुर यांबरोबरच जरासंध, शिशुपाल व कंस यांस असुरांत ओढिलें आहे ! ! पण ती चूक होय. शिशुपाल व कंस हे आर्य क्षत्रिय होते. जरासंधास कोणींही असुर म्हटलेलें नाहीं !

### किन्नर किंवा किंपुरुष !

यासच पाश्चात्य ग्रीक वगैरे लोकांनीं Cimmerians किंवा Kinnierians म्हटलेलें आहे. जंबूद्वीपांत किंपुरुषवर्ष किंवा किन्नरवर्ष हा एक भाग होता, हे शाकांपैकीं जे मंद लोक त्याहून भिन्न होते, पण हे उमन मंदच होते ( Umman Manda ) असें His Hist. of the World कार म्हणतो.

### देव व मानव.

जंबूद्वीपाच्या मधोमध असणाऱ्या मेरूच्या आसपास राहणारे ते देव असून त्यांचे अनुचर ते मानव होत, व या मानवासच भारतवर्षांत वस्ती केल्यावर आर्य हें नांव मिळालें, असें राजवाडे यांचे मत आहे.

Medes ( मीढां ) मध्यें शितिपर्ण व एपर्ण अशीं नांवें होतीं! वरील एकंदर वर्णनावरून समारोप करितेवेळीं रा. राजवाडे म्हणतात कीं:—भारतांतून व पुराणांतून नमूद केलेले वृत्तांत बऱ्याच अंशानें विश्वसनीय आहेत, हा विश्वसनीय वृत्तांत कांहीं अविश्वसनीय वार्तांनीं संकलित झालेला आहे. + + + पुराणांतील पर्वतांच्या लांबीरुंदी वगैरे अयथार्थ आहेत असें मानावें लागतें. सारांश, पुराणें व इतिहास यांतील मजकूर पारखून घेतला पाहिजे व तो तसा घेतां येण्यासारखा आहे.

भारतवर्षांतील नऊ भागांपैकीं इंद्रद्वीप हा एक भाग आहे; यावरूनच अपभ्रंशपरंपरेनें इंद्रद्वीप—इंददीअ—इंदिय=India ( इंदिया ) हें नांव सर्वच भारत वर्षास पडलें असावें असें राजवाडे मानतात. भारत वर्षाचा पश्चिमोत्तर भागच इंद्रद्वीप असून त्यांतच पुढें इंद्रप्रस्थ ( शक्रप्रस्थ ) नगर वसविण्यांत आलें असें त्यांचें मत आहे. ( वारणावत कदाचित् वारुण-भागांतील असेल ).

## मेरुपर्वत कोठें आहे?

उत्तरध्रुवाजवळचा तो महामेरु ऊर्फ उत्तरमेरु; पण हिंदुस्थानच्या बाहेर जवळच हिमवान्, हेमकूट व निषध या पर्वतांच्या उत्तरेस शोभणारा–जंबूद्वीपाच्या मध्यवर्ती असा हा सुमेरु कोणता ? व कोठें असावा ? याचा कोठें पत्ता लागतो काय ? हा पर्वत बामियन्, काबूल व गिझनी यांच्या उत्तरेस असावा असें क. टॅडचें मत आहे; परंतु ग्रीक लोकांच्या लेखांप्रमाणें हा मेरुपर्वत जरा पूर्वेकडेस असावा. 'एशियाटिक रिसर्चेस' ( पुस्तक ६, पृ. ४९७ ) मध्यें लिहिलें आहे कीं, पेशावर व जिलालाबाद याच्या मध्यें २००० फूट उंचीची 'मेरुकोह' नांवाची एक टेंकडी असून, तिच्या पश्चिमेस कांहीं गुहा आहेत; पर्शनमध्यें 'कोह' याचा अर्थ टेंकडी होतो. यावरून 'मेरुकोह' म्हणजे मेरुपर्वतच होय! हुमा-

यूलनें या टेकडीला तिच्या भयाण व निर्जन देखाव्यावरून ' बि-दौलत् ' असें नांव ठेविलें ! यावरून मेरुपर्वत हिंदुस्थानच्या बाहेर गांधार देशाचे उत्तरेला हिंदुकुशच्या वर होता हे कळून येईल.†

* क. विलफर्ड यांचीं कित्येक भौगोलिक मतें !

" पुराणांतील ' रम्यक ' किंवा ' रमणक ' वर्ष हे ' रोमक ' ऊर्फ इटालीचें नांव असावें. ' क्रौंचद्वीप ' म्हणजे बाल्टिकजवळील प्रदेश असून, स्कंदानें ज्या क्रौचद्वीपाजवळ वस्ती केली तो प्रदेश ' स्कंद-नाभि ' ऊर्फ ' स्कंदिनेव्हिया ' या नांवानें प्रसिद्ध आहे. केतुमाल म्हणजे यूरोप, आफ्रिकेचा उत्तर किनारा, व आशिया मैनर हे प्रदेश होत. पुष्करद्वीप म्हणजे आइसलंड होय. +श्वेतद्वीप हें इंग्लंड असून ' जर्मन ओशन ' लाच क्षीरसमुद्र असें नांव असावें. क्षीर याचें Kheri खीरिया रूप होतें. श्वेतद्वीपाभोवतीच्या अमृतोदधीला ' अमलकीयनसी ' म्हटलें आहे.

---

† या मध्य आशियांतील मेरुपर्वताजवळच सीता, चक्षु, आलकनंदा व भद्रा या नद्या उगवतात असें ब्रह्मपुराणाच्या १८ व्या अध्यायांत म्हटलें आहे. भद्रा पूर्वेस भद्राश्व प्रदेशांतून ( चीन मधून ) वाहते व पूर्वसमुद्रास मिळते असें म्हटलें आहे. हीच होहांगहो असावी. अलकनंदा दक्षिणेस भारत वर्षांतून वाहते व दक्षिणसमुद्रास मिळते, असें म्हटलें आहे. चक्षु केतुमालांतून पश्चिमेकडे वाहत जाऊन समुद्रास मिळते असें म्हटलं आहे; हीच oxus नदी असावी. सीता ( सीता ) ही उत्तरेस उत्तरकुरुंमधून वाहात जाऊन उत्तर अंबोनिधीस मिळते म्हणून म्हटलें आहे. ही सैबरियांतून वाहत जाऊन उत्तर समुद्रास जाऊन मिळणारी एकादी नदी असावी.

* हीं मतें ' आशियाटिक रिसर्चेस ' मध्यें प्रसिद्ध झालीं आहेत; अकरावे खंड पहा.

+पुष्करद्वीपाचें वर्णनास, तो उत्तर ध्रुवाजवळ होता व तेथें सहा महिन्यांची रात्र व सहा महिन्यांचा दिवस होता असें वर्णन असल्यामुळें हेंच अधिक जुळतें.

क्रीटबेट व त्या भोंवतालचा भूमध्यसमुद्र यास घृतद्वीप व घृतसमुद्र घृत=ग्रीट=Grita=Crete अशीं रूपांतरें झालीं. Sasons हे शकसूनु असून हे शाकद्वीपांतून पश्चिमेकडे गेले; शाकद्वीपीय लोकांनीं युरोपखंडांत वस्ती केली !

'इक्षुसमुद्र' म्हणजे Euxine Sea ऊर्फ Black Sea होय. शाकलोक मोठे प्रबळ असून मूळचे चक्षुनदीच्या कांठचे राहणारे होते. चक्षु म्हणजे Oxus होय."+

प्राचीन ग्रीक लेखक Imaus Homodi व *Paropamison असे पर्वत हिंदुस्थानच्या जवळ सांगतात. हे पुराणांतील हिमवत्, हेमकूट व निषेध हे होत. यांशिवाय, त्यांनीं Merus ( the abode of the gods ) नांवाचा पर्वत सांगितलेला आहे.

शाकद्वीपाबद्दल रा. राजवाड्यांप्रमाणेंच प्राचीन पाश्चात्य लेखकांचें मत आहेः—" Scy thin was a name applied to an immense area in the north of Europe anb Asia, the limits. of which have been variously given by ancient geographers "

Ancient. Geog. by Bryce P. 138.

## पर्शूंच्या ग्रंथांतील प्रमाण.

वेंदिदाद् नामक पारशी ग्रंथाच्या पहिल्या फर्गर्डमध्यें कांहीं भौगोलिक माहिती आहे. मला झेंड ( छंदस् ) भाषा येत नसल्यामुळें प्रो. स्पीजल व प्रो. हौ यांच्या भाषांतरावरून ही माहिती घेतलेली आहेः—

---

+ सारांश, भूगोलाचें हें प्रकरण येथेंच पुरें करितों; पुराणातून पुष्कळ भूगोल आहे, इतिहास व कालगणनाही आहे.

* हें 'परोपनिषन' म्हणजे पहारो-टेंकडी, निषन=निषध आहे असे कित्येक मानतात. याचा समोंवतालचा प्रदेशच 'नैषध' देश होय. ग्रीकांनीं 'निसा' किंवा 'निषध' शहर ह्याच पर्वताच्या पायथ्याशीं वर्णिलेलें आहे.

" अहुरमझ्द पवित्र झरतुष्ट्रास म्हणाला कीं, पूर्वी राहण्यास योग्य नसलेले प्रदेश मीं हल्लीं वास्य केलेले आहेत. मीं हें केलें नसतें तर सर्व जीवंत प्राणी आर्यणवीजोला परत गेले असते.

" मीं अहुरमझ्द प्रथम सर्वोत्कृष्ट असा आर्यणवीजो प्रदेश उत्पन्न केला. नतर अंग्रमन्युस् ह्या संहारकार्नें त्याविरुद्ध एक मोठा अहि उत्पन्न केला व देवाची कृति असा हिम ( बर्फ ) उत्पन्न केला. तेथें हिंवाळ्याचे दहा महिने असून, उन्हाळ्याचे दोनच महिने आहेत.

" मीं नतर दुसरें उत्कृष्ट स्थान Gau गाऊ निर्माण केलें, व त्यातच Sughdha सुघ्ड आहे.

" मीं नतर तिसरें उत्तम स्थान पवित्र मोठें Mouru मौरु उत्पन्न केलें.

" नतर मीं चौथें उत्तम स्थान वैभवयुक्त Bakhdhi बख्दी उत्पन्न केलें.

" नतर पाचवें उत्तमस्थान Nisai निषाई उत्पन्न केलें, ( हें मौरु व बखूधी याच्या मध्यें आहे. )

" नतर मीं साहावें उत्तम स्थान Haroyu हरोयु उत्पन्न केलें, त्यात पुष्कळ पाणी आहे

" नतर मीं सातवें उत्तम स्थान Vaekereta उत्पन्न केलें, तेथेंच Dujak आहे.

" नतर मीं आठवें उत्तम स्थान गवताळ प्रदेशाचें Urva नावाचें उत्पन्न केलें

" नतर नववें उत्तम स्थान Khmenta ख्मेन्टा उत्पन्न केलें त्यातच Vehrkana आहे.

" नतर दहावें उत्तम स्थान वैभवयुक्त Haraqaite उत्पन्न केलें

" नतर अकरावें उत्तम स्थान Haetumat उत्पन्न केलें, तें प्रकाशमान व संपत्तिमान आहे

"नंतर बारावें उत्तम स्थान, तीन कोट(जाती) असलेलें Ragha उत्पन्न केले. नंतर तेरावें उत्तम स्थान मजबूत Chakhara उत्पन्न केलें. नंतर चौदावें उत्तमस्थान चार कोंपऱ्यांचें Varena उत्पन्न केलें; तेथें Thraetaono थेटाओनो उत्पन्न झाला; त्यानें Dahaka दहाक सर्प मारिला.'

"नंतर पंधरावें उत्तम स्थान हसहिंदHapta Hendnउत्पन्न केलें.इ.इ."

यांतील स्थानांविषयीं पाश्चात्त्यांचीं मतें अशीं आहेत.

१ आर्यणवीजो–Distant North, beyond Jaxartes (प्रो. हौ) तेथें हिंवाळा दहा महिने राहतो असें म्हटलें आहे. यावरून रा. बळवंतराव टिळक यांनीं हा प्रदेश उत्तरध्रुवाकडेच असावा, असें म्हटलें आहे [ Arctic Home in the Vedas ]. 'आर्यानां वीजो' हें मूळ रूप असावें; याचा अर्थ आर्यावर्त.

२ = Sogdiana ( सोगडियाना )

३ = Merv=मरुस्थली=हाच पुराणांतील मध्य 'मेरु' असावा.

४ = बाल्ख=बाल्हीक.

५ = निषा=ग्रीकांची Nissce= हेंच पुराणांतील निषध होय.

६ = हिरात असावें असें पाश्चात्त्यांचें मत आहे. पण मला वाटतें कीं, ही हरोयु म्हणजे सरयू नदी असावी; व तींत पुष्कळ पाणी आहे; ऋग्वेदांतील नदीसूक्तात क्रमु ( कोरम ) व कुभा ( काबूल ) या नद्यांबरोबर एक 'सरयू' येते; तीच या हिरात प्रांतांतील हरोयू ( र ) असावी.

ऋग्वेद १०–६४–९ मध्यें सरस्वती व सिंधूबरोबर २१ नद्यांपैकीं म्हणून सरयू नदी आलेली आहे; ही अफगाणिस्थानांतीलच नदी असावी. १०–६४—८ मध्यें 'त्रिसप्त' २१ नद्यांचा उल्लेख आहे.

७ = काबूल ( प्रो. स्पीजल ); सीजस्थान ( इतरांच्या मतें ).

८ = काबूल ( प्रो. हौ व लॅसेन ).

९ = Gurgan ( स्पीजल ), कंदहार ( हौ ). प्रो. स्पीजलच्या मतें Vehrkhana हें प्राचीन Hyrcania असावें.

१० = Archosia असें पाश्चात्यांचें मत आहे, पण मला वाटतें कीं हरक्वती हें 'सरस्वती' याचें अपभ्रष्ट रूप आहे. ऋग्वेद १०—६४–९ सिंधु व सरयू यांबरोबर सरस्वती नदीचाही उल्लेख आहे. सरयू व सरस्वती नद्या सिंधूनदीच्या पश्चिमेकडील दिसतात.

११ = Valley of the Hilmend river हेतुमत् याचें संस्कृत रूप सेतुमत् असें होतें.

१२ = Rei in Media असें पाश्चात्य मत आहे, पण ही रघा वेदांतील 'रसा' नदी असावी नदीसूक्तांत रसा आलेली आहे, ती २१ नद्यांपैकीं एक आहे.

१३ -१४ याबद्दल निश्चय नाहीं.

१५ = हप्तहिंदु = सप्तसिंधु प्रदेश सात नद्यांचा पंजाब प्रदेश

या पार्शी प्राचीन ग्रंथाच्या उताऱ्यांत, उत्तरध्रुवापासून ते पंजाब व आफगाणिस्तानच्या अनेक स्थानापर्यंतच्या अनेक स्थळांचा उल्लेख आहे यांत सिंधु, सरस्वती, सरयू, निषध, रसा इत्यादिकांचा उल्लेख मिळतो. ( मूरचा, संस्कृत टेक्स्ट्स् ग्रंथ, व्हा. २, पृ ३३० ३३२ ).

शेवटीं हें प्रकरण कॅर्नेल टॉड याच्या खालील वाक्यानें संपवितों —

Much would reward him who would make a better digest of the historical and geographical matter in the puranas But we must discard the idea that the history of राम ( रामचरित ), the महाभारत of कृष्ण and the five पांडव brothers are mere allegory an idea supported by some although their races cities &c still exist

पुराणांतील ऐतिहासिक व भौगोलिक भागाचें जर कोणी चांगलेंसें सार काढील तर त्यास चांगलेंच बक्षीस मिळेल, पण असें करण्यास रामायण, भारत व पुराणें हे ग्रंथ केवळ कविकल्पना आहेत हें मत सोडून दिलें पाहिजे ही कल्पना याउपर टिकणें शक्य नाहीं !!!



---

# प्रकरण ६ वें.



## पूर्वकल्पाचा इतिहास.

—:०:—

हल्लींचें कल्प इ. पू. ३१०२ सालीं सुरू झालें हें पूर्वी दाखविलेलें आहे. आता पूर्वकल्पाची कांहीं हकीकत मिळते कीं काय हें आपण पाहू. भागवतात सत्यव्रतराजा अतीतकल्पात होऊन गेल्याचा व तोच पुढें या कल्पात वैवस्वत मनु होऊन जन्मल्याचा उल्लेख आहे

योऽसौ सत्यव्रतो नाम राजर्षिर्द्रविडेश्वर ॥
ज्ञानं योऽतीतकल्पान्ते लेभे पुरुषसेवया ॥ ९-१-२.
स तु सत्यव्रतो राजा ज्ञानविज्ञानसंयुत ॥
विष्णो प्रसादात् कल्पेऽस्मिन् आसीद्वैवस्वतो मनु ॥

भागवत, ८-२४-५८.

पूर्वकल्पातील सत्यव्रत ऊर्फ मनु याच्या वेळींच प्रलय झाला असें म्हटलें आहे, व हाच सत्यव्रत हल्लींच्या कल्पात वैवस्वत मनु झाला

### दक्ष प्रजापतीचा काळ

दक्षाबद्दल ब्रह्मपुराण लिहितें कीं,—

युगे युगे भवन्त्येते पुनर्दक्षादयोऽनृपा ।
पुनश्चैव निरुध्यन्ते विद्वांस्तत्र न मुह्यति ॥२॥
ज्यैष्ठ्यं कानिष्ठ्यमेतेषां पूर्वं नास्ति द्विजोत्तम ।

इमा विसृष्टिं दक्षस्य यो विद्यात्सचराचराम्॥ ३ ॥
प्रजानामायुषा पूर्णो ब्रह्मलोके महीयते ॥ ४ ॥

यावरून दक्ष ज्येष्ठ व कनिष्ठ असे निदान दोन तरी असल्याचें कळून येतें.

दक्ष, कर्दम, वीरण, कश्यप वगैरे पूर्वकल्पातील प्रजापति होते असें दिसतें. हे पूर्वकल्पातील होते, यास प्रमाणः—

दानाच्छुणुध्वं विप्रेंद्रा' कश्यपस्य प्रजापतेः ॥
अदितिर्दितिर्दनुश्चैव अरिष्टासुरसाखसाः ।
सुरभिर्विनता चैव ताम्रा क्रोशवशा इरा ॥
कद्रुर्मनुश्च भो विप्रास्तास्वपत्यानि बोधत ॥
\+ \+ \+ \+
पूर्वमन्वतरे श्रेष्ठा द्वादशासन्सुरोत्तमा' ॥
एवमुक्त्वा च ते सर्वे चाक्षुष्यस्यांतरे मनोः ॥
मारीचात्कश्यपाज्जातास्त्वदित्या भूरितेजस ॥

ब्रह्मपुराण—अ. १

यावरून दक्ष, कर्दम, कश्यप वगैरे प्रजापति ( मध्य आशियात ) पूर्वकल्पातील चाक्षुप मन्वंतरामध्यें किंवा त्या सुमारास होऊन गेले, असें कळतें. कश्यप प्रजापति हा पूर्वकल्पाच्या चाक्षुप मन्वतराच्या प्रारंभीं होता, त्यानें दक्ष प्रजापतीच्या १३ मुलींशीं लग्न केलें. यावरून दक्ष प्रजापति जरा चाक्षुप मन्वतराहून ५०—६० वर्षांनीं प्राचीनतर दिसतो. हल्लींच्या पुराणकर्त्यांस ह्या व्यक्ति देवतास्वरूप होऊन गेल्या होत्या —

चाक्षुपस्यांतरे पूर्वे आसस्ते तुषिता सुराः ।
एव देवनिकायास्ते संभवंति युगे युगे ॥

याप्रमाणें पूर्वकल्पांतील चाक्षुष मन्वंतरांतील प्रजापतींना येथें देवनिकाय म्हटलें आहे. पृथु वैन्यापूर्वी राजसंस्था आर्यांत नव्हती; तेव्हां प्रजापतिपद्धति होती ( Patriarchs ); यांस वेदांत विश्पति म्हटलेलें आहे. वेदांतील विश्पतींवर राजन्य असत. गृहपतींवर कुलपति, त्यांवर विश्पति, त्यांवर एकादा राजन्य—अशी परंपरा वैदिक काळीं असे.

दक्ष प्रजापति व त्याचा जामाता कश्यप प्रजापति हे पूर्वकल्पांतील चाक्षुष मन्वंतरारंभीं होऊन गेले, हें शिवपुराणांत स्पष्टपणें सांगितलेलें आहे:—

> सामुद्री सुषुवे पुत्रान्दश प्राचीनबर्हिषः ।
> सर्वे प्राचेतसा नाम धनुर्वेदस्य पारगाः ॥ ५६ ॥
> एषां, स्वायंभुवे, दक्षः पुत्रत्वमगमत्पुरा ।
> त्र्यंबकस्य शापेन चाक्षुषस्यांतरे पुनः ॥ ५७ ॥
>
> वायवीय संहिता, अ० १५.

मागील संदर्भावरून याचा अर्थ—( पूर्व कल्पाच्या चाक्षुष मन्वंतरांतील दक्ष प्रजापति शंकराच्या शापानें हल्लींच्या कल्पांतील स्वायंभुव मन्वंतरांत दहा प्राचेत्याचा पुत्र होऊन जन्मला !

पूर्व कल्पांतील दक्ष ज्येष्ठ असून हल्लींच्या कल्पांतील कनिष्ठ होय. पौराणिक कालगणनापद्धतीप्रमाणें चाक्षुष मन्वंतराचा काळ काढूं. हल्लींचा कल्प इ० पू० ३१०२ सालीं सुरू झाला. चौदा मन्वंतरांचा एक कल्प-चौदा मन्वंतरांचीं क्रमानें नावें पूर्वी दिलेलींच आहेत. स्वायंभुव, स्वारोचिष, औत्तमि, तामस, रैवत, चाक्षुष, वैवस्वत, या सात मन्वंतरांनंतर आणखी सात मन्वंतरें आहेत; याप्रकारें पहातां हल्लींच्या कल्पापूर्वीचें नववें तें चाक्षुष मन्वंतर होय. एक मन्वंतर=२८८ वर्षे. यावरून चाक्षुष मन्वतर ( कल्पापूर्वी ) २८८ × ९ = २५९२ वर्षांनीं सुरू झालें हे कळतें; व तें २८८ वर्षे होतें; म्हणजे पूर्वकल्पांतील चाक्षुष मन्वंतर इ.पू.

( २५९१ + ३१०२ = ) ५६९४ ते ५७०६ पर्यंत होते. कश्यप प्रजापति व त्याचा सासरा दक्ष प्रजापति इ. पू. ५६९४ च्या सुमारास झाले !

दक्ष प्रजापतीचा हा काळ ग्रीक ग्रंथांवरूनही खरा ठरतो. मेगॅस्थीनीस हा ग्रीक वकील चंद्रगुप्ताच्या दरबारीं होता; यानें हिंदुस्थानावर एक ग्रंथ लिहून ठेविला होता; तो लुप्त होऊन त्यांतील त्रोटक उतारे इतर ग्रीक लेखकांनीं घेतलेले आढळतात. ऐरियन ( इ. पू. १४६ ) मध्यें असा उतारा येतो:—

"From the time of Dionysus to Sandracottus, the Indians counted 153 Kings and a period of 6042 years; but among these a republic was thrice established, and another to 300 years and another to 120 years."

प्लिनि ( इ. स ४१ ) लिहितो कीं:—

"From the days of father Bacchus to Alexander the Great, their Kings are reckoned at 154, whose reigns extend over 6451 years and 3 months" *

सोलिनस ( इ. स. १२८ ) लिहितो कीं:—

"Father Bacchus was the first who invaded India and was the first of all who triumphed over the vanquished Indians. From him to Alexander the Great, 6451 years are reckoned with 3 months additional, the calculations being made by counting the Kings who reigned in the intermediate period to the number of 153." *

ही इ. पू. ३०० च्या सुमारची माहिती आहे, याचेळीं युगांची मोठी कल्पना बिलकुल आढळत नाहीं. मॅगेस्थीनीसच्या मतें, भारतीयांची

* Mc. Crindle's Ancient India, p p. 115 & 203-204.

* Mc. Crindle's Ancient India, P 115.

कालगणना बॅकसपासून अलेक्झांडर-( च्या अंता ) पर्यंत ६४५१ वर्षे होतीं-व त्या अवकाशात राजे १५३-५४ होऊन गेले. स्वायंभुव मनूच्या पूर्वी राजसंस्था मुळीं नव्हतीच. तेव्हां प्रजापतिसंस्था होती. वरील लेखकांपैकीं पहिल्या लेखकानें दायानिसॉसपासून चंद्रगुप्तापर्यंत एकंदर ६०४२+ ३०० + १२०=६४६२ वर्षे दिलीं आहेत. म्हणजे दायानिसॉस ऊर्फ बॅकस ते अलेक्झांडर-(च्या अंता) पर्यंत ६४५१ वर्षे कालगणनेचीं झालीं. चंद्रगुप्ताचा काळ इ. पू. ३१२ व अलेक्झांडरचा अंत इ. पू. ३२३- यांत ११ च वर्षांचे अंतर आहे. तेव्हा जी एक कालगणना इ. पू. ३२३ सालीं ६४५१ वर्षांची झाली होती, ती चंद्रगुप्ताच्या वेळीं इ. पू. ३१२ सालीं ६४६२ वर्षांची झाली होती. म्हणजे या कालगणनेचा प्रारंभ ६४६२ + ३१२ = ६७७४ इ. पू. या वर्षी झालेला असावा. हा काळ बॅक्स ऊर्फ डायॉनिसॉस याचा म्हणून ग्रीकांनीं सांगितलेला आहे.

आता आपण ग्रीकाचे आंकडे ६४५१ व ६४६२ असेच होते कीं काय, हें आपण खात्रीलायकपणें पाहूं. याविषयीं एशियाटिक जर्नेलमध्यें अशी एक शंका घेतलेली आहे:—

" The loss of Megasthenes ' works is much to be lamented. From the few scattered fragments preserved by the ancients, we learn, that the history of Hindus did not go back above *five thousand and forty-two* years The Mss. differ; in some we read six thousand and forty two years; *in others, five thousand and forty-two years* and three months to the invasion of Alexander. Megasthenes has certainly made very particular inquiries, since he noticed even the months Which is the true reading, I cannot pretend to determine however, I incline to believe it is *five thousand and forty-two* because it agrees best with the number of years assigned by Albumazaar, as

cited by Mr. Bailly from the creation to the flood. This famous astronomer derived his ideas about the time of the Creation and of the Flood, from the learned Hindus he had consulted, and he assigns 2226 two thousand two hundred and twenty six years between *what the Hindus call the last renovation of the world and the flood.*" *

या उताऱ्यावरून ग्रीकांचे आंकडे ५४५१ व ५४६२ असेही असल्याचें कळतें; शिवाय, इ. पू. नवव्या शतकांतील अरबी लेखकाच्या म्हणण्याप्रमाणें, हिंदुलोक हल्लींच्या कल्पापासून ( Renovation of the world ) प्रलयापर्यंत ( flood ) २२२६ वर्षे गेलीं असें मानीत असल्याचेंही कळतें. हल्लींचा कल्पारंभ इ. पू. ३१०२ वर्षी मनूच्या वेळीं झाला; यापूर्वी २२२६ वर्षे म्हणजे इ. पू. ५३२८ वर्षे प्रलय झाला, असें अल्बुमझरच्या मतें भारतीय प्रमाणांवरूनच ठरतें. प्रलयाचा हा काळ ( इ. पू. ५३२८ ) आमच्या पुराणांतील प्रमाणांशीं जुळतो कीं नाहीं हें आपण पाहूं. मत्स्यपुराणाच्या आरंभीं चाक्षुप मन्वंतराचा क्षय झाल्यानंतर ( म्हणजे चाक्षुप मन्वंतर संपल्यानंतर ) मनूच्या वेळीं प्रलय झाल्याचा उल्लेख आहेः—

त्वया सार्धमिदं विश्वं स्थास्यत्यंतरसंक्षये ।
एवमेकार्णवे जाते चाक्षुपांतरसंक्षये ॥ २– १४ ॥

यावरून पूर्वकल्पाचें चाक्षुप मन्वंतर संपल्यानंतर लौकरच मनूच्या वेळीं प्रलय झाला हें कळून येतें. मागें चाक्षुप मन्वंतराचा काळ इ. पू. ५६९४ ते ५४०८ होता हें दाखविलें आहे. चाक्षुपापुढील मन्वंतर वैवस्वतच होय; हें इ. पू. ५४०६ ते ५११८ पर्यंत होतें. तेव्हां अल्बुमझरच्या मतें जो प्रलयाचा काळ इ. पू.५३२८ येतो, तो या वैवस्वत मन्वं-

* Selections from the Asiatic Journal Vol I, P. 294

तरांतच येतो.' सारांश, चाक्षुप मन्वंतरानंतर लौकरच मनूच्या काळीं प्रळय झाला. हाच भागवतांतील पूर्वकल्पांतील सत्यव्रत होय.

आतां ग्रीकांचे ५४५१ व ५४६२ हे आंकडे कोणाच्या वेळेपासूनचे असावेत हें आपण पाहूं. बॅकसपासून चंद्रगुप्तापर्यंत ५४६२ वर्षे झालीं; म्हणजे हा काळ ( ५४६२ + ३१२ = ) ५७७४ इ. पू. या वर्षी सुरू झाला असावा. चाक्षुप मन्वंतराच्या प्रारंभीं ( इ. पू. ५६९४ ) कश्यप प्रजापति ( दक्षाचे जामाता ) होते. तेव्हां दक्ष म्हातारे असावेत; यावरून इ. पू. ५७७४ हा ग्रीकांनीं दिलेला काळ या दक्षाच्या जन्माचाच असावा. Daksha = Daccus = Bacchus असे अपभ्रंश झाले असावेत. दक्ष चाक्षुप मन्वंतराच्या प्रारंभीं म्हातारा असावा हें मागें पाहिलेंच आहे. तेव्हां त्याचें वय ७५–८० वर्षांचें असावें !

ग्रीकांच्या इ. पू. ५७७४ यांतून चाक्षुप मन्वंतर प्रारंभाचा इ. पू. ५६९४ हा काळ वजा करितां दक्षाचें वय बरोबर ८० वर्षे निघतें. तेव्हां ग्रीकांनीं दिलेली कालगणना दक्षाच्या जन्मापासून असावी असें वाटतें.

कोणी हा Bacchus or Dionysus म्हणजे वैवस्वत मनु किंवा त्याचा पुत्र इक्ष्वाकु समजतात; पण कालगणनादृष्ट्या पाहतां तो पूर्वकल्पांतील ज्येष्ठ दक्षच असावा. ग्रीकांच्या निदर्शनास स्वायंभुव मनूपासून व त्या तऱ्हा असणें साहजिकच आहे; कारण पृथुवैन्यानंतरच्या स्वायंभुव मनूपासूनच पुराणांतून राजाच्या पिढ्या आढळतात. त्यांचा तपशीलः–

| | |
|---|---|
| ( १ ) स्वायंभुव मनूपासून वैवस्वत मनूपर्यंत ... ... ... | १९ |
| ( २ ) इक्ष्वाकूपासून रामचंद्रापर्यंत ... ... ... | ६२–६४ |
| ( ३ ) लव-कुशांपासून सुमित्रापर्यंत ( सुमित्रास महापद्मानें मारिलें ) | ६२ |
| ( ४ ) नंतरचे नंद ... ... ... ... ... | ९ |
| | १५३–१५४ |

ः यामप्रमाणें स्वायंभुवमनूपासून चंद्रगुप्तापर्यंत १५३–१५४ पिढ्या दिलेल्या मॅगस्थीनसच्या बरोबर आहेत; राजसंस्था पृथु-वैन्यापासून सुरू झाल्यामुळें त्यानंतर स्वायंभुव मनूपासून राजांची गणना पौराणिकांनीं केली असावी. पिढ्यांचा हिशेब जमतो पण कालगणनेचा कांहींच पत्ता लावतां येत नाहीं, असें फर्ग्युसनसाहेब म्हणतातः—

The second part of the statement giving the kings' reigns an average duration of nearly 40 years, must of course be rejected. " या कालगणनेचा व्हावा तसा उपयोग यापूर्वी झाला नाहीं; कारण, पिढ्यांचा प्रारंभ स्वायंभुव मनूपासून झालेला आहे; व कालगणनेचा उगम पूर्वकल्पांतील दक्ष प्रजापतीपासून झालेला आहे. दोन्हींचा प्रारंभ एकाच वेळेला झालेला नाहीं.

*ग्रीक लोकांनीं पूर्वदक्ष, स्वायंभुव मनु व वैवस्वत मनु यांचा फार घोंटाळा* केलेला आहे. त्यांस पूर्वदक्ष माहीत होता कीं नाहीं हें आपण पाहूं. Dionysus Bacchus विषयीं ग्रीक काय काय लिहितात, हें आपण पाहूंः—

" But when he ( Dionyssos ) was leaving India, he appointed, it is said, Spatembus ( स्वयंभू मनु ? ), one of his companions. When Spatembus died, his son Boudhyas ( बुध ) succeeded to his sovereignty " *Ancient India*, P. 200.

दुसऱ्या एका स्थळीं डायानीसॉस ह्या नांवाच्या तीन व्यक्तींचा उल्लेख आहेः—

" Now, some, supposing that there were *three* individuals of this name, who lived in *different* ages, assign to each appropriate achievement. They say, then, that the most ancient of them was called *Indos*. ( *Ibid*, p. 36 )

* His. of Ind Architecture.

- दुसऱ्या एका स्थळीं स्पर्टेंस् व त्याचा मुलगा, बौथ्यस् हे भारतीयांवर ५२ व २० वर्षे राज्य करीत असल्याबद्दल उल्लेख आहे. The son of the latter was Kradeus (श्राद्धदेव ?) Ibid P. 201. सारांश, ग्रीकांनीं तीन भिन्न भिन्न वेळच्या व्यक्तींचा घोंटाळा केलेला आहे. ( १ ) दक्ष ( डॅकस् ) ऊर्फ दाक्षायण्य ( डायॉनिसॅस ); ( २ ) स्वायंभुव मनु (३) कनिष्ठदक्ष ( वैवस्वतमनु ऊर्फ श्राद्धदेव याचा आजा ) या तिघींचा ग्रीकांनीं घोंटाळा केलेला आहे. आपल्या पुराणांतून तरी, पूर्वकल्पांतील चाक्षुष मन्वंतराच्या सुमारास असलेला दक्षच हल्लींच्या कल्पांत ( वैवस्वत मनूचा आजा ) प्रचेत्यांचा पुत्र होऊन जन्मला, अशी परंपरा आढळते; तसेंच, चाक्षुष मन्वंतरांतील ( पूर्वकल्पांतील ) सत्यव्रत मनूच या कल्पांत वैवस्वत मनु झाला, अशीही परंपरा आढळते.

या एकंदर विवेचनांवरून एवढें ठरतें, कीं ग्रीकांनीं कालगणना ज्येष्ठदक्षापासून दिली व पिढ्या स्वायंभुवमनूपासून दिल्या.

या सर्व विवेचनावरून निघणारे काळ:—

| इ० पू० | |
|---|---|
| ५७७४ | दक्ष प्रजापतीचा काळ; हा चाक्षुष मन्वंतराच्या प्रारंभीं ८० वर्षांचा असावा. |
| ५६९४–५४०६ | पूर्वकल्पांतील चाक्षुष मन्वंतराचा काळ. यांत कश्यप प्रजापति वगैरे प्रजापति येते. |
| ५४०६ते५११८ | चाक्षुष मन्वंतरानंतरच्या वैवस्वत मन्वंतराचा काळ. चाक्षुष मन्वंतर संपल्यानंतर सत्यव्रत मनूच्या वेळीं प्रळय घडून आला. तो अल्बुमसारच्या भारतीय प्रमाणाप्रमाणें इ. पू. ५३२८ वर्षीं येतो. |
| ५३२८ | सत्यव्रत मनूच्या वेळीं चाक्षुष मन्वंतर संपल्यानंतर झालेल्या प्रळयाचा काळ. अल्बुमसार हा २२२६ वर्षे |

प्रळयापासून कल्पारंभापर्यंत झालीं होतीं असें म्हणतो. ही माहिती त्यानें इ. स. ९ व्या शतकांत भारतीय ग्रंथांवरूनच दिलेली आहे.

| | |
|---|---|
| ३१०२ | स्वायंभुव मनूचा काळ ( ग्रीकांच्या पिढ्या यापासूनच आहेत ). |
| सुमारें २६०० | वैवस्वत मनूचा व इक्ष्वाकूचा काळ. स्वायंभुव मनूपासून याच्या वेळेपर्यंत १९ पिढ्या झाल्या होत्या. |
| ३२३ | अलेक्झांडरचें मरण. यावेळीं दक्षाच्या जन्मापासून ५४५१ वर्षे झालीं होतीं, असें ग्रीक लेखांवरून कळतें. |
| ३१२ | चंद्रगुप्ताचा राज्याभिषेक—यावेळीं दक्षापासून ५४६२ वर्षे झालीं होतीं. |

चंद्रगुप्ताच्या वेळीं जो काळ ५४६२ वर्षांचा होता तोच मौर्यवंशांतील शालिशूकाच्या वेळीं ५५५५ वर्षांचा असावा. मौर्यकुलांतील राजे विष्णुपुराण मतें चंद्रगुप्त–बिंदुसार–अशोक–सुयशा–दशरथ–शालिशूक असे आहेत. अशोकाचा नातु संप्रति हा चंद्रगुप्तानंतर ९० वर्षांनीं राज्यारूढ झाला असें जैन इतिहासावरून कळतें. त्यानंतर शालिशूक आला. विष्णुपुराणांतील दशरथ हा संप्रतीचा बंधु अगर दशरथच असावा. सारांश शालिशूक इ. पू. सुमारें ३१२ – ९० = २२२ नंतर कांहीं वर्षांनीं राज्यावर आला असावा. संप्रतीचें राज्य किती वर्षे झालें हें कळत नाहीं. संप्रतीच्या वेळीं दक्षकाळ ( ५४६२ + ९० =) ५५५२ वर्षांचा झाला होता. पुढें ३।४ वर्षे संप्रति झाल्यानंतर इ. पू. ५५५५ व्या सुमारास शालिशूक राज्यारूढ झाला असावा. हीच गोष्ट वृद्धगर्गाच्या बृहद्गार्गीय संहितेच्या युगपुराणांत सांगितली आहे. ( डेकन कॉलेज प्रत, नंबर ३४५ साल १८७९–८० )

तेऽथ पुष्पपुरं राज्यं नगरं पाटलीसुतम् ।
पंचवर्षसहस्राणि स्थास्यते नात्र संशयः ॥
वर्षाणां च शताः पंच पंच संवत्सरास्तथा । *
मासाः पंच अहोरात्रा मुहूर्ताः पंच एव च॥
तस्मिन्पुष्पपुरे रम्ये जनराजशताकुले ।
ऋतक्षः कर्दमसुतः शालिशूको भविष्यति ॥
स राजा कर्दमसुतो दुष्टात्मा प्रियविग्रहः ।
स्वराष्ट्रमर्दने घोरो धर्मवादी त्वधार्मिकः ॥
स ज्येष्ठं भ्रातरं साधुकेतेति प्रथितं गुणैः ।
स्थापयिष्यति मोहात्मा विजयं नाम धार्मिकम् ॥
ततः साकेतमाक्रम्य पांचालान्मान्थुरांस्तथा ।
यवना युद्धविक्रांताः प्राप्स्यंति कुसुमध्वजम् ॥
ततः पुष्पपुरे प्राप्ते कर्दमे प्रथिते हिते ।
आकुला विषयाः सर्वे भविष्यंति न संशयः ॥

यावरून ५५५० किंवा ५५०५ वर्षी शालिशूक राज्यावर बसला, त्याचा विजय नामक बंधु होता त्याची स्थापना त्यानें साधुकेत नगर साकेत यावर केली; हा अधार्मिक होता; व त्याचे काळीं यवनांनीं साकेत, पांचाल, माथुर इत्यादि प्रदेश घेऊन-कुसुमध्वज गांठलें होतें, हें कळून येतें.

वरील ५५०५ किंवा ५५५० या आंकड्यांत सर्वच पांच असतांना दहं स्थानीं किंवा एकं स्थानींच तेवढे पाच नाहींत; यावरून लेखकाचे मनांत ५५५५ वर्षे, ५ महिने, ५ अहोरात्र (दिवस), ५ मुहूर्त

---

* पंचवद्गुणशतास्तथा ।

गेल्यावर शालिशूक राज्यावर बसला असें म्हणावयाचें. होतें असें वाटतें; व याप्रमाणें शुद्ध पाठभेद एखाद्या प्रतींत आढळत असावा. याप्रमाणें इ. पू. ३१२ ( चंद्रगुप्ताभिषेक ) या वेळीं जो दक्षकाळ ५४६२ वर्षांचा होता तो शालिशूकाचे काळीं ९० वर्षांनंतर काहीं काळानें ( ५५०५ किंवा ) ५५५० वर्षे—अगर बरोबर ५५५५ वर्षांचा होता. ५५५० वर्षे धरिलीं तर शालिशूकाचा काळ चंद्रगुप्तानंतर ८८ वर्षांनीं येतो. पण संप्रति अशोकाचा नातु ९० व्या वर्षीं राज्यारूढ झाल्यामुळें व त्यास २।३ वर्षे तरी राज्य देणें जरूर असल्यामुळें ५५५५ दक्षकाळ हाच शालिशूकाच्या अभिषेकाचा काळ धरावा लागतो, म्हणजे हा काळ इ. पू. २१९ हा येतो.

सारांश, पूर्वकल्पांत डोकावून पहातां इ. पू. ५३२८ च्या सुमारास प्रळय झाला, व त्याहून पूर्वी ४०० वर्षांच्या सुमारास दक्ष व कश्यप प्रजापति झाले ही हकीकत कळून आली ! पूर्वकल्पांतील चाक्षुष मन्वंतरा-पूर्वी अद्यापि अंधेर आहे, तथापि, मनूच्या प्रळयापूर्वीही दक्षादिप्रजापतींचें अस्तित्व असल्याची हकीकत कळून येऊन, त्यायोगें ग्रीकांनीं दिलेल्या इ. पू. च्या सुमारच्या भारतीय कालगणनेवर प्रकाश पडला. त्याच सुमारच्या शालिशूक राजाचा काळ दक्षापासूनच ५५५०—किंवा ५५५५ वर्षे असल्याचा युद्धगर्ग उल्लेख करितो, ही काहीं कमी महत्त्वाची गोष्ट नव्हे. सारांश, पूर्वकल्पांतील मुख्य मुख्य गोष्टी कळल्यासारख्या झाल्या ! वराहकल्पांतील हकीकती हल्लीं थोड्या थोड्या माहींत आहेत म्हणून ' श्वेतवराहकल्प ' असें चालू कल्पास म्हणत असावेत.

श्वेतकल्पाचा प्रारंभ अर्थातच इ. पू. ( ३१०२ + ४०३२ = ) ७१३४ या वर्षी सुरू झाला असावा. याही कल्पापूर्वी एकंदर किती कल्प होऊन गेले व तेव्हां काय काय गोष्टी घडून आल्या—याविषयीं बिलकुल माहिती—निदान सध्याच्या पुराणावरून तरी कळून येत नाहीं.

## उपसंहार.

—:०:—

कित्येक पुराणप्रिय वाचकास या पुस्तकातील युगप्रमाण पाहून जबरदस्त धक्का बसला असेल हें खरें आहे. तसेंच, कित्येकांस पुराणाची अवाढव्य युगें मावळून, उत्तम कालगणना पुराणातून निघाल्याचें पाहून आनंदही वाटला असेल.

मूळच्या युगमन्वंतरकल्पपद्धतींतील युग = १ वर्ष.

चार युगें / चतुर्युग } = ४ वर्षे, चौकडी.

७२ चतुर्युगें = १ मन्वंतर=२८८ वर्षे.

१४ मन्वंतरें = ४०३२ वर्षे = १ कल्प.

हेंच कोष्टक बरोबर असावें, याबद्दल एक मोठें प्रमाण असें आहे कीं, इ. पू. ३०० च्या वेळच्या ग्रीक वकील मेगॅस्थनीसच्या वेळीं १२००० वर्षांच्या चतुर्युगाची पद्धति नाहीं, फक्त दक्षापासून चंद्रगुप्तापर्यंत ५४६२ किंवा ६४६२ वर्षे झालीं होतीं ! यावरूनच तेव्हां अजून दहा

| | | |
|---|---|---|
| ४००० | कृतयुग | ( अगर बारा ) हजार वर्षांच्या चतुर्युगाची पद्धति निघाली नव्हती; संधि, संध्यांश |
| ३००० | त्रेतायुग | |
| २००० | द्वापरयुग | |
| १००० | कलियुग | |

मिळून ( ८०० + ६०० + ४०० + २०० = ) २००० वर्षेही यात मिळविण्यात आलीं नव्हतीं. सारांश, तेव्हां १२००० वर्षांची अगर १०००० वर्षांचीं चतुर्युगें नव्हतीं, एवढेंच नव्हे, तर वृद्धगर्गानें शालिशुकाचा ५५५० किंवा ५५५५ हा जो काळ दिलेला आहे, त्यावरून पहातां वृद्धगर्गाचे वेळींही हीं १०—१२ हजार वर्षांचीं चतुर्युगें

निर्माण झाली नव्हती हें कळून येतें. वृद्धगर्गाचा काळ कोणी शकानंतर धरितात व कोणी शकापूर्वी धरितात, त्याच्या काळाशीं आग्रहास कर्तव्य नाहीं. ग्रीक लोकानीं ज्या एका ( दक्ष ) काळाचीं ५४५१–५४६२ हीं वर्षे दिलीं आहेत, त्याच काळाचे ५५५० किंवा ५५५५ हें वर्ष वृद्धगर्गानें शालिशूकाचा राज्यारंभकाळ म्हणून दिलेलें आहे, तसेंच, हर्क्षीच्या कल्पारंभापासून प्रळयापर्यंत २२२५ वर्षे झालीं या भारतीय प्रमाणावरून सांगितलेल्या अल्बुमझारच्या प्रळयाच्या काळाशीं, आमच्या युग मन्वंतर पद्धतीनें काढिलेला प्रळयकाळ जुळतो—यावरूनही एके काळीं मागें दिलेलें कोष्टक—व त्यातील युग मन्वंतर पद्धति प्रचलित होती याविषयीं शंका राहणार नाहीं. सारांश—

( १ ) मॅगेस्थीनीसच्या वेळीं १२००० वर्षांची चौकडी हें प्रमाण ठरलें नव्हतें ( इ. पू. ३०० )

( २ ) वृद्धगर्गाचे वेळींही १२००० वर्षांची चौकडी हें प्रमाण ठरलें नव्हतें, शिवाय, याचेकाळीं ' कलियुग ' एक वर्षाचें होतें हें त्याच्या युगपुराणावरून पूर्वी दाखविलेंच आहे.

( ३ ) आर्यभटाचे वेळीं ३६०० वर्षे झालीं होतीं. हा चतुर्युगाचे पाद सारखे मानतो, यावरून प्रत्येक युग सारख्या लांबीचें असें याचें मत होतें, पण याचे काळीं १२००० वर्षांची चौकडी ठरून गेली होती, यानें १२०० वर्षांच्या कलीचीं वर्षे दिव्य धरून त्यास ३६० नीं गुणून कलि ४३२००० वर्षांचा बनविला. या पूर्वीच चौकडीची पद्धत ठरविण्यात आली असावी. यानें कल्पारंभापासून जो ३६०० वर्षांचा काळ परंपरेनें त्याच्या वेळेपर्यंत आला होता, तो कल्पारंभापासूनचा समजून भारतीय युद्धापासून आपल्या वेळेपर्यंत ३६०० वर्षे गेलीं अशी समजूत करून घेतली. सारांश, एकेक वर्षाचे कलि, द्वापर, त्रेता व कृत या

युगापासून, म्हणजे ४ वर्षांच्या चौकडीपासून १२००० वर्षांच्या चौकडी-पर्यंत व तेथून १२००० X ३६० =४३२०००० वर्षांच्या चौकडी-पर्यंत कसकशी युगाची परिणति झाली याचा इतिहास या पुस्तकात दिले-लाच आहे. वाचकाना उत्तरार्ध विशेष कठिण वाटला असेल अगर त्यातील गोष्टी त्यास नूतन वाटल्या असतील, तर त्यानीं तो भाग पुनः पुन वाचावा, म्हणजे उत्तरार्धातील विधानें सत्य आहेत कीं असत्य आहेत याबद्दल त्यास निर्णय करिता येईल. इतकें लिहून व शांतपणें माझें पुस्तक वाचल्याबद्दल वाचकाचे आभार मानून मी त्याची रजा घेतों.

---



## हर्षचरित्रांतील कांहीं ऐतिहासिक उल्लेख.

—:०:—

इ० स० ६०८–६४८ च्या सुमारच्या हर्षचरित्रांत खालील पौराणिक राजांविषयीं कांहीं महत्त्वाचे ऐतिहासिक उल्लेख, सहाव्या उच्छ्वासाच्या अखेरीस मिळतात:—

( १ ) नागकुलजन्मनः सारिकाश्रावितमंत्रस्य आसीन्नाशो नागसेनस्य पद्मावत्याम् । *

पद्मावती नगरींत नागसेनराजा कांहीं गुप्त खलबत करीत असतां, सारिकेनें तो वृत्तांत ऐकिला व त्यायोगें नागकुलोत्पन्न नागसेन प्राणास मुकला. शंकरकृत संकेतटीकेंत याचा खुलासा असा केलेला आहे कीं, नागसेन नांवाचा राजा पद्मावतीनगरींत राज्य करीत होता; त्याच्या मंत्र्यानें त्याचें अर्धे राज्य बळकाविलें होतें. त्या मंत्र्याचें शासन कसें करावें याविषयीं राजा खलबत करीत असतां सारिका जवळ होती. पुढें ती सारिका मंत्री आला असताही तेंच बोलली. त्यानें मंत्री सावध होऊन त्यानें विश्वासानें राजाचा खून केला. पद्मावतींत इ. स. ४०० ते ५०० च्या दरम्यान नागकुळींचे राजे राज्य करीत असत. ( कैलकिल यवनांची सविस्तर माहिती पहा; पृ. २२९ ).

( २ ) नागवनविहारशीलं च मायामातंगांगान्निर्गता महासेनसैनिका वत्सपतिं न्ययंसिषुः ॥

---

* नवनागाः पद्मावत्यां कांतिपुर्यां मथुरायां ( भविष्यंति ) वि० पुराण ( ४–२४–१८.

इ० स० च्या पांचव्या शतकांत नागराजे पद्मावती, कांतिपुरी व मथुरा या तीन ठिकाणीं राज्य करीत असत असें वाटतें. समुद्रगुप्ताच्या प्रयाग येथील स्तंभावरील लेखांतील राजे पहा.

हत्तींच्या वनांत विहार करण्याची संवय असलेल्या वत्सपति ( उदयनास ) *कृत्रिम हत्तींच्या पोटांत लपून बसलेल्या महासेनाच्या ( प्रद्योताच्या )* सैनिकांनीं पकडून नेलें. टीकाकार म्हणतो महासेन नांवाच्या ( प्रद्योत ) उज्जयिनीच्या राजाच्या मनांत आपली मुलगी वासवदत्ता वत्सांचा राजा उदयन यास द्यावयाची होती; म्हणून त्यास अशा युक्तीनें पकडून आणिलें. हा बुद्धकालीन चंद्रवंशीय राजा होय. अशीच कथा गुणोदयाच्या बृहत्कथेंत आहे. ( कथासरित्सागर पहा; व तसेंच मागें पृ. २०८ पहा. )

( ३ ) *अतिदयितलास्यस्य च शैलूषमध्यमध्यास्य मूर्धानं असिलतया* मृणालमिवाऽलुनादग्निमित्रात्मजस्य ( ० मित्राग्रजस्य ) सुमित्रस्य मित्रदेवः ( मूळदेवः ) । *

---

* ( पुष्पमित्रस्य ) आत्मजोऽग्निमित्रस्तस्मात्सुज्येष्ठः ततो वसुमित्रो,।
- वि० पु० ४-२४-१०.

यांतील ' सुज्येष्ठ ' हें विष्णुपुराणकर्त्यांनीं ज्या मुळावरून घेतलें असेल त्यांत विशेषणच असावें; व सुमित्र हा अग्निमित्राचा वडील पुत्र असावा. कालिदासानें मालविकाग्निमित्रांत, पुष्पमित्राचें अग्निमित्रास आलेलें एक पत्र दिलेलें आहे, त्यांत वसुमित्र हा अग्निमित्राचा पुत्रच म्हटलेलें आहे:--

**स्वस्ति । यज्ञशरणात्सेनापतिः पुष्पमित्रो वैदिशस्थं पुत्रं आयुष्मंतं अग्निमित्रं स्नेहात्परिष्वज्य अनुदर्शयति । विदितमस्तु । योऽसौ राजसूययज्ञे दीक्षितेन मया राजपुत्रशतपरिवृत्तं वसुमित्रं गोप्तारं आदिश्य संवत्सरोपावर्तनीयो निरर्गलस्तुरगो विसृष्टः स सिंधोर्दक्षिणरोधसि चरन्नश्वानीकेन यवनानां प्रार्थितः । तत उभयोःसेनयोर्महानासीत्संमर्दः ततः परान्पराजित्य वसुमित्रेण धन्विना । प्रसह्य ह्रियमाणो मे वाजिराजो निवर्तितः ॥ सोऽहमिदानीं अंशुमतेव सगरः पौत्रेण प्रत्याहृताश्वो यक्ष्ये । तदिदानीं कालहीनं विगतरोषचेतसा भवता वधूजनेन सह यज्ञसंदर्शनाय आगंतव्यम् ।**

( पुढें चालू )

अग्निमित्राचा ( बंधु किंवा ) पुत्र सुमित्र याचा खून, मित्रदेव किंवा मूलदेव यानें, नटाच्या गायनांत व नृत्यांत तो गढून गेलेला असतांना ( नटाचा वेष घेऊन ) केला. हा शुंगराजांपैकीं पुष्पमित्राचा पुत्र जो अग्निमित्र त्याचा पुत्र वसुमित्र किंवा सुमित्र होय.

( ४ ) प्रज्ञादुर्बलं च बलदर्शनव्यपदेशदर्शिताशेषसैन्यः सेनानीरनार्यो मौर्यं बृहद्रथं पिपेष पुष्पमित्रः स्वामिनम् । *

सैन्याची स्थिति दाखविण्याच्या निमित्तानें सर्व सैन्य दाखवून, ( बुद्धीनें मंद ) असलेल्या मौर्यकुलांतील ( शेवटच्या ) बृहद्रथ राजाचा ( स्वामीचा ) खून, त्याचा अनार्य सेनापति पुष्पमित्र यानें केला. हा मौर्यांपैकीं शेवटचा राजा होय.

---

यावरून पुष्पमित्रानें शेवटचा मौर्यराजा बृहद्रथ यास मारून राज्य बळकाविल्यानंतरही 'सेनापति' ही आपली पदवी कायम राखली होती असें दिसतें. पुष्पमित्रानें पाटलिपुत्रांत राजसूययज्ञ आरंभिला होता. अग्निमित्र विदिशा ( भिलसा ) नगरांत राज्य करीत होता. वसुमित्र आज्ञावरोवर तुरगरक्षणार्थ स्वारीवर गेला होता. सिंधूनदीच्या कांठीं यवनांनीं घोडा अडविला. तेव्हां वसुमित्रानें पराक्रमानें तो परत वळवून आणिला. आतां पुष्पमित्र यज्ञार्थ दीक्षित होत आहे, याच वेळचें हें पत्र आहे. याच पुष्पमित्राच्या यज्ञाचा उल्लेख पतंजलि महाभाष्यांत ' **इह पुष्पमित्र याजयामः।** ' याप्रमाणें ( पाटलिपुत्रांत राहून ) करितात. या सर्व गोष्टी ( ३१२–१३७ = ) इ॰ पू॰ १७५ नंतर पांचपंचवीस वर्षांनीं घडल्या असाव्यात. ( इ॰ पू॰ १७५ –१६५ ) यानंतर लौकरच पांचपंचवीस वर्षांनीं पतंजलि झाले असावेत.

* तत्र पुष्पमित्र सेनापति स्वामिनं ( बृहद्रथ ) हत्वा राज्यं कारिष्यति ।

विष्णुपुराण ४–२४–९.

( ५ ) आश्चर्यकुतुहली च चंडीपतिर्दंडोपनतयवननिर्मितेन नभस्तलयायिना यंत्रयानेनानीयत क्वापि काकवर्णः शैशुनागि-(रि) र्नगरोपकंठे च कंठे विचकृते निस्त्रिंशेन । *

यवनांस जिंकल्यानंतर यवनांनीं युक्तीनें शिशुनागात्मज काकवर्ण यास आकाशयानानें लांब नेऊन ठार केलें !

( ६ ) अतिस्त्रीसंगरतं अनंगपरवशं शुंगं अमात्यो वसुदेवो देवीभूर्ती दासीदुहित्रा देवीव्यंजनया वीतजीवितमकारयत् ॥

अतिशय कामुक अशा शुंगांपैकीं ( शेवटचा राजा देवभूति यास ) त्याचा मंत्री वसुदेव यानें दासीची मुलगी राणी म्हणून त्याजकडे पाठवून तिजकडून त्यास ठार करविलें ! *

शिशुनागपुत्र काकवर्ण यास यवनांनीं ठार मारिलें, ही परंपरा हर्षानें ७ व्या शतकाचे प्रारंभीं दिली आहे. हा काकवर्ण इ० पू० ७०० हूनही थोडासा प्राचीनच होय. याच्या वेळीं आलेले हे यवन कोण ? हे ग्रीक कसे असणार ? कारण, ग्रीक प्रथमच इ० पू० ३२७ त इकडे आले ! हे यवन कोणी तरी वेगळे असले पाहिजेत, असें मानणें जरूर आहे.

---

* ततश्च शिशुनागस्तत्पुत्रश्च काकवर्णः । विष्णुपुराण ४-२४-३.

देवभूतिं तु शुंगराजानं व्यसनिनस्तस्यैव अमात्यः काण्वो वसुदेवनामा निगत्य स्वयमवनीं भोक्ता । वि० पु० ४-२४-११.

## इंद्रप्रस्थ येथील राजे.

—:०:—

अर्जुन
|
अभिमन्यु
|
१ परीक्षित् ( इ० पू० १२६३ )
|
२ जनमेजय ( गुरु याज्ञवल्क्य )
|
३ शतानीक ( गुरु शौनक )
|
४ अश्वमेधदत्त
|
५ अधिसीमकृष्ण
|
६ निचक्नु—इंद्रप्रस्थ गंगेच्या प्रवाहानें वाहून गेल्यामुळें यानें आपली राजधानी कौशांबी येथें नेली.
|
७ उष्ण–द्रु–पाल.
|
८ चित्ररथ
|
९ शुचि
|
१० वृष्णिवान्
|
११ सुषेण
|

२५ उदयन(गौतम बुद्ध याचें वेळीं झाला)
|
२६ अहीन ( वहीनर--नरवाहनदत्त )
|
२७ खंडपाणि ( दंडपाणि )
|
२८ निरमित्र
|
२९ क्षेमक-खेमराज ( इ० पू० ३८४ ) यास महापद्मनंदानें मारिलें. येथें चंद्रवंशसंपला. यापुढें पृथ्वीराज चव्हाणापर्यंतचें ५८ राजाची नांवें आढळतात. पृथ्वीराजाचें इ. स. ११९१ मध्यें महमद घोरीशीं युद्ध झालें. तेव्हा युधिष्ठिरापासून शहानाम्याप्रमाणें २४५५ वर्षें झालीं होती. हा शेवटचा दिल्लीचा हिंदु राजा होय.

---

## भारतीय इतिहासांतील मुख्य मुख्य गोष्टींचे काळ.

इ० पू०

| | |
|---|---|
| सुमारें ५३०० | सत्यव्रत मनूच्या वेळीं प्रलय. |
| ३१०२ | कल्पाचा प्रारंभ–स्वायंभुव मनूचा काळ–याच्या वेळेपासून वैवस्वत मनु व त्याचा पुत्र इक्ष्वाकु–यांपर्यंत १९।२० पिढ्या गेल्या. |
| सुमारें २६५० | वैवस्वतमनु व इक्ष्वाकु याचा अजमासें काळ. अयोध्येची स्थापना. |
| २१००ते२१८७ | ( सुमारें ) ऐल पुरूरवा व आयु याचे काळ–मरुत्ताचा काळ. |
| २१८० | यौवनाश्व मांधात्याचा जन्म. |

| | |
|---|---|
| २१०२ | पृषदश्व, निमि, ययाति, पंचशिख, विश्वामित्र, सुश्रुत-शकुंतला-दुष्यंत, कण्व, मेधातिथि, वगैरे. तसेंच, गृत्समद, शौनक, दीर्घतमा गौतम, काक्षीवान्, भरत-इत्यादिकही इ. पू. २१०० तें २०००. चे दरम्यान झाले. |
| १५८८ | परशुरामाचा जन्म. |
| १५६८ | राम दाशरथीचा जन्म. |
| १२६६–१२६२ | व्यासांनीं वेदसंहिता रचिल्या. |
| १२६३— | भारतीय युद्ध—कल्पारंभापासून येथपर्यंत ६ मन्वंतरें व २७ चौकड्या जाऊन, २८ व्या चौकडींतील तिसरें वर्ष चालू होतें. (द्वापाराच्या अखेरीस ). |
| १२६२ | परीक्षितीचा जन्म ( कलीच्या अंतीं. ) |
| १२४७ | सोळावें वर्षी परिक्षितीचा राज्याभिषेक झाला. |
| ११८७ | परिक्षित ६०-वर्षें-राज्य करून सर्पदंशानें मेला. |
| ११८७ | यावेळीं ऐल पुरूरव्यापासून जनमेजयाच्या राज्यारोहणापर्यंत १००० एक हजारवर्षें झालीं होतीं. |
| १२००ते११६० | पाणिनि व पिंगल यांचा काळ. |
| ११०२ | शौनकानें कल्पाच्या दुसऱ्या हजार वर्षांचे सत्र केलें. |
| सुमारें ११०० | शौनक व व्याडि हे व्याकरणग्रंथकार झाले. |
| ,, १००० | ,, यास्काचा काळ. |
| ५२७ | महावीर वर्धमानाचा निर्वाणकाळ. |
| ५००–४६७ | उदार्याची कालकीर्द; यानें आपलें चौथे वर्षी कुंसुमपूर शहर बांधिलें. |
| ४६७–४२७. | नंदिवर्धनाची कालकीर्द. |
| ४२७–३८४ | पुराणांतील महानंद ( दि ) ऊर्फ बौद्धांचा कालाशोक याचा काळ; क्षत्रियकुळांतील शेवटचा राजा. |

सुमारें ५००—४०० कात्यायन वार्तिककार; हा महानंदीच्या कालकीर्दीत झाला असें भविष्यपुराण म्हणतें.

३८४—३१२ नवनंदांचा काळ.

३१२ चंद्रगुप्ताचा राज्याभिषेक. भारतीय युद्धापासून याचे वेळेपर्यंत ९५१ वर्षे झालेली होतीं.

३१२—१७५ मौर्यराजांचा काळ.

१७५—६३ शुंगराजांचा काळ.

१०८—६३ काण्वराजांचा काळ.

१९१—२४९ इ. स. आंध्रभृत्यांचा काळ.

सुमारें इ. पू. १४० त पतंजलि महाभाष्यकार.

इ. पू. ४०—ते इ. स. ३०—चंद्राचार्य, अभिमन्यु, नागार्जुन वगैरे.

१९१—१६८ सिमुक सातवाहन.

१६८—१५० कृष्ण.

१५०—१४० मल्लकर्णी–श्रीशातकर्णी-कलिंगदेशच्या खारवलाकडे मौर्य काल १६५ (इ. पू. १४०) मध्यें यानें दूत पाठविले होते.

१०४—४८ कालकाचार्य, नागार्जुन, उज्जनीचा विक्रमादित्य यांचा समकालीन शातवाहन कुलांतील राजा. यानेंच विक्रमास नर्मदा उतरून येऊं दिलें नाहीं.

४००—४९९ गुप्त राजे.

सुमारें ४०२—५५० वाकाटक ऊर्फ कैलकिल राजे.

इ. स. ४८० मयुरात.

,, ६१० भर्तृहरि (वाक्यपदीयाचा कर्ता.)

## पुराण-शोधक-ग्रंथमाला.

—:०:—

महाराष्ट्रभाषेची वृत्तपत्रांतून दहाबारा वर्षे सेवा केल्यानंतर आम्हास वाटलें कीं मासिक पुस्तकद्वारें स्वतंत्रपणें थोडीबहुत सेवा करावी; परंतु, मासिक पुस्तकाविषयीं महाराष्ट्रीय वाचकांची भारीच अनास्था दिसून आल्यामुळें व तीन वर्षांच्या 'समालोचका' च्या अनुभवानें तें मासिक पुस्तक पुढें चालविणें अशक्य आहे अशी खात्री झाल्यामुळें, आता महाराष्ट्राची ग्रंथद्वारें थोडीबहुत सेवा करावी अशी इच्छा उद्भवलेली आहे. *या इच्छेस अनुसरून ही 'पुराणशोधक ग्रंथमाला' हल्लीं काढलेली आहे.* या मालेचा मुख्य उद्देश असा आहे कीं वाचकांच्या मनांत प्राचीनकाळच्या एकंदर स्थितीविषयीं नीट कल्पना येऊन त्याचे मनात प्राचीन काळचा इतिहास, भूगोल, शास्त्रें, कालगणना, परंपरा इत्यादि गोष्टीं-विषयीं नवा प्रकाश पडावा. अशा हेतूनें काढलेल्या या ग्रंथमालेस तरी महाराष्ट्रांतील वाचकवर्ग उदार आश्रय देतील अशी आमची आशा आहे. *या ग्रंथमालेंतील पहिलें पुस्तक.—*

## पुराणनिरीक्षण.

—:०:—

हें आहे. यांत, पुराणें म्हणजे काय, तीं व्यासांनींच लिहिलीं काय! *त्यांनीं लिहिल्याप्रमाणेंच तीं हल्लीं मिळतात काय, मत्स्य व नारद पुराणांच्या लक्षणांप्रमाणेंच हल्लीं पुराणें आहेत काय,* पुराणांचे कोणकोणत्या ग्रंथात उल्लेख आहेत, श्रीमद्भागवत किती प्राचीन आहे, तें बोपदेवानें केलें आहे कीं काय, इत्यादि प्रश्नांचें विवेचन असून, शिवाय अठराही पुराणांची यांत थोडक्यात माहिती आहे. पौराणिक कालगणना, इतिहास

व भूगोल यांविषयीं यांत शेवटीं निबंध आहेत. पुराणांविषयीं इतकी माहिती एकत्र असलेला कोणत्याही भाषेंतील हा पहिलाच ग्रंथ होय ! किं० १॥ रु.

या मालेंतील दुसरें पुस्तकः—

## संस्कृत कवींचीं चरित्रें.

—:०:—

हें निघेल. यांत संस्कृतमधील सुमारें निवडक अशा शंभर प्रसिद्ध ग्रंथकारांविषयीं गेल्या पांचपन्नास वर्षांत पाश्चात्य शोधकांस उपलब्ध झालेली सर्व माहिती अकारादि अनुक्रमानें दिलेली आहे. यानें कोणत्याही कवीचा काळ, त्याचे ग्रंथ, त्याच्या आयुष्यांतील ठळक गोष्टी इत्यादि चटकन पहाण्यास मिळतील. किंमत अवघी आठ आणे.

या मालेंतील तिसरें पुस्तक:—

## रामायण—निरीक्षण.

—:०:—

हें निघेल. यांतील विषयांची सूची अशी आहे. रामाचा काळ,—अग्निवेश व लोमश रामायणांवरून रामाच्या वनवासाची रोजनिशी. रामरावणयुद्ध किती दिवस झालें?—रामसीतेचा विरह किती दिवस झाला !—रामचरित्रावरील वाङ्मय,—वाल्मीकिरामायण व दशरथजातक,—उत्तरकांड किती प्राचीन आहे?—वाल्मीकिऋषि व त्यांचे ग्रंथ,—राक्षस व त्यांचें मूळ निवासस्थान. रामाचा अश्वमेध,—रामायणाचें पद्मपुराणोक्त कांडशः सार—अग्निवेश व लोमश रामायणातील उतारे—सीता व वाल्मीकि यांची भेट—रामतापनीयोपनिषदातील रामकथा—पौरुषच श्रेष्ठ होय ( योगवासिष्ठांतील उतारा )—महेश्वरतीर्थांची रामायणावरील टीका—पाताळ ऊर्फ रसातळ म्हणजे अमेरिकाच होय—जांबवानाचें अन्यथारामायण—

रामावताराचा अप्रतिमपणा—रामाश्वमेधपर्व—सध्याच्या रामायणाच्या भिन्न भिन्न प्रति. किंमत एक रुपया.

या मालेंतील चौथें पुस्तक.

## भारतनिरीक्षण.

—:०:—

हें निघेल. यांतील विषयांची सूची अशी आहे. भारतचा काव्यदृष्ट्या विचार—भारतीय युद्धाचा काळ—ग्रंथाचा काळ व त्याचें सद्यःस्वरूप—भारताचा इतिहासदृष्ट्या विचार—भारतावरील वाङ्मय—भारतकालीन भूगोल व राजकीय परिस्थिति—भारतीय युद्धांत पांडवांस जय कां मिळाला याविषयीं ऐतिहासिकदृष्ट्या विचार—भारतकालीन राज्यपद्धति—भारतकालीन युद्धपद्धति—तत्कालीन समाज, पोषाख, चालीरीति वगैरे—हरिवंश भारताचाच भाग आहे कीं नाहीं!—जैमिनीचें भारत—युद्धाची रोजनिशी. यांत भारतकालीन भरतखंडाचा नकाशा व त्यावेळचीं आयुधें वगैरेंचीं चित्रेंही आहेत. किंमत १॥ रुपया.

या मालेंतील पांचवें पुस्तक.

## भारतीय रसायनशास्त्राचा इतिहास.

—:०:—

हें निघेल. यांत भारतीय रसायनशास्त्राचा उगम रामायणाच्याही वेळेपासून कसा झालेला आहे हें दाखवून, व्याडि, ऋष्यशृंग, शाक्ल, रसार्णव नागार्जुन, गोविंदभगवत्पूज्यपाद, रुद्रयामल इत्यादि अनेक रसग्रंथ व रससिद्ध यांविषयीं उपलब्ध अशी सर्व प्रकारची माहिती दिलेली आहे. भारतीय रसायनशास्त्राच्या इतिहासावर मराठींत हाच पहिला ग्रंथ आहे. शिवाय, शेवटीं अस्सल रसग्रंथांतून उतारे देऊन ठेविलेले आहेत. अर्वाचीन रसा-

यनशास्त्र ज्यास अशक्य मानितें असे कृत्रिम सुवर्ण बनविण्याच्या अनेक क्रिया या उताऱ्यातून आढळतात. किंमत अवघी दीड रुपया.

या मालेंतील सहावें पुस्तक.

## आर्यवैद्यकावर नवा प्रकाश.

— ० —

हें निघेल. यातील विषयसूची अशी आहे. विद्युतचे वैद्यकींत उपयोग–पावसातील वीज–एलोक्ट्रो होम्योपॅथी–शरीराचें ध्रुवत्व–फळातील वीज–अन्नाचा सदुपयोग व दुरुपयोग–योगशास्त्र व विद्युत्–प्राण, ॲनिमल मॅमेटिझम्, व्हैटॅलिटि, वात हे सर्व एकच होत–मनशास्त्र व विद्युत्–जड व चैतन्य विद्युत्–रोगोत्पत्ति कशी होते? स्वरोदयशास्त्र–हॉड्स याच्या विद्युन्मानस शास्त्रातील 'हवेंतील विद्युत्'च आमच्या योगशास्त्रातील 'प्राण' व वैद्यकातील 'वात' होय ! प्राणवर्धक पदार्थ व कृत्यें ! किंमत १ रु.

याप्रमाणें तूर्त सहा पुस्तकाची योजना केलेली आहे. पुढेंही नवीन पुस्तकें तयार झालीं म्हणजे वाचकास पूर्वीच्या पुस्तकातून कळविण्यात येतील. या प्रथमालेस कायमचे वर्गणीदार होऊन वाचकानीं आमच्या पुराणवस्तुशोधनकार्यास (Antiquarian Research) मदत करावी अशी विनति आहे.

आपला सर्वांचा नम्र सेवक,
वैद्य—त्र्यंबक गुरुनाथ काळे,
मु. पनवेल, जि. कुलाबा.

## अठराही पुराणांची सुंदर आवृत्ति.

— ० —

सुमारें १००० ग्राहक जमतील तर अठराही पुराणांची एक सुंदर आवृत्ति काढण्याचा आमचा विचार आहे अठरा पुराणें मिळून चार

लक्ष ग्रंथ आहे. याचे सुमारें २५ व्हॉल्युमस् करूं. सारीं पुस्तकें एका आकाराचीं व सुमारें सारख्या जाडीचीं करूं. हें चार लक्षाचें पौराणिक वाङ्मय आम्हीं अवघ्या साठ ६० रुपयांस देऊं. Historians' History of the World किंवा Encyclopaedia Britannica, या ग्रंथमालेच्या सारखेंच हें एक महत्त्वाचें कार्य आहे; तरी धनिक ग्राहकांनीं या पुराणांच्या आवृत्तीस नांवें नोंदवून ठेवावींत. या पुराणाच्या आवृत्तींत विशेष हें आहे कीं, या पुराणनिरीक्षण पुस्तकांत दिलेल्या पुराणांच्या लक्षणांप्रमाणें बरोबर असलेल्या पोथ्या जमवून–त्यावरून ही पुराणांची आवृत्ति काढावयाची आहे. पौराणिक ग्रंथांचा उद्धार व्हावा अशी इच्छा असलेल्या सर्व पुराणाभिमानीयांनीं या आवृत्तीस ग्राहक झाल्याबद्दल नांवें नोंदावींत अशी सर्वांस विनंति आहे. या कामीं आम्हांस द्रव्यदृष्टया विशेष लाभ नसून हातून एक सत्कार्य व्हावें एवढीच इच्छा आहे.

वैद्य त्र्यंबक गुरुनाथ काळे,
मु. पनवेल, जि. कुलाबा.

## WORKS CONSULTED.

Prof Wilson's VISHNU PURANA.
Mr Ayyer's CHRONOLOGY OF ANCIENT INDIA.
" " PURANIC CHRONOLOGY (Ind. Review)
Prof. Rangacharya's YUGAS
Pundit R. Sham Shastri's GAVAM AYANAM.
Mr. Tournour's MAHAVANSO.
Mr. Jacobi's Hemachandra's PARISHISHTAPARVAN.
PRABANDHA CHINTAMANI (Dinanath.)
Mr. Smith's EARLY HISTORY OF INDIA.
" ASOKA.

Pundit Jwâlâprasâd's अष्टादशपुराणदर्पण (Hindusthani)
Mr. Modak's Essay on Puranas (Marathi.)
Dr. Bhâu Dâji's LITERARY REMAINS.
Prof. Bhandarkâr's EARLY HISTORY OF TH
" DECCAN.
Rhys David's BUDDHIST INDIA.
Mac Donnel's HIS. OF SANSKRIT LITERATURE.
Puranas
Bharata and Ramayana.
Vedic Literature.
HARILILA by Bopadeva.
Sankaracharya's Commentary on विष्णुसहस्रनाम
and सनत्सुजातीय
A pararka on याज्ञवल्क्यस्मृति.

---

